# संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती

संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती सामाजिक शास्त्रे विद्याशाखेतील इतिहास विषयात 'आचार्य' (पीएच.डी.) पदवीसाठी सादर केलेला

शोध-प्रबंध

-: संशोधन विषय :-

954

# 'चिमाजी आप्पा : व्यक्ती आणि कार्य'

(इ.स.१७०३ ते इ.स. १७४०)




-: संशोधक :-


प्रा. साहेबराव सुकाराम पवार

इतिहास विभाग प्रमुख,
यशवंतराव चव्हाण कला व विज्ञान महाविद्यालय,
मंगरुळपीर जि.वाशिम


-: मार्गदर्शक :-


प्रा.डॉ. विपिन एम. राठोड

इतिहास विभाग प्रमुख
आर. ए. आर्ट्स, श्री. एम.के. कॉमर्स,
आणि श्री. एस. आर. राठी विज्ञान महाविद्यालय, वाशिम


ऑक्टोबर २०१६

# प्रतिज्ञापत्र

मी प्रा. साहेबराव सुकाराम पवार, यशवंतराव चव्हाण कला व विज्ञान, महाविद्यालय, मंगरुळपीर प्रतिज्ञापूर्वक निवेदन देतो की, 'चिमाजी आप्पा : व्यक्ती आणि कार्य' हा शोध-प्रबंध प्रा. डॉ. विपिन एम. राठोड, वाशिम यांच्या मार्गदर्शनाखाली तयार केलेला आहे. प्रस्तुत शोध-प्रबंध सुक्ष्म अध्ययन व विश्लेषणात्मे स्वरुपाचा असुन सदर शोध-प्रबंध अथवा त्याचा कोणताही भाग मी कोणत्याही विद्यापीठात यापुर्वी सादर केलेला नाही.

सदर शोध-प्रबंध संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ, अमरावतीच्या सामाजिक शास्त्रे विद्याशाखेतील इतिहास विषयातील(आचार्य) पी एच. डी. पदवीसाठी सादर करण्यात येतं आहे.

स्थळ : मंगरुळपीर

दिनांक २०/१०/२०१६

संशोधक

प्रा. साहेबराव एस. पवार

यशवंतराव चव्हाण कला व विज्ञान महाविद्यालय,

मंगरुळपीर जि. वाशिम

# अनुक्रमणिका

प्रकरण १ : मराठी सत्तेचा उदय

१.१ महाराष्ट्राची भौगोलिक पार्श्वभूमी

१.२ भोसले घराणे

१.२.१ शिवकाळ

१.२.२ छत्रपती संभाजीचा कालखंड

१.३ मराठ्यांचे स्वातंत्र्य युध्द (इ. स. १६८९ - इ. स. १७०७)

१.३.१ छत्रपती राजाराम महाराज कालीन मराठा- मोगल संघर्ष :-

१.३.२ महाराणी ताराबाईकालीन मराठा- मोगल संघर्ष :-

१.४ शाहुची सुटका व राजपद :-

१.५ भट घराणे :-

१.५.१ बाळाजी विश्वनाथाचे पुर्वजिवन

१.५.२ बाळाजी विश्वनाथास पेशवाई.

१.५.३ बाळाजी विश्वनाथाची कामगिरी :-

१.५.४ बाळाजी विश्वनाथाची योग्यता :-

१.६ चिमाजी आप्पांचे पूर्वजीवन :-

१.७ चिमाजी आप्पाचे प्रारंभिक कार्य.

## प्रकरण : १ मराठी सत्तेचा उदय.

### १.१ महाराष्ट्राची भौगोलिक पार्श्वभूमी

*महाराष्ट्र राज्य हे विशीष्ट भौगोलीक परिस्थिती असलेला प्रदेश. भारताच्या पश्चिम भागास लागून असलेले राज्य म्हणजे महाराष्ट्र. महाराष्ट्र राज्यांचा भौगोलीक आकार त्रिकोणाकृती असून दक्षिणेकडे चिंचोळा तर उत्तरेकडे रुंद होत गेलेला आहे. तसेच महाराष्ट्राचा पाया कोकणात तर त्यांचे निमुळते टोक पुर्वेस गोंदियाकडे आहे. महाराष्ट्र राज्य हे १५⁰ ४५ ते २०⁰ ०६ उत्तर अक्षांश असून ७२⁰ ३६ ते ८०⁰ ४५ पुर्व रेखांश वर पसरले आहे.[१] महाराष्ट्र प्रदेश सर्वसाधारणपणे तीन विभागांनी बनला आहे. दमट हवा, मुसळधार पाऊस, भात शेती, आंबा, फणस, काजू, नारळी-पोफळीनी वेढलेले किनारे, खाडीला मिळणाऱ्या लहान-लहान नद्याचा कोकणपट्टीचा प्रदेश हा महाराष्ट्राचा पचिश्म भाग. हा पहिला भाग डोंगराळ आहे. तर मध्यभाग पठारी असून त्याला देश म्हणतात.[२]*

*भारताच्या इतर प्रांतापेक्षा महाराष्ट्राचा भुगोल निश्चित वेगळा आहे. दक्षिण-पश्चिम पर्वतमय भाग, उत्तर-दक्षिणेस पसरलेला पश्चिम घाट किंवा सहयाद्री आणि उत्तरेला पुर्व-पश्चिम पसरलेला विंध्य व सातपुडा पर्वताच्या रांगा आहे. यामुळे कोकण, मावळ, व देश असे महाराष्ट्राचे स्वाभाविक तिन विभाग पडले आहे.[३] अशा या महाराष्ट्रात कोकण, खान्देश, वऱ्हाड, मध्यप्रांताचा काही भाग व ब्रिटीश दखन तसेच निजामाच्या राज्यांच्या एक तृतीयांश भाग यांचा समावेश होता.[४] उतुंग डोंगर, खोऱ्या-दऱ्या, घनदाट जंगल आणि मोठमोठया धो धो वाहणाऱ्या नद्या हे महाराष्ट्राचे वैशिष्ट पुर्ण नैसर्गिक रुप मराठयांना वरदान तर शत्रुला शाप ठरले.[५] महाराष्ट्रात अनेक महत्वाच्या नद्या असुन त्या पश्चिमेकडे वाहून अरबी समुद्राला आणि पुर्वेकडे वाहुन बंगालच्या उपसागराला मिळतात. गोदावरी नदी ही महाराष्ट्रातील महत्वाची नदी असून ती पुर्व प्रवाही आहे.[६] दूसरी महत्वाची नदी ही तापी असून तापी नदी मध्यप्रदेशात सातपुडयात उगम पावते. तापी पुर्वे कडून पश्चिमेकडे वाहत जाते. पुर्णा नदी तापीची उपनदी. दक्षिण महाराष्ट्रातील महत्वाच्या दोन नद्या, भीमा व कृष्णा. भीमा नदीचे उगमस्थान पुणे जिल्हात भीमाशंकर जवळ आहे. तर कृष्णा नदी चा उगम महाबळेश्वराजवळ आहे.[७]*

कोकण किनारपट्टीच्या अरुंदपणामुळे कोकणात वाहणाऱ्या नद्याची लांबी कमी आढळते. नदीच्या मुखातून भरतीच्यावेळी समुद्राचे पाणी नदीत शिरते. ते जिथपर्यंत नदीत शिरते त्या नदीच्या भागास खाडी म्हणतात. कधीकधी समुद्राचे भरतीच्या वेळी जमीनीच्या सखल चिंचोळया भागातही पाणि शिरते. त्या भागालाही खाडी म्हटल्या जाते. महाराष्ट्रात वसई, विजयदुर्ग, दाभोळ, ठाणे, जयगड, तेरेखोल, धरमतर इत्यादी प्रमूख खाडया आहेत[०८]

महाराष्ट्राची पश्चिम सरहद्द अरबी सागराने नश्चित केली आहे, तर ठाणे, नाशिक, धुळे, हे जिल्हे महाराष्ट्राची वायव्य सरहद् निश्चित करतात. महाराष्ट्रच्या उत्तरेस व ( काही प्रमाणात) उत्तर - पुर्व सीमेला मध्यप्रदेश हे राज्य आहे. तर धुळे, बुलढाणा, जळगांव, वर्धा, नागपुर आणि चंद्रपुर यांच्या उत्तर सिमा सातपुडा पर्वतराजीशी संलग्न आहेत. महाराष्ट्राच्या अग्निय दिशेला आंधप्रदेश असून नांदेड, यवतमाळ, चंद्रपुर, गडचिरोली या जिल्हयांच्या दक्षिण सरहद्दीने आंध्र प्रदेश वेगळा केला आहे. दक्षिणेलागून कर्नाटक राज्याच्या सीमा नांदेड, लातूर, उस्मानाबाद, सोलापुर, सांगली, कोल्हापूर या जिल्हयांना स्पर्श करतात.[०९] महाराष्ट्रातील सहयाद्रीची समुद्र सपाटी पासुनची उंची सरासरी ३०० मीटर असुन घाटमाथ्यावर विस्तृत पठारी प्रदेश आहे.[१०] अशा वैशिष्टपुर्ण प्रदेशातच मराठी सत्तेचा उदय झाला.

### १.२ भोसले घराणे

१६व्या शतकात महाराष्ट्रात जी काही महत्वाची घराणे उदयास आली त्यापैकी एक भोसले घराणे होय. भोसले घराण्यांच्या उदयाबरोबरच मराठा सत्तेचा उदय झाला. या घराण्यांत अनेक नामावंत व कर्तबगार पुरुष होऊन गेलेत. बाबाजी भोसले, मालोजी भोसले, शहाजी भोसले, शिवाजी भोसले इत्यादी.[११] मालोजी भोसले यांनी भोसले घराण्यांची जहागिरी वाढविली.[१२] त्यास दोन पुत्र होती शहाजी व शरिफजी. शहाजीचा जन्म १६ मार्च १५९९ रोजी झाला.[१३] मुसलमानी सत्तेच्या नेतृत्वाखाली शहाजी राजे यांनी अनेक पराक्रम करुन आपली कर्तव्यदक्षता दाखविली. तेव्हा निजामशाहाने शहाजी यांना राजे हा किताब, पाच हजारी मनसबदारी तसेच फौजेचा खर्च भागविण्यासाठी सुपे, पुणे, चाकण, इंदापूर ची देशमुखी व शिवनेरी किल्ला दिला.[१४] नंतरच्या

काळात शहाजी राजे यांनी निजामशहाच्या वतीने अनेक पराक्रम केले. त्यापैकीच एक संघर्ष म्हणजे भातवडीचा संघर्ष होय. जेंव्हां आदिलशाहा व मोगल एक होऊन निजामशाहीवर चालुन आले. तेहां नोव्हेंबर १६२४ मध्ये नगरावेळे भातवडी येथे संघर्ष झाला. त्यात निजामशाहाचा वजीर मलीक अंबर व राजे शहाजी यांनी मोगल व आदीलशाहा यांच्या सैन्याचा धुव्वा उडविला. परीणामी निजामशाहीच्या दरबारात शहाजी महाराजांचे वजन झपाटयाने वाढत गेले.[१५] कालांतराने सन १६२५ मध्ये शहाजी राजे निजामशाही सोडून आदिलशाहीच्या चाकरीत गेले. तिन वर्षापर्यंत शहाजी राजे आदिलशाहीत होते.[१६] त्यावेळी लखूजी जाधव म्हणून वजनदार मराठा सरदार होते. लखूजी पुर्वीपासुनच मोगलांना सामील होऊन निजामशाही विरुध्द लढत असे. परिणामी निजामशहाने लखुजी जाधव यास कैद केले व २५ जुलै १६२९ रोजी त्यास व त्यांच्या आचलोजी या पुत्रास ठार केले. याच काळात मलीक अंबर हाही मृत्यू पावला.[१७] मलिक अंबरचा मृत्यू, लखूजी जाधव यांचा मुर्तजा निजामशाहा यांनी भरदरबारात केलेला खुन, मोगलांचे निजामशाहीवरील आक्रमण, आदिलशहाने या परिस्थितीचा फायदा घेण्याचा ठरविला बेत, निजामशाहीचा वजीराचे चंचल धोरण अशा घडामोडीमुळे शहाजी राजांच्या निष्ठेत सारखा बद्दल होत होता.[१८] परिणामी शहाजी राजे यांनी पुण्याच्या आसपास निजामशाहीच्या व आदिलशाहीच्या सरहद्दी वरील प्रदेशात स्वतंत्रपणे कारभार सूरू केला.[१९] याच दरम्यान मोगलानी निजामशाही विरुध्द मोहीम काढून १७ जुन १६३३ रोजी दौलतबादचा किल्ला जिंकूण निजामशाही नष्ट केली. परंतू शहाजी राजे यांनी त्यानंतर दोन-तिन वर्ष मोगलांशी संघर्ष सुरु ठेवला.[२०] परंतू शहाजी राजे निजामशाही वाचवू शकले नाही. मोगलांनी आदीलशाहाच्या मदतीने निजामशाही नष्ट केली. परीणामी शहाजी राजे आदिलशाहीच्या सेवेत गेले. त्यावेळी आदिलशाहाने शहाजी महाराजांना महाराष्ट्रात न ठेवता कर्नाटकात पाठवीले.[२१] शहाजी राजे आदीलशाहाच्यावतीने कर्नाटकात कामगीरीवर असता पूत्र शिवाजी पुण्याकडे होता. यावेळी शिवाजीने घाटमाथा वरील काही किल्ले जिंकले. परंतू शिवाजी यांचे हे कृत्य आदीलशाहीला सहन झाले नाही. परीणामी आदीलशाहाने २५ जुलै १६४८ रोजी राजे शहाजी यांची मालमत्ता जप्त केली. तसेच १६ मे १६४९ रोजी शहाजी राजे यांना कैद केले. अशावेळी शिवाजी यांनी मोगलांच्या सहाय्याने आपल्या वडीलांची सुटका केली.[२] भोसले घराण्यांतील अशा कर्तृत्ववान शहाजी राजाचा

इ. स. १६६४ मध्ये मृत्यू झाला. शहाजी हा एक फार चतूर, मुत्सदी आणि महत्वाकांक्षी पुरुष होता.[२३] त्याने निजामशाही आणि अदिलशाही मुलूखातील सुमारे २० लाख ७० हजार पगोडा (दोन) उत्पन्नाचा प्रदेश मिळविला होता. शहाजी राजे यांच्याजवळ सुमारे ३००० घोडदळ होते. त्या आधारे राजे शहाजी यांनी दक्षिणेच्या राजकारणात आपले वर्चस्व सिध्द केले होते.[२४] शहाजी राजे यांच्या कर्तबगारीमुळेच शिवाजीला हिंदवी स्वराज्याची प्रेरणा मिळाली.[२५] पुढे शिवाजी यांने प्रेरणा घेऊन स्वराज्य निर्माण केले. मात्र शिवाजीला मराठी सत्तेचा संस्थापक म्हटल्यास शहाजी राजे यास राज्य संकल्पक म्हणणे अशियोक्ती होणार नाही.[२६]

### १.२.१ शिवकाळ

शहाजी राजे यांना दोन पत्नी होत्या जिजाबाई व तुकाबाई. जिजाबाईचा जन्म इ. स. १६०४ मध्ये झाला.[२७] शहाजी राजे व जिजाबाई यांचा विवाह निजामशाहाचे मार्फतीने दौलताबाद येथे संपन्न झाला.[२८] शहाजी राजे यांचा दूसरा विवाह तुकाबाईशी झाला. राजे शहाजी यांना तुकाबाईस व्यंकोजी नावाचा पुत्र झाला.[२९] शहाजी राजे यांना संभाजी, व्यंकोजी व शिवाजी ही तिन पुत्रे होती. तिनही पुत्रे पुढे नावारुपास आली.[३०] जेव्हा शहाजी राजे आपल्या अस्तित्वासाठी मुस्लीम सत्तेशी लढा देत होते त्यावेळी १९ फेब्रुवारी १६३० रोजी शिवनेरी गडावर शिवाजीचा जन्म झाला.[३१] शिवाजीला घडविण्यांचे कार्य माता जिजाबाईनी केले. जिजाबाई ही शिवाजीची केवळ माताच नव्हे तर प्रेरक शक्तीही होत्या[३२] त्यांच्या विचाराचा प्रभाव शिवाजीवर पडला. शिवाजीला लहानपणी बौध्दीक शिक्षणाबरोबर लष्करी शिक्षण देण्यांत आले.[३३] सन १६४०-४१ मध्ये शिवाजी राजे आपल्या वडीलांकडे बंगलोरला गेले. बंगलोरहून पुण्यात परत आल्यानंतर शिवाजीच्या लक्षात आले की, ज्यांच्याकडे किल्ले असतील त्यांचेच राज्य आणि म्हणून स्वराज्याची स्थापना करावयाची असेल तर या प्रदेशातील किल्ले ताब्यात घेतले पाहिजे.[३४] याकाळात शिवाजीच्या मनात स्वराज्याची कल्पना उदयाला येवून इ. स. १६४७ पासून स्वराज्याच्या कार्याला गती मिळाली. कारण ७ मार्च १६४७ रोजी दादोजी कोंडदेवाचा मृत्यू झाला. तेव्हापासुन राजे शहाजीच्या जहागिरीची सर्व जबाबदारी

शिवाजीकडे आली. आणी खऱ्या अर्थाने स्वतंत्र वृत्तीने शिवाजीने स्वराज्य स्थापनेचा उद्योग हाती घेतला.[३५]

बालवयात शिवाजीने अनेक मित्र जमविले होते. त्यांच्या मदतीने शिवाजीने स्वराज्याच्या कार्यास सुरुवात केली. प्रारंभी आपल्या जहागीरीला लागुन असलेले प्रदेश त्यांनी जिंकले. त्यानंतर शिवाजी यांने जावळी प्रदेशाकडे लक्ष केंद्रित करुन सन १६५६ साली जावळी प्रदेशावर आक्रमण केले.[३६] यावेळी झालेल्या संघर्षात चंद्रराव मोरे मारला गेला. परीणामी जावळीतून मोऱ्यांचे उच्चाटन झाले.[३७] जेव्हा 'चंद्रराव मोरे' शिवाजीने बुडविल्याची बातमी आदिशाहीच्या बडी बेगम साहीबाला समजली तेव्हा त्या चिंताग्रस्त बनल्या.[३८] परीणामी शिवाजी महाराजांच्या वाढत्या मोहीमा व राज्यविस्ताराला आळा घालण्यासाठी विजापूर दरबारातील बलाढय सरदार अफजल खान यांची शिवाजी महाराजांविरुध्द नेमणूक केली.[३९] अशाप्रसंगी न घाबरता शिवाजी यांनी अफझलखानाला भेटण्याची तयारी केली.[४०] यावेळी शिवाजीने आपले सगळे बेत शहाजीच्या जहागीरीतच ठरविले. खानाच्या प्रचंड फौजेशी उघडरितीने लढाई करुन आपला निभाव लागणार नाही असे दिसताच, शिवाजी यांने पत्र पाठवून खानास प्रतापगडावर बोलाविले.[४१] तेव्हा प्रतापगडाच्या पायथ्याशी १० नोव्हेबर १६५९ रोजी शिवाजी व अफझलखान यांची भेट झाली. झालेल्या भेटीत शिवाजीने अफझलखानाचा वध केला.[४२] यावेळी अफझलखान वाईट हेतुने महाराजांना संपविण्यासाठी आला होता मात्र कटात तोच फसला.[४३] अफझलखानाचा वधामुळे हिंदवी स्वराज्यास बळकटी आली.[४४]

अफजलखानाच्या वधानंतर शिवाजी महाराज यांचे मनोधैर्य वाढतच गेले. तेव्हा मोगल बादशाहा औरंगजेब यांनी शिवाजी महाराज्यांच्या राज्य विस्ताराला पायबंद घालण्यासाठी शाहीस्तेखान यास दक्षिणेत पाठविले.[४५] प्रचंड सैन्यासह २४ ऑक्टोबर १६६० रोजी शाहिस्तेखान पुण्यास आला.[४६] त्याने आपल्या सैन्याच्या सहाय्याने पुण्याच्या आजुबाजूचा प्रदेश बेचिराख करण्याचा सपाटा लावला असता शिवाजीने शाहिस्तेखानावर छुपे हल्ले सुरु केलेत. परंतू त्याचा शाहिस्तेखानाच्या मोहिमेवर काहीही परीणाम होत नव्हता. तेव्हा शिवाजी यांनी एक धाडसी निर्णय घेतला आणि तो म्हणजे खुद शाहिस्तेखानावर छापा टाकण्याचा. त्यानूसार ५ एप्रिल १६६३ रोजी रात्रीला अचानक शिवाजीने शाहीस्तेखानावर छापा टाकला.[४७] मध्यरात्री छापा घालुन शिवाजी यांनी

शाहीस्तेखानाचा बोजवारा उडवला.[४८] यावेळी झालेल्या हल्यात स्वत: शाहिस्तेखान जखमी झाला. हल्यानंतर अपमानित झालेला शाहीस्तेखान १ डिंसेबर १६६३ रोजी महाराष्ट्रातून निघुन गेला.[४९]

शाहीस्तेखानावर छापा टाकल्यानंतर शिवाजीने मोगल बादशहा औरंगजेबला आणखी एक धक्का दिला. जानेवारी १६६४ मध्ये शिवाजी यांनी सुरत शहराची लुट केली.[५०] ही लुट ६ जानेवारी ते १० जानेवारी १६६४ या कालावधीत केल्या गेली.[५१] मोगल बादशाहीची आर्थिक नाक असलेल्या सुरत शहराच्या लुटीमुळे बादशाहा औरंगजेब संतप्त झाला. परिणामी शिवाजीचा बंदोबस्त करण्यासाठी आपल्या दरबारातील पराक्रमी सरदार मिर्झा राजे जयसिंग व दिलेरखान यांना महाराष्ट्रात पाठविले.[५२] यावेळी औरंगजेबाने राजा जयसिंग यास प्रचंड सैन्य, भरपुर द्रव्य आणि जवळ जवळ सर्वाधिकार देऊन दक्षिणेत पाठविले.[५३] मिर्झा राजे जयसिंग हा पराक्रमी व मुत्सद्दी सरदार होता. महाराष्ट्रात आल्यानंतर जयसिंगाने पुरधंरच्या किल्यास वेढा दिला. त्यावेळी मराठयांनी अनेक दिवस किल्ला लढविला. परंतू परिस्थिती प्रतिकूल आहे हे ओळखून शिवाजीने मिर्झा राजे जयसिंगाशी तहाची बोलणी केली. शेवटी दोघात तडतोड होऊन १२ जून १६६५ रोजी पुरंधरचा तह झाला.[५४] पुरंधरचा तहात खालील अटी मान्य करण्यांत आल्या.

१. शिवाजी महाराजांनी आपले २३ किल्ले मोगलास द्यावे. शिवाय चार लाख होनाचा वार्षीक उत्पन्नाचा प्रदेश द्यावा.

२.शिवाजी महाराजाकडे १२किल्ले व त्याखालील एकलाख होनाचा प्रदेश राहील.

३. संभाजी राजे यांस पाच हजार मनसब घेऊन त्यास जयसिंहाजवळ ठेवावे.

४.शिवाजी महाराजांने आदिलशाहीविरुध्द मोगलास मदत करावी.[५५]

पुरंधरचा तह झाल्यानंतर शिवाजी राजाने मोगल बादशाहाची भेट घ्यावी असे मिर्झा जयसिंह यास वाटू लागले. तेव्हा परिस्थितीने शिवाजीला आग-याला जाण्यास भाग पाडले. १६६६ मध्ये शिवाजी राजे पुत्र संभाजीसह आग्रास गेले. मात्र मोगल बादशाहा औरंगजेबाने त्यांना कैद केले.[५६] परंतू शिवाजी महाराजानी तेथून युक्तीने स्वत:ची सुटका केली. १७ ऑगष्ट १६६६ रोज शुक्रवारला पेठाऱ्यात बसुन शिवाजी आग्राहून पळाले.[५७] शिवाजी महाराजांची आग्रा येथून झालेली सुटका हा एक सदैव आश्चर्यकारक करुन सोडणारा प्रसंग आहे.[५८]ही घटना शिवाजी राजे

यांचेसंकटातही विचारचक्र न थांबता त्यावर मात करण्यांची युक्ति त्यांना सुचत होती. त्यामुळे ते कोणत्याही संकटावर मात करीत असत.

आग्रा येथून परत महाराष्ट्रात आल्यानंतर शिवाजीने ताबडतोब मोगलांविरुध्द युध्द पुकारले. सन १६७० नंतर त्यांने मोगलांवर हल्ले करून पुरंदर तहाने गामाविले सर्व किल्ले व प्रदेश परत जिंकलेत.[५८] त्यानंतर शिवाजी राजे यांनी आपल्या राज्याची घडी निट बसविली व रायगडावर स्वतःचा राज्याभिषेक सोळला साजरा केला. सन १६७४ रोज शुक्रवारला तीन घटिका रात्र उरली तेव्हा राजे सिंहासना आरुढ झाले.[५९] अशाप्रकारे स्वराज्य स्थापन करुन रयतेचे राज्य छत्रपती शिवाजी महाराजांनी निर्माण केले.[६०] राज्याभिषेकानंतर उत्तरोत्तर मराठा राज्य वाढतच गेले. याविषयी डॉ. दीक्षित म्हणतात, 'इ. स. १६७४ ते इ. स.१७९५ हया काळात मराठयांचे साम्राज्य वाढत गेले. हा एवढा काळ म्हणजे मराठा काळ होय.'[६१] शिवाजी महाराजांनी राज्याभिषेकावेळी 'हिंदवी स्वराज्य व्हावे. ही श्रीचीच इच्छा आहे.' अशी घोषणा दिली आणि मराठयांच्या मनात प्रचंड आत्मविश्वास निर्माण केला.[६२] या राज्याभिषेकाने हिंदुना राजा मिळाला व आता पर्यत जो समाजाज समज की, परशूरामाने अनेक जन्म घेवून पृथ्विवरील क्षत्रिय नष्ट केले त्या विचार धारेला मुठमाती मिळाली.

राज्याभिषेक सोळल्यानंतर छत्रपती शिवाजी यांनी ६ ऑक्टोबर १६७६ रोजी दिग्विजयासाठी कर्नाटक मोहीम काढली.[६३] यामोहीमेत शिवाजी महाराजांनी अल्पावधीत कर्नाटकातील फार मोठा प्रांत विजीत केला. मात्र छत्रपती शिवाजी महाराज कर्नाटकात गेल्यावर त्यांच्या माघारी शिवाजी पुत्र संभाजी व सरकारी कारकुन यांच्यात मतभेद निर्माण झालेत. परिणामी संभाजी राजे श्रृंगारपुरीला येऊन स्थायीक झाले. छत्रपती शिवाजी कर्नाटक मोहीम यशस्वी पार पाडून रायगडावर आले तेव्हां त्यांना रायगडावरील साऱ्या घटना समजल्या. परीणामी महाराजांना संभाजीची काळजी वाटू लागली. तेव्हां शिवाजी महाराज यांने संभाजीला समर्थ रामदास स्वामी यांच्याकडे पाठविण्यासंदर्भात उपदेश केला. मत्र निराश होऊन संभाजी डिसेंबर १६७८ मध्ये सज्जनगडावर निघूण गेले.[६४] कर्नाटक मोहीमेहून परत आल्यानंतर शिवाजी महाराजांना काही घरगुती कारणास्तव मनस्तापही झाला. याचवेळी शिवाजी महाराजांना अल्पकाळ ताप येऊन ज्वर झाला व ४ एप्रिल १६८० रोजी शिवाजी महाराजांचा मृत्यू झाला.[६५]

शिवाजी महाराजांचा मृत्यू झाला असला तरी त्यांच्या नंतर मराठा सत्ता वाढतच गेली. कारण हिंदू पदबातशाहीची महत्वकांक्षा हा महान वारसा महाराजांनी पुढील पिढीला दिला होता. डॉ. दीक्षित या विषयी म्हणतात, "मराठेशाहीच्या शेवटपर्यंत मराठी मंडळीच्या दृष्टीसमोर हीच एक आकांक्षा होती. छत्रपती संभाजी महाराज, राजाराम महाराज, महाराणी ताराबाई, पुण्यश्लोक शाहु महाराज, श्रीमंत बाळाजी विश्वनाथ, थोरले बाजीराव, चिमाजी आप्पा, नानासाहेब, थोरले माधवराव, स्वामी माधवराव, नाना फडणीस, महादजी शिंदे, अहल्याबाई होळकर, यशवंतराव होळकर इत्यादी आदीनी यांच हेतुने, हे कार्य सिध्दीसाठी प्रयत्न केले. मराठयांची ही अखिल भारतीय दृष्टी अत्यंत महत्वाची होती."[६६] आणी हे खरे ही होते, कारण यानंतरच्या काळात मराठा सत्ता उत्तरोत्तर वाढतच गेली. पेशवाईच्या काळात तर मराठा सत्तेचा झेंडा अटकेपार फडकला होता.

### १.२.२ छत्रपती संभाजीचा कालखंड

छत्रपती शिवाजी यांना दोन पुत्र होते. थोरला पुत्र संभाजी तर धाकटा राजाराम. शिवाजी महाराजाचा थोरला पुत्र संभाजी हा सईबाईच्या पोटी जन्मला. संभाजीचा जन्म १४ मे १६५७ रोजी पुरंदर किल्यावर झाला.[६७] तर छत्रपती शिवाजीचा धाकटा पुत्र राजाराम हा सोयराबाईच्या पोटी जन्माला आला. राजारामाचा जन्म २४ फेंब्रुवारी १६७० रोजी राजगडावर झाला. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर छत्रपती हे पद ज्येष्ठपुत्र या नात्याने संभाजीला मिळावयास हवे होते. परंतू रायगडावर सोयराबाईने आपला पुत्र राजाराम यास छत्रपती घोषीत केले व त्यांचा मंचकारोहण सोहळाही केला.[६८] महाराजांच्या मृत्यूसमयी राजपुत्र संभाजी पन्हाळागडावर होते.[६९] त्यांना रायगडावरील कटाची वार्ता समजताच ते आपल्या सहकार्यासह १८ जुन १६८० रोजी रायगडवर आले. वास्तविक पाहता शिवाजी महाराजांनी संभाजी राज्यास शेवटच्या क्षणी क्षमा केली होती. मात्र अनेकांच्या मनात अजूनही संभाजी विषयी शंका होती. त्यातच २६ जुन १६८० रोजी संभाजीने येसाजी कंक व रायगडाचा किल्लेदार चांगोजी काटकर यांच्या मदतीने रायगड ताब्यात घेतला व कारभार सुरु केला.[७०] आपल्या कारकिर्दीत संभाजी राजे यांना इ. स.१६८० ते १६८९ या काळात

आपल्या अंतर्गत शत्रूंशी लढावे लागले.[७१] याचकाळात बादशाहा औरंगजेबाजाचा पुत्र अकबर दक्षिणेत आला. संभाजी महाराजांसोबत मैत्री करण्याचा व त्यांची मदत घेण्याचा त्यांचा उद्देश होता.[७२] मात्र राजे संभाजी त्यास मदत करु शकले नाही. यावेळी राजे संभाजीचा सर्व कारभार व्यवस्थित सुरु असताना १३ नोव्हेंबर १६८१ रोजी रायगडावर एक भंयकर वार्ता येऊन पोहचली. मोगल बादशाहा औरंगजेब तिन लाख सैन्यासह बृहानपुरला येवून पोहचल्याची. राजपुत्र अकबराच्या पाठोपाठ स्वत: मोगल बादशाहा औरंगजेब यांने दक्षिणेची मोहीम हाती घेतली होती.[७३] यावेळी मोगल बादशाहा औरंगजेब स्वत: फौज घेऊन दक्षिण देश जिंकण्यासाठी आला होता.[७४] महाराष्ट्रात आल्यानंतर औरंगजेबाने अहमदनगर येथे आपली छावनी केली.[७५] बादशाहा सोबत यावेळी लढाऊ फौज ६० हजार घोडदळ व एक लक्ष पायदळ होते. शिवाय ओझ्या करिता ५० हजार उंटे व ३ हजार हत्ती होते.[७६] नोकर-चाकर, व्यापारी इत्यादी सर्व मिळून बादशाहा बरोबर ५ लाख मनुष्य होते. कदाचित हे अतिशयोक्ती जरी वाटत असले तरी बादशाहाच्या छवणीत एकंदर २५० बाजार असुन तिचा विस्तार सुमारे तिस मैलापर्यंत होता.[७७] महाराष्ट्रात आल्या नंतर बादशाहा औरंगजेब यांनी पहिले विजापुर व भागानगडाकडे आपला मोर्चा वळविला. कारण ते कधिकधि संभाजीला मदत करीत असत.[७८] यावेळी विजापूरच्या गादीवर असलेला आदिलशाहा सिंकदर हा फक्त सोळा वर्षाचा होता.[७९] परिणामी आदिलशाही मोगली सैन्यापुढे टिकु शकली नाही. परीणामी १३ सप्टेंबर १६८६ रोजी आदिलशाहाने शरणागती पत्करली.[८०] अशाप्रकारे २२ सप्टेंबर १६८६ रोजी विजापूरचे राज्य संपुष्ठात झाले.[८१] यावेळी मोगलांनी पराभूत सिंकदर अदिलशाहाला दौलताबादच्या किल्यात कैद करुन ठेवले. पुढे इ. स. १७०७ मध्ये विष देऊन त्याला ठार करण्यांत आले.[८२]

अशाप्रकार आदिलशाहीचा बंदोबस्त केल्यानंतर मोगलांनी कुतूबशाहाच्या भागानगरावर ताबा मिळविला.[८३] निजामशाही व आदिलशाही हया दोन सत्ता नष्ट झाल्यामुळे दक्षिणेत एकच प्रबळ सत्ता उरली होती ती मराठयांची. त्यामुळे मोगलांना मराठयांचा राजा छत्रपती संभाजी यांचा बंदोबस्त करणे एवढेच काम शिल्लक राहीले होते.[८४] तेव्हा मोगल बादशाहा औरंगेबाज यांनी आपली सर्व शक्ती छ. संभाजी विरुध्द लावली.[८५] मराठयांचा राजा संभाजी यावेळी सिद्दीसी लढा देत होते. राजे संभाजी यांनी यावेळी सिद्दीचा जंजीरा जिंकण्यासाठी शर्थीचे प्रयत्न केले. परंतू ओरंगजेब यांच्या

दक्षिणेतील आगमणामुळे राजे संभाजीला सिद्दी विरुध्दची स्वारी आटोपती घ्यावी लागली. त्यानंतरच्या काळात छत्रपती संभाजीला मोगल बादशाहासी सलग ८-९ वर्ष लढा दयावा लागला. मोगलांशी संघर्ष करित असतानाच छत्रपती संभाजी व कवी कलश १ फेब्रुवारी १६८९ रोजी संगमेश्वर येथे पकडले गेले.[८६] संभाजीला कैद केल्यानंतर १५ दिवस संभाजीला अपमानीत करण्यात आले. त्यानंतर औरंगजेबाच्या छावणीसोबत संभाजी यास भीमा नदीजवळील कोडेगांव येथे आणण्यात आले[८७] यावेळी मोगलांनी राजे संभाजी यांना अनंत यातना दिल्यात. त्याविषयी डॉ. दीक्षित म्हणतात, "राज्यांचे डोळे काढण्यांत आले. जिभ कापण्यांत आली, हात तोडण्यांत आले, पेटते पलिते अंगाला लावण्यांत आले. महाराजांच्या अड्डितिस धैर्याला, सहनशिलता ध्येय निष्ठेला तोड नव्हती."[८८] मोगल बादशाहा औरंगजेब यांने छत्रपती संभाजीचा अतिशय छळ केला. शेवटी ११ मार्च १६८९ रोजी अतिशय क्रुरपणे छत्रपती संभाजी व कवीकलश यांना ठार करण्यात आले.[८९]

राजे संभाजीला मारण्यापुर्वी मोगलांनी त्यांचे मोगलांनी जे हाल केले होते त्याचे वर्णन डॉ. शेख अफरोज करतात, " उनका एक एक अंग काटा गया और मॉस कुत्तों को डाल दिया गया। उनके कटे हुये सिरो मे भुसा भर दिया गया और दक्षिण के मुख्य नगरोते ढोल औरे बाजे बजाते हुये उनका प्रदर्शन किया गया।"[९०] अर्थात अनंत याना सहन करीत संभाजी राजे यांने हुत्तात्म पत्करले. काही दिवसानंतर संभाजीच्या मृतदेहावर तुळजापूर येथे अंतिम संस्कार करण्यांत आले. जिथे भिमा आणि इंद्रायणी नद्याचे संगम आहे.[९१] मात्र संभाजी महाराजांच्या दिव्य हौतात्म्यामुळे मराठाशाहीला संजीवनी, चैतन्य प्राप्त झाले.[९२] त्यानंतरच्या काळात अशा महान पराक्रमी संभाजी राजे यांचे स्वाभिमानी जीवन विसरणे मराठयांना अशक्य झाले. मराठयांच्या राजा संभाजी यांच्या मृत्यूविषयी कस्तुरे म्हणतात, "जल्लादांनी संभाजी राजांची अन् कवि कलशांची कमळाच्या देठासारखी मान धडापासून कायमची वेगळी केली. शिवछत्रपतींचा पराक्रमी पूत्र कवी भुषणाच्या 'सर्जा' चा 'छावा' महाराष्ट्राचा तरुण छत्रपतीं हे जग कायमचं सोडून गेला."[९३]

### १.३ मराठ्यांचे स्वातंत्र्य युध्द (इ. स. १६८९ - इ. स. १७०७)

संभाजी राजाला पकडून मोगल बादशाहानी अतिशय कृरपणे ठार केले. तसेच संभाजीचा पुत्र आणि मराठा राजाचा वारसदार शाहु राजे आणि पत्नी येसूबाई यांना कैद करुन मोगलांनी आपल्या ताब्यात घेतले होते. अशाप्रकारे मोगल बादशाहा औरंगजेब मराठाशाहीत अस्थिरता निर्माण करण्यांत यशस्वी झाला होता. परंतू मराठी मुत्सद्दी आणि सेनानी यांनी शिवाजी राजाचा दुसरा पुत्र राजाराम यांचा रायगडावर मंचकारोहन करुन मोगलांविरुध्द स्वातंत्र्य युध्द पुकारले.[९४]

मोगल बादशाहाने अतिशय क्रूरपणे छत्रपती संभाजीचा वध केल्याने महाराष्ट्रीयन जनता अत्यंत संतप्त झाली. परीणामी त्यांनी आपल्या छत्रपतीच्या हत्येचा सूड घेण्याचे ठरविले. यावेळी लहान-मोठ्या सरदारांनी प्रतिज्ञा घेतली की, संभाजीचा वध, महाराणी येसूबाई व पुत्र शाहूची अटक हा आपला अपमान आहे आणि म्हणून आपण त्याचा बदला घेतला पाहीजे.[९५] या परीस्थितीचे वर्णन करताना इतिहासकार बिरादार म्हणतात, "संभाजीच्या वधानंतर मराठयांचे राज्य नष्ट झाल्यासारखे वाटले. परंतू त्यातून एक नविन संघर्षाला प्रारंभ झाला. राजाराम महाराज व महाराणी ताराबाई यांच्या नेतृत्वाखाली महाराष्ट्रात एक असामान्य लोक युध्द घडून आले. त्यास मराठयांच्या इतिहासात 'मराठयांचे स्वतंत्र्य युध्द' म्हटले जाते."[९६] याकाळात मराठे मिळेल त्या शस्त्रांनी मोगलांशी लढत होते.

#### १.३.१ छत्रपती राजाराम महाराज कालीन मराठा- मोगल संघर्ष :-

छत्रपती संभाजीस मोगलांनी पकडल्यानंतर १२/०२/१६८९ रोजी शिवाजी महाराज यांचा धाकटा पुत्र राजाराम यास छत्रपती म्हणून घोषीत करण्यात आले.[९७] दरम्यान औरंगजेबाने आपला सेनापती जुल्फिकारखान यास मराठयांची राजधानी रायगड जिंकण्यासाठी पाठविले. रायगडाजवळ येवून २५ मार्च १६८९ रोजी जुल्फिकारखान याने रायगडास वेढा दिला. मात्र रायगडचा किल्ला मोगलांना सहजासहजी मिळणे कठीण होते. कारण मराठा किल्लेदार चांगोजी काटकर व येसाजी कंक किल्ला लढवित होते.[९८] मोगलांनी किल्ल्यास वेढा दिला असतांनाच महाराणी येसुबाईने राजाराम महाराज यास कर्नाटकास जिंजीला रवाना केले. तर रामचद्रपंत अमात्य यास 'हुकूमतपन्हा'

ही पदवी देऊन युध्दाची जबाबदारी त्यांच्याकडे सोपविली.[९९] रामचंद्रपंत हे शिवाजी महाराजाच्या काळात अनुभव मिळवून मराठा सत्तेच्या पडत्याकाळात मराठेशाही सांभाळणारे थोर मुत्सद्दी पुरुष होते.[१००]

राजाराम महाराज रायगडावरुन कर्नाटकाकडे निघाल असे समजताच औरंगजेब यांनी सदूल्लाखान नावाच्या सरदारास राजाराम महाराजास पकडण्यासाठी पाठविले. मात्र सदूल्ला- खान पन्हाळयास पोहचण्यापुर्वीच राजाराम महाराजाने जिंजीकडे पलायन केले होते.[१०१] यावेळी राजाराम महाराजांसोबत खंडो बल्लाळ, परशुराम प्रतिनिधी, शंकराजी नारायण सचिव, वासुदेव रामचंद्र अमात्य इत्यादी मातब्बर मंडळी होती. मात्र मोगलांचा जिंजीला वेढा पडण्यापुर्वीच रामचंद्र यास राजाराम महाराजाने महाराष्ट्रात पाठवून दिले[१०२]

मोगल सेनापती जुल्फिकार खान यांनी रायगड किल्ला आवळला होता. जर मोगलांनी आक्रमण करुन किल्ला घेतल्यास गडावर कत्तल केल्या जाईल शिवाय स्त्रियांची अब्रु घेतली जाईल. परिणामी राणी येसूबाईनी रायगडचा किल्ला मोगलांच्या स्वाधिन केला.[१०३] जुल्फिकार- खान यांने रायगडचा किल्ला ताब्यात घेतल्यानंतर महाराणी येसूबाई व राजपुत्र शाहु यासह २०० मराठयांना कैद केले. यानंतर जवळ जवळ ३० वर्ष येसुबाई मोगलांच्या कैदेत होती.[१०४] अशाप्रकारे महाराणी येसूबाई व पुत्र शाहु मोगलांचे कैदी बनले. मात्र राजाराम महाराज कर्नाटकात गेल्याने त्यास पकडण्यासाठी मोगल बादशाहा औरंगजेबाने जुल्फिकारखान यास जिंजीकडे रवाना केले.[१०५] जुल्फिकारखान ससैन्य जिंजीला पोहचला व त्यांने चारहीबाजूंनी जिंजीच्या किल्यास वेढा दिला. मात्र अजिंक्य असलेला जिंजीचा किल्ला मोगल इ. स. १६९८ पर्यंत जिंकू शकले नाही.[१०६]

मोगल बादशाहा औरंगजेब यांनी यावेळी संपुर्ण मराठा राज्यभर आक्रमण करण्याचा आणि ते नष्ट करण्यांचा मनसुबा रचला होता. परंतू त्याला शह देण्याचा कार्यक्रम रामचंद्रपंताने आखला, त्यासाठी आवश्यक सैन्याची जमवाजमव केली, आणि संताजीच्या सहाय्याने मोगलांनी जिंकलेले किल्ले परत जिंकुण घेण्यांचा सपाटा चालविला.[१०७] याकाळात त्र्यंबक प्रतिनिधी, परसोजी भोसले इत्यादी मराठा सरदार मोगलांविरुध्दच्या युध्दात महत्वाची भुमिका बजावित होते. याकाळात मराठयांनी गनिमी काव्याच्या सहाय्याने मोगलांना जेरीस आणले. संताजी घोरपडे व धनाजी जाधव

यांनी महाराष्ट्र ते जिंजीपर्यंतच्या प्रदेशात मोगलांच्या सरदारांचा अनेक वेळा पराभव केला. याकाळात मराठा स्वातंत्र्य व राजाराम महाराज यांचे संरक्षण करण्यांचे कार्य धनाजी जाधव व संताजी घोरपडे यांनी केले.[१०८] संताजी व धनाजी यांनी राजाराम महाराज जिंजिला गेल्यानंतर महाराष्ट्रात मोगली सैन्याना ससेहोलपट केले होते. संताजीच्या सैन्याची तर मोगली फौजांना भीती वाटू लागली.[१०९]

याकाळात मोगलांचा कर्नाटकात जिंजी किल्याभेवती कडक बंदोबस्त असतांना सुध्दा छत्रपती राजाराम किल्यातून बाहेर पडले. आणी अतिशय जलद गतीने ३० डिसेंबर १६९८ रोजी महाराष्ट्रत परत आले[११०] राजाराम महाराज साता-याला मंगळोईच्या किल्यावर आले व त्यांनी तेथेच आपली राजधानी हलविली. त्यामुळे किल्ले सातारा आता मराठयांची नवी राजधानी बनली.[१११] महाराष्ट्रत आल्यानंतर राजाराम महाराजाच्या सैन्याने मोगलांना सळो की पळो करुन सोडले. मराठयांच्या हल्यामूळे मोगल अगदी हैराण झाले होते.[११२] मात्र शारिरीकदृष्टया कमकुवत असलेल्या राजाराम महाराजाना दगदग सहन होऊ शकली नाही. त्यामुळे ३ मार्च १७०० रोजी राजाराम महाराजांचा मृत्यू झाला.[११३] मराठा- मोगल संघर्ष हा सर्व मराठा जनतेचा संघर्ष होता. याकाळात लढल्या गेलेल्या संघर्षाविषयी डॉ. दीक्षित म्हणतात, "या काळात लढले गेलेले युध्द केवळ भोसल्यांचे नव्हते तर सर्व मराठयांचे होते."[११४]

हे खरे होते कारण एका छत्रपतीची, दुसरा छत्रपती कधि या किल्लावर तर कधि त्या किल्लावर, कधि महाराष्ट्रात तर कधि कर्नाटकात अशा व मराठे मिळेल या शस्त्रनिशी मोगलांशी लढत होते. आणि म्हणून हे युध्द केवळ छत्रपतचे नव्हे तर मराठयांचे होते.

### **१.३.२ महाराणी ताराबाईकालीन मराठा- मोगल संघर्ष :-**

राजाराम महारांजाच्या मृत्यूनंतर आता राज्याचे काय होणार असा प्रश्न पडला. मोगलांचा महाराष्ट्राभोवती जणू फास आवळला गेला होता. छ.राजाराम महाराजांचे अकाली निधन झाले. तर महाराणी येसूबाई व शाहु राजे मोगलांचा कैदेत होते.[११५] परंतू महाराणी ताराबाईने आपला पुत्र शिवाजी दुसरा यास गादीवर बसविले. शिवाजी दुसरा अल्पवयीन असल्यामुळे राज्याची सर्व सुत्रे

महाराणी ताराबाईनी आपल्या हाती घेतली.[११६] यानंतरच्या काळात शिवाजी दुसरा यांच्या वतीने मराठी राज्याचा सर्व कारभार महाराणी ताराबाई पाहु लागली. अशा स्थितीत रामचंद्रपंताने आपला संपूर्ण पाठींबा ताराबाईस जाहीर केला.[११७] त्यामूळे इ. स. १७०७ मध्ये शाहु महाराज परत येईपर्यंत महाराष्ट्राचा लढा महाराणी ताराबाई तसेच परशुराम प्रतिनिधी आणि रामचंद्र अमात्य यांच्या नेतृत्वाखाली सुरु होता.[११८] राजाराम महाराजांच्या मृत्यूनंतर महाराणी ताराबाईनी सतत ७ वर्षे मोगलांविरुध्द लढा दिला. महाराणी ताराबाई बुध्दीमान व धाडसी होती.[११९] मोगल बादशाहा औरंगजेबाने याकाळात मराठयांचे किल्ले जिंकण्यांचे प्रयत्न केले. अनेक किल्ले तर मोगलांनी संपत्ती देऊन मिळविले. मात्र महाराणी ताराबाईने ते किल्ले एकाच वर्षात परत जिंकले. मराठा-मोगल संघर्षात मराठ्यांना सैनिकांची कधिच कमतरता भासली नाही. उलट मोगलांचे सैन्य तुकडयात विभागले गेल्याने त्यांची प्रत्येक तुकडी दोन-तीन हजारापर्यंत राहत असे. अशा तुकडयावर मराठे आक्रमण करीत. शिवाय गनिमी काव्याच्या सहाय्याने मराठे युध्द करीत. रसद लुटणे, वाटा रोखून धरणे, धावपळीची लढाई अशा युध्दनीतीचा मराठयांनी याकाळात अवलंब केला.[१२०] त्यामूळे मोगल सैन्य त्रस्त झाले होते.

महाराणी ताराबाईच्या काळात मराठयांनी संग्रामाचा एक भाग म्हणून नेमाजी शिंदे, खंडेराव दाभाडे, धनाजी जाधव या सरदारांनी तापी, नर्मदा नदी ओलांडून ऐन मोगली मुलुखात स्वाऱ्या केल्या, चौथाई वसुल केली व मोगल अंमलदारांना भंडावून सोडले. दिवसेंदिवस महाराष्ट्राची परिस्थिती बिकट बनत गेल्यामुळे औरंगजेबाने सेनापती जुल्फिकारखानास महाराष्ट्रास परत बोलाविले. जिंजीचा वेढा उठवून जुल्फिकारखान माघारी आल्यामुळे औरंगजेबाचे लष्करी बळ दुप्पट झाले होते. पन्हाळा, विशालगड, सिंहगड, राजगड, तोरणा इत्यादी मराठयांचे महत्वाचे किल्ले त्याने पुढच्या चार वर्षात घेतले.[१२१] मात्र दीर्घकाळ मराठयांशी लढतालढता बादशाहा औरंगजेब त्रस्त झाला होता. संपुर्ण जगभर इस्लामी धर्माचा प्रसार करु पाहणारा औरंगजेब आता पुर्ण थकला होता. त्याचे जर्जर झालेले शरिर ८९ व्या वर्षी काम देईनासे झाले.[१२२]

मोगल बादशाहाने आपल्या आयुष्यातील शेवटची २५ वर्ष मराठयांशी लढण्यात घालविली तरी त्याला मराठयांवर विजय मिळविता आला नाही.[१२३] शेवटी औरंगजेब आपल्या वयाच्या ८९ व्या

वर्षी, कारकिर्दीच्या ५० व्या वर्षी, २० फेब्रुवारी १७०७ रोज शुक्रवारला अहमदनगर येथे मृत्यू पावला. पुत्र आझमशहाने दौलताबाद जवळील खुल्हाबाद येथे औरंगजेबाचा दफनविधी केला. अशा प्रकारे एक महत्वाकांक्षी जीवनाचा अंक समाप्त झाला.[१२४] मोगल बादशाहा औरंगजब यांच्या अपयशाविषयी सरदेसाई म्हणतात,"पंचविस वर्षेपर्यंत दक्षिणेत स्वत: राहुन तो प्रदेश जिंकणाचे त्याने होते तितके प्रयत्न केले पणे येथेही त्याचा मनोरथ विफल झाला."[१२५] त्याचे श्रेय जाते ते महाराणि ताराबाई व मराठा रादार व मराठे यांना. ताराबबाई या काळात जी आक्र मक धोरण स्विकारले त्याला तोठ नाही. कारण पती निधना नंतर एखादया स्त्रिने हताश होवून सुन्न होवुन जिवन व्यतीत केले असते. मात्र महाराणि ताराबाईनी आपल्या अल्पवयीन पुत्रपला गादीवर बसवून सर्व सुत्रे हाती घेतली व मोगलांविरुध्द लढण्यास सज्ज झाली. त्यामुळे मागेलांवर संकटाची मालीका सुरु झाली. कारण महाराणि ताराबाई यांनी महाराष्ट्रात मोगलांशी लढा तर दिलाच पण याकाळात मोगलांच्या वचर्स्वाखलील माळवा सारख्या उत्तरेतील प्रदेशांवर आकृमणे सुरु केलीत. व औरंजबाला त्रस्त केले. शेवटी मराठयांसोबत लढतालढता त्यांना महाराष्टात जग सोडावे लागले...

### १.४ शाहुची सुटका व राजपद :-

मराठा-मोगल संघर्ष सुरु असतांनाच अहमदनगरजवळ मोगल बादशाह औरंगजेब मृत्यू पावला. औरंगजेबाच्या मृत्यूच्यावेळी आज्जमशहा व कामबक्ष दक्षिणेत होते तर बहादूरशहा उत्तर भारतात होता.[१२६] औरंगजेबाच्या मृत्यूनंतर त्याच्या पुत्रात सत्तेसाठी संघर्ष सुरु झाला. दक्षिणेत असलेला आज्जमशहाने दक्षिणेची सुत्रे सेनापती जुल्फिकारखानाकडे दिली व तो उत्तरेस निघाला[१२७] मराठयांनी पंचविस वर्ष झूंज देऊन मोगलांना जेरीस आणले होते. परिणामी मराठे अजिंक्य आहेत, त्यांना युध्दतंत्राने जिंकणे अशक्य आहे असे मोगल मुत्सद्दाना वाटू लागले. म्हणून मराठा शक्तीत फुट पाडण्यांच्या हेतुने त्यांनी राजपुत्र शाहुची सुटका करण्याचा सल्ला बादशाहाला दिला[१२८] यावेळी महाराणी येशुबाई व राजपुत्र शाहु मोगलांच्या कैदेत होते. आज्जमशहाने ८ मे १७०७ रोजी शाहुची सुटका केली.[१२९] शाहु मोगलांच्या कैदेतुन सुटून आपल्या जवळ असलेल्या अल्पसैन्यासह स्वराज्यात परत यावयास निघाले. भिमा तीरावर आल्यावर त्याच्या जवळची

सैन्यसंख्या पाहुन महाराणी ताराबाईच्या मनात विचार आला की संभाजी-येसुबाईचा हा खरा पुत्र आहे या कोणी तोतया आहे.[१३०] शिवाय महाराणी ताराबाई यास शाहुचे दक्षिणेतील आगमण म्हणजे तिच्या सत्तेवर आलेली आपत्ती वाटत होती. तेव्हा महाराणी ताराबाईने 'संभाजीने राज्य गमाविले, राजारामाने अतिश्रमासयास करुन ते राज्य सोडविले.'[१३१] अशी भुमीका घेतली. तसेच शाहु यांने मराठा राज्यावर स्वत:चा हक्क सांगीतला असता, "तुमचा राज्यावर हक्क नाही आणि आम्ही तुम्हांस राज्य देत नाही." अशी भुमीका महाराणी ताराबाईनी घेतली.[१३२] परीणामी दोन्ही गटात संघर्षमय परिस्थिती निर्माण झाली. तेव्हा शाहु यांने महाराणी ताराबाईकडील काही सैनिकांना आपल्या पक्षात आणण्यात यश मिळविले.[१३३] यावेळी ताराबाईने सत्ता आपल्या हाती ठेवण्यासाठी आटोकाट प्रयत्न केले. पण तिच्या पक्षातले लोक शाहु महाराजांच्या पक्षात सामील झाले.[१३४] त्यातुन १२ ऑक्टोबर १७०७ रोजी भिमेकाठी खेड येथे युध्द होऊन बाळाजी विश्वनाथासारख्या सहकार्याच्या मदतीने शाहुने युध्द जिंकले.[१३४अ] खेडच्या युध्दानंतर बाळाजी विश्वनाथ व धनाजी जाधव उघडपणे शाहु महाराजांच्या आश्रयास आले.[१३५] शाहु महाराजांनी याकाळात महाराष्ट्रातील तोरणा, राजगड, चंदनवंदन सातारा इत्यादी किल्ले ताब्यात घेतले.[१३६] त्यानंतर १२ जानेवारी १७०८ रोजी रायगडावर शाहु महाराजांने स्वत:चा राज्याभिषेक केला.[१३७] आणी मराठयांचा छत्रपती या नात्याने आपला राज्यकारभार सुरु केला. मात्र छत्रपती शाहुच्या उदयाबरोबर पेशव्यांचा उदय झाला. नंतरच्या काळात छत्रपती शाहु सर्वस्वी पेशवा व सरदारांवर अवलंबुन राहु लागले. त्यातुन पेशवा शक्तीशाली बनले व तेच सत्तेचे केन्द्र बनले.[१३८] बाळाजी विश्वनाथ भट यांस पेशवा नेमून शाहू महाराजांनी राज्यकारभारची सर्व सूत्रे त्यांच्याकडे सोपविली. आपण केवळ मार्गदर्शनांचे काम केले.[१३९]

## १.५ भट घराणे :-

सहयाद्रिंच्या घाटाच्या पश्चिमेकडे चिपळूण हा भाग अतिशय सुपीक होता. या भागातील उत्तरेच्या दमणगंगेपासुन दक्षिणेच्या तेरेखोल खाडीपर्यंतच्या सव्वा दोनशे कोस लांबीच्या या प्रांतात सावित्री, वसिष्ठी, कुंडलीका, तेरेखोल इत्यादी नद्या वाहतात. हया नद्याच्या आसपास चा प्रदेश अतिशय सुपिक होता. तेथे तांबडी व क्षार असणारी लावण्यास युक्त माती फार आढळते. कोकणात भाताचे पिक मोठया प्रमाणत घेतल्या जात असे. कोळी, आगारी, भंडारी इत्यादिची कोकण भुमी होती. मात्र आलीबाग थळपासनु राजापुरच्या भागात ब्राम्हण राहत होते. त्यातच चित्पावन ब्राम्हणही राहत. ब्राम्हाणाच्या अंगी अनेक गुण होते. परिणामी मुसलमान व हिंदू शासक जोशी, कुळकर्णी, खोत, देसाई, देशमुख यापदावर ब्राम्हणाची नेमणूक करीत असत. त्यापैकी देशमुख हे एखाद्या प्रातांचा प्रमुख राहत असे. कोकणात देशमुखानां देसाई म्हणत.[१४०]

कोकणातील बाणखाडीच्या उत्तरेस श्रीवर्धन हे गांव आहे. जवळच हरिहर हे क्षेत्र. श्रीवर्धन गावात अनेक जातीचे लोक राहत. तसेच चित्पावन ब्राम्हणही राहत. या घराण्याकडे अनेक वर्षापासुन देशमुखी होती त्यामुळे त्यांना तत्कालीन कागदपत्रांत देसाई किंवा देशमुख म्हणत.[१४१] या घराण्यात अनेक पराक्रमी व्यक्ती होवून गेलीत. त्यापैकी बाळाजी विश्वनाथ बाजीराव, रघुनाथराव हे स्वत:ला श्रीवर्धनचे देशमुख म्हणवून घेण्यात धन्यता मानीत.[१४२] दंडराजपुरी प्रांताची देशमुखी भट घराण्याकडे शके १४०० पासुन शके १६०० पावेतो सतत चालत आली होती.[१४३]

### १.५.१ बाळाजी विश्वनाथाचे पुर्वजिवन

महादजीपंत हा बाळाजी विश्वनाथाचा पणजा दंडराजपुरी प्रांताच्या देशमुखीवर होता. महादेवास कृष्णाजी, विसाजी व अंताजी अशा नावाची तीन पुत्रे होती. विसाजीपंतास जानोजी, कृष्णाजी, जर्नादन,बाळाजी व विठ्ठल ही पाच पुत्रे होती.[१४४] त्यापैकी बाळाजी विश्वनाथाचा जन्म इ. स.१६६० च्या सुमारास झाला.[१४५] बाळाजीपंतचा विवाह प्रल्हाद डूबेकरांची बहिण राधाबाईशी लहाणपणीच झाला. राधाबाईला लिहिता, वाचता येत असे. पुष्कळादा राधाबाई राजकारण करी. विशेष म्हणजे तिला सर्व लोक भिऊन राहत असे.[१४६]

राधाबाईला लिहिता, वाचता येत असे. पुष्कळादा राधाबाई राजकारण करी. विशेष म्हणजे तिला सर्व लोक भिऊन राहत असे.[१४६]

विसाजीपंताच्या मृत्युनंतर जानोजी विश्वनाथ यांच्याकडे देशमुखीचा कारभार आला. तर बाळाजी विश्वनाथ चिपळूणच्या मिठागरावर जकात वसूली अधिकारी होता. काही कारणावरून जानोजीला सिद्दीने समुद्रात बुडवून ठार मारले. तेव्हा बाळाजीपंताने मातृभूमीचा त्याग केला असावा असे म्हटले जाते.[१४७] पण हा प्रवाह खरा नाही. मात्र सिद्दीच्या त्रासाला कंटाळून बाळाजी विश्वनाथ श्रीवर्धन सोडून वेळास येथे भानू परिवारा कडे आले.[१४८] सन १६७८-७९ च्या सुमारास बाळाजी विश्वनाथ भट आणि हरि, बाळाजी आणि रामजी हे बंधू कोकण सोडून देशावर आले. तेव्हा बाळाजीने महादेव भानूला आपल्यावर झालेल्या अत्याचाराची माहिती दिली व आता आम्ही घाटावर जात आहोत असे सांगितले. तेव्हा महादेव भानु यांनेही बाळाजी सोबत जाण्याची तयारी केली. त्यानंतर बाळाजी व महादेव भानू साताऱ्यास आले.[१४९] ही मंडळी जेव्हा साताऱ्यास मंगळोई गडावर पोहचली तेव्हा राजाराम महाराज जिंजी किल्ल्यात अडकुन पडले होते. यावेळी सातारा ही मराठयांची राजधानी असून तेथे महाराणी ताराबाई मराठयांचा कारभार पाहत होती.[१५०] बाळाजीपंत जेव्हा महादजी जोशी कडे गेले तेव्हा जोशी यांने बाळाजीस शंकराजी सचिव यांच्याकडे घेऊन गेले. शंकराजी सचिवांने बाळाजीस आपल्या सेवेत ठेवले.[१५१] कोकण सोडून देशांवर आल्यानंतर बाळाजी यांनी विविध पदावर कार्य केले. छत्रपती राजाराम यांच्या कारकिर्दीत बाळाजी पुणे प्रांताचा सरसुभेदार होता[१५२] इ. स. १६८९ च्या आतबाहेर बाळाजी मराठी राज्यांत प्रतिष्ठीत नोकरीवर होता. त्यानंतर इ. स. १६९९ ते १७०१ या कालावधीत बाळाजीपंत पुणे प्रांताचा सुभेदार होता.[१५३] इ. स. १७०४ ते १७०७ पर्यंत बाळाजीपंत दौलताबाचा सरसुभेदार होता.[१५४] सुरवातीच्या काळात बाळाजी हे दंडराजपुरी व श्रीवर्धन या परगण्याचे देशमूख असून त्याला सभासद हे पदही प्राप्त झाले होते.[१५४अ] इ. स. १६८९ ते इ. स. १७०७ या काळात बाळाजी विश्वनाथ हाच काय तो मराठ्यांचा असा एकमेव मुलकी अंमलदार होता की जो वसुली, न्याय-निवाडे, देवस्थाने, इमाने इतकेच काय युध्द मोहीमेवरही जात असे.[१५५] इ. स. १७०७ साली दौलताबादचा सरसुभेदार असतांना बाळाजी विश्वानाथ हे राजाराम महाराजांचे सेनापती धनाजी जाधवांच्या हाताखाली काम करीत असे.

बाळाजी प्रमाणे खंडो बल्लाळ हेही धनाजी जाधवांच्या दिमतीला होता.[१५६] यावरुन प्रारंभी बाळाजी यांनी विवीध जबाबदा-या पार पाडल्यात. मात्र बाळाजीच्या कार्याला वाव मिळाला तो शाहू महाराज यांच्या काळात.

### १.५.२ बाळाजी विश्वनाथास पेशवाई.

राजपूत्र शाहु मोगलांच्या कैदेतुन सुटून आले असता काही व्यक्तीनी त्यास सहकार्य केले. त्यात बाळाजी विश्वनाथ व धनाजी जाधवांचा समावेश होता. त्यांच्या सहाय्याने शाहु महाराजाने खेडच्या युध्दात विजय मिळविला. यायुध्दात बाळाजी विश्वनाथाने महत्वाची भुमिका बजाविली.[१५७] तसेच प्रारंभी छत्रपतीला अनेक समस्यांना सामोरे जावे लागले. त्यावेळी बाळाजी विश्वनाथाने शाहू महाराजांना मदत केली. जुन १७०८ मध्ये धनाजी जाधवांचा मृत्यू झाला.[१५८] तेव्हां शाहु महाराजांनी धनाजीचा पुत्र चंद्रसेन यास आपला सेनापती नियुक्त केले.[१५९] परंतू चंद्रसेन याचा कल महाराणी ताराबाईकडे असल्यामुळे त्याच्यावर नियंत्रण ठेवण्यासाठी महाराजांनी बाळाजी विश्वनाथ यास 'सेनाकर्ते' हे पद दिले.[१६०] कालांतराने सेनापती चंद्रसेन जाधव हा महाराणी ताराबाईस जाऊन मिळाला. त्याचप्रमाणे उदाजी चव्हाण, दमाजी थोरात, खटावकर व कान्होजी आंग्रे इत्यादींनी शाहु महाराजांविरोधी भुमीका घेतली.[१६१] कान्होजी आंग्रे यांनी तर लोहगड, राजमाची धनगड, तुंग, तिकोना हे किल्ले काबीज केले[१६२] अशावेळी आंग्रे यांना शिक्षा करण्यासाठी छत्रपती शाहु यांनी आपला पेशवा मोरोपंत पिंगळे यास पाठविले. मात्र कान्होजीने त्यास पराभूत करुन कैदेत टाकले.[१६३] तेव्हा राज्याचा बंदोबस्त कसा करावयाचा असा पेच शाहु महाराजांसमोर उपस्थित झाला. यावेळी बाळाजी विश्वनाथ खटावकरांवरील मोहीम फत्ते करुन आल्याने बाळाजीची पत वाढली. मात्र कान्होजी आंग्रे व महाराणी ताराबाई यांनी मोगलांकडून कर्नाळा व दुसरे किल्ले जिंकले. तेव्हा शाहु महाराजांने बाळाजीस आज्ञा केली की तुम्ही जर कान्होजी आंग्रे यांचा बंदोबस्त केल्यास आम्ही तुम्हास पेशवाई देऊ.[१६४] अशा संकटसमयी परशुरामपंत प्रतिनिधीने शाहुस आग्रह धरला की, आपण बाळाजी पंतास पेशवाई द्यावी. तसेच परशुराम पंताने शाहु महाराजाना विनंती केली की, 'बाळाजी विश्वनाथ याचकडे फौजेचे वळण आहे, त्यास पेशवाईची वस्त्रे द्यावी. ते बंदोबस्त करतील.'[१६५]

परीणामी पुण्याच्या दक्षिण्ेत आठ मैलावर मुक्काम असता शाहु महाराजाने बाळाजी विश्वनाथ यास १७ नोव्हेंबर १७१३ रोजी पेशवाईची वस्त्रे दिली.[१६६] याशिवाय महाराजांनी बाळाजीस सहामहाल, दोन किल्ले व कान्होजी आंगरे विरुध्द स्वारी करण्याचा आदेश दिला.[१६७]

### १.५.३ बाळाजी विश्वनाथाची कामगिरी :-

पेशवा बाळाजी विश्वनाथाने या संकटकाळी मोठया हिंमतीने कर्ज काढले व सैन्य जमविले. आणि शाहु यांच्या विरुध्द गेलेल्या सर्व सरदारांचा बंदोबस्त केला.[१६८] तसेच शाहुला बाळाजी विश्वनाथ सारखा पेशवा राज्याला मिळाल्यामुळे शाहु महाराजाचा दक्षिण भारत तसेच नंतर उत्तर भारतात दबदबा निर्माण झाला.[१६९]

पेशवाई मिळाल्या नंतर बाळाजी विश्वनाथाने जंजिरेकर हबशी व कान्होजी यांच्यातील संघर्ष मिटविला, मुख्य प्रधान बहिरोपंत पिंगळे यांची सुटका केली. कान्होजीचा बंदोबस्त करुन त्यास सरखेल बनविले. बंडखोर दामाजी थोराताचा बंदोबस्त केला म्हणजे शाहु महाराजाच्या शत्रुंचा बंदोबस्त केला.[१७०] बाळाजी विश्वनाथाने कान्होजी आंग्रे यास शाहु महारांजाच्या पक्षात आणले. या काळात मोगल बादशहापदासाठी दिल्लीत संघर्ष सुरु होता. ८ जुन १७०८ रोजी आज्जमशहाची हत्या करुन बहादुरशहा मोगल बादशहा बनला. मात्र सय्यद बंधुना दिल्लीला ठेवणे धोक्याचे आहे हे ओळखुन बादशहाने सय्यद हुसेनची नेमणूक दख्खनच्या सुभ्यावर केली. यावेळी गुप्तपणे बादशाहा मराठयांच्या मदतीने काटा काढू पाहत आहे असे दिसताच सय्यदने मराठयांकडे मदतीची याचना केली.[१७१] सय्यद हुसेन याने शंकरजी मल्हार नरगंदकर यांच्या मध्यस्थीने इ. स. १७१८ साली मराठयांबरोबर एक तह केला व बादशाहाकडून त्यास मान्यता मिळवून देण्यांची हमी दिली.[१७२] संकटसमयी मराठे कामी पडतील म्हणून सय्यद बंधुनी मराठयांना चौथाई व सरदेशमुखी देण्यांचा करार केला.[१७३] तेव्हा सय्यद बंधूने शाहु महाराज यांच्याकडे फौजेची मदत मागीतली. त्यासाठी दररोज पन्नास हजार रुपये द्यावयाचा करार केला[१७४] छत्रपती शाहुने सय्यद बंधुच्या मदतीसाठी पेशवा बाळाजी विश्वनाथ यास दिल्लीला पाठविले..[१७५] यावेळी दिल्लीतील आपले स्थान टिकवून ठेवण्यासाठी बाळाजी विश्वनाथाच्या नेतृत्वाखाली १५,००० ची फौज घेऊन सय्यद हुसैन दिल्लीत

घुसला.[१७६] परीणामी दिल्लीत संघर्ष घडून आला व मराठयांच्या मदतिने ८ फेब्रुवारी १७१९ रोजी फरुखशियर यास पदच्यूत करण्यांत आले. त्यानंतर मराठयांच्या सहकार्याने सय्यद बंधूने बादशाहा फरुखशियर यास ठार करुन दिल्लीवर महमंदशाहाला गादीवर बसविले. या धामधुमीत बाळाजीने बादशाहाच्या दस्तुरीच्या सनदा- स्वराज्य, चौथाई, सरदेशमुखी आणि बाबती मिळविल्या. बाळाजी विश्ववनाथाची ही सर्वश्रेष्ठ कामगिरी मानली जाते. महाराणी येसूबाई यांची मोगलाच्या कैदेतून सुटका केली.[१७८] त्यानंतर मराठयांच्या सहकार्याने सय्यद बंधूने बादशाहा फरुखशियर यास ठार करुन दिल्लीवर महमंदशाहाला गादीवर बसविले.[१७८] अश्याप्रकारे सय्यद बंधुच्या मदतिला जावून बाळाजी विश्वनाथ योने दक्षिण सुभ्याच्या चौथाई, सरदेशमुखी आणि स्वराज्याची सनद आणली.[१७९]

बाळाजी विश्वनाथ यानी चौथाई सरदेशमुखीची सनद आणल्यामुळे इतके दिवस मराठे लुटालूट करुन ज्या गोष्टी मिळवित होते, त्याला कायदेशिरपणा आला. या सनदेमुळे दक्षिणेतील सहा सुभ्यां मध्ये मराठयांना शेकडा २५ टक्के व सरदेशमुखी शेकडा दहा टक्के वसुल करण्यांचा हक्क अगदी कायदेशिर पणे प्राप्त झाला[१८०] या सनदेसंदर्भात अ. रा. कुळकर्णी म्हणतात, "बाळाजी विश्वनाथ यांने ज्या स्वराज्याच्या म्हणून सनंदा आणला त्या 'साम्राज्यांतर्गत स्वराज्य' म्हणजे इंग्रजी भाषेत 'डोमिनियन स्टेटस' सनदा होत्या."[१८१] या सनदा म्हणजे स्वराज्याच्या पायातील शृंगलाच होत्या. यावेळी महाराणी येसुबाई व इतर मराठा मंडळी जी मोगल बादशाहाच्या कैदेत होती त्यांनाही मोगलाच्या कैदेतून मुक्त करुन बाळाजी सोबत दक्षिणेत पाठविण्यांत आले.[१८२] मे १७१९ मध्ये बाळाजी विश्वनाथ दिल्लीहुन दक्षिणेत परत आला.[१८३] सर्व मंडलीना घेऊन जुलै १७१९ मध्ये पेशवा बाळाजी साताऱ्यास छत्रपतीच्या भेटीस आले.[१८४] त्यानंतर बाळाजी विश्वनाथ पेशवा याने पुणे, आजुबाजुचा प्रदेशात स्वारी केली आणि कल्याण व भिवंडी ही ठाणी जिंकुन घेतली.[१८५] बाळाजीने संभाजी विरुध्द मोहीम काढली असता दमाजी थोरातासोबत बाळाजी विश्वनाथाची चकमक झाली. मात्र २० मार्च १७२० रोजी इलासपुरचे उत्तरेस उरुणबहे येथे बाळाजी विश्वनाथ याने संभाजीचा पराभव केला.[१८६] संभाजी विरुध्दची मोहीम यशस्वी पार पाडून बाळाजी साताऱ्यास परत आले. तेथे त्याने शाहुमहाराजांची भेट घेतली. ही भेट शाहु महाराज व बाळाजी विश्वनाथची शेवटची भेट ठरली.[१८७] बाळाजी विश्वनाथ यांच्यावर दिल्लीवारी व संभाजी विरुध्दची मोहीमेचा बराच ताण

पडला होता.[१८८] राजे सेभाजी विरुध्दची मोहीत सोडून सासवडला परत आले असता तेथेच २ एप्रिल १७२० रोजी बाळाजी विश्वनाथाचा मृत्यू झाला.[१८९] मृत्यू समयी पेशवा बाळाजीचे वय साठ वर्षाचे होते.[१९०] बाळाजीच्या मृत्यूने शाहु महाराजाची मोठी हानी झाली. राज्याचा प्रपंच पुढे कोण चालविल, आपुलकीच्या भावनेने आपणाशी अनुरक्त राहुन राज्याचा वाढणारा पसारा कोण सांभाळील, स्वार्थी व आपमतलबी सरदारांना आळा कोण घालीन, ही चिंता शाहुला उत्पन्न झाली.[१९१] थोडक्यात शाहु महाराज बाळाजीच्या मृत्यूने हताश झाला होता. कारण बाळाजीने शाहू महाराजांना संकटसमयी मोलाची साथ दिली. तसेच त्यांची सत्ता स्थिर करण्यासाठी खुप मेहनत घेतली होती.

### १.५.४ बाळाजी विश्वनाथाची योग्यता :-

- शाहुला संकटसमयी मदत केली.
- मराठयांच्या साम्राज्यविस्तारासाठी नवीन क्षेत्र उपलब्ध करुन दिले.
- शाहुमहाराजांच्या हिंदूपतपादशाहीचा पाया घातला.
- शाहुमहाराजांचे राज्य स्थिर केले.
- शाहु महाराजांच्या मातोश्री महाराणी येसुबाईला तसेच इतर काही मराठया मोगलांच्या कैदेतुन मुक्त केले.
- मोगल बादशहाकडून सहा सुभ्याची वतने, चौथाई व सरदेशमुखीची सनद मिळविली.

### १.६ चिमाजी आप्पांचे पूर्वजीवन :-

शाहू महाराजानी बाळाजी विश्वनाथ भट यांस पेशवा नेमून सर्व राज्यकारभार त्यांचेवर सोपविला. आपण केवळ मार्गदर्शनांचे काम केले.[१९२] इ. स. १७१३ मध्ये भट घराण्यांकडे पेशवाई आली. त्यावेळेपासुन भट घराण्यातील पेशव्याने 'न भुतो न भविष्यती' असा पराक्रम केला. बाळाजी विश्वनाथ, पहिला बाजीराव, नानासाहेब व पहिला माधवराव पेशवा असे नामावंत व पराक्रमी पेशवे

भट घराण्यांत होऊन गेले. परंतू पेशव्यांशिवाय भट घराण्यांत इतरही काही पराक्रमी महापुरुष जन्माला आलीत. त्यापैकी पहिला बाजीराव पेशवा यांच्या काळात त्यांच्या खांद्याला खांदा लावून त्याच्या तोडीचा पराक्रमी योध्दा होऊन गेला तो म्हणजेच 'चिमाजी आप्पा' होय.

बाळाजी विश्वनाथांच्या पत्निचे नांव राधाबाई. राधाबाई ही अंताजी बर्वे याची कन्या. त्यास मल्हार दादाजी आणि रामाजीपंत हे दोन बंधु होते.[१९३] बाळाजी विश्वनाथ यास दोन पुत्र व दोन पुत्री होत्या. थोरला पुत्र विसाजी ऊर्फ बाजीराव. बाजीरावाचा जन्म १४ ऑगष्ट १७०० रोजी झाला.[१९४] बाजीरावाचा विवाह महादजी कृष्ण जोशींची कन्या काशीबाईशी झाला[१९५] बाजीरावापेक्षा लहान भिऊबाई. त्यानंतर बाळाजी विश्वनाथ यांना आणखी एक पुत्र झाला. तो धाकटा म्हणून त्याचे नांव 'चिमणा'असे ठरले. पुढे चिमणाजी किंवा चिमाजी अप्पा हे नांव रूढ झाले.[१९६] बाजीरावाप्रमाने आप्पाची जन्मतिथी व वर्ष निश्चित नाही. विदवानांमध्ये आप्पांच्या जन्मवर्षाविषयी एकमत नाही. डॉ. कांबळे यांनी आपल्या मराठयांच्या इतिहासातील चिमाजी आप्पांचे यांगदान या पुस्तकात आप्पाची जन्म अंदाजे इ. स. १७०६ मध्ये झला असावा असे म्हटले आहे.[१९६अ] तर कौस्तुभ कस्तुरे यांनी पेशवाई या पुस्तकात चिमाजी आप्पाचा जन्म इ. स. १७०३ मध्ये झाला[१९७] असा उल्लेख केला आहे. त्याच बरोबर प्रा. टी. के. बिरादार यांनी पेशवाईचा कालखंड या ग्रंथात आप्पाचा जन्मवर्ष १७०३ हे नोंदविला आहे.[१९७अ] सरदेसाई गो. स. यांनी आपल्या ऐतिहासीक पत्रबोध मध्ये १७०७ जन्मतिथी दिली आहे.[१९७ब] चिमाजी आप्पाचा जन्म १७०३ मध्ये झला असावा स.१७१६ साली चिमाजी आप्पाचा विवाह रुखमाबाईशी झाला. रुखमाबाई ही त्रिंबकराव पेठेची बहीण होती. रुखमाबाईच्या पोटी सदाशिवाचा जन्म झाला. चिमाजीच्या दुसऱ्या पत्नीचे नांव अन्नपुर्णबाई होते.[१९८] अन्नपुर्णा बाईच्या पोटी बयाबाई नावाची पुत्री जन्माला आली.[१९९]

चिमाजी आप्पा व बाजीराव सख्ये भाऊ, मात्र दोघात शारिरीकदृष्टया खुप फरक होता. बाजीराव धडधाटक व काटक होता. तर चिमाजी अप्पा यास दमा होता. त्यामंळे चिमाजी आप्पाची मातोश्री राधाबाई व जवळचे नातेवाईक चिमाजी आप्पाच्या आजाराची नेहमी काळजी घेत असे. शिवाय चिमाजी आप्पास नेहमी दक्ष राहण्याचा सल्ला देत असत.[२००] चिमाजी अप्पा व बाजीराव हे तालमीतल्या कुस्तीगीरांसारखे व्यायाम करित व शास्त्रस्त्रांचा सराव करित असत.[२०१] लहानपणी

चिमाजी आप्पावर घरातील कामाची जबाबदारी होती. त्यासाठी मातोश्री राधाबाई चिमाजी आप्पास मदत करित असे.[२०२] चिमाजी आप्पाची आई राधाबाई मोठी जहांबाज बाई असुन, ती व्यवहार तर उत्तम उरकेच पण तिची राजकारनातही चांगली गती होती.[२०३] छत्रपतीच्या दरबारात ज्या राजकीय धुरंधर स्त्रिया होत्या, त्यापैकी राधाबाई होती. आपल्या घराण्यांतील पुत्रासोबत सल्ला मसलत करुन राधाबाईने पेशवे घराण्याच्या लौकीकात भर घातली. तसेच राज्यवृध्दीस मदत केली.[२०४] राधाबाई एक कर्तबगार नकीच पण भाग्यशालीनी स्त्री होती.[२०५] मातोश्री राधाबाई फार धिराची, पिळाची स्त्रि होती. चिमाजी आप्पा व बाजीराव या दोघावरही तिची अप्पार माया होती. तसा राधाबाईचा त्यांना धाक होता. तिच्या मर्जी विरुध्द घरात कोणतेही कार्य होत नसे. राधाबाई आपल्या दोन्ही पुत्रांना सल्ला नित्यनेमाणे देत असे.[२०६]

### १.७ चिमाजी आप्पाचे प्रारंभिक कार्य.

पेशवा बाजीराव यांच्या काळात उत्तरेत मराठा राज्यस्तिार करण्यांसाठी मल्हारराव होळकर. शिंदे, पवार, बूंदेले, यांची अपुर्व मदत झाली. तथापी या सर्वांपेक्षा एका व्यक्तीची जास्त मदत झाली तो म्हणजे चिमाजी आप्पा होय.[२०७] पेशवा बाळाजी विश्वनाथ मोहिमेवर जात असत तेव्हा कधी कधी ते आपल्या कुटुंबियांना सोबत नेत. अर्थातच बाळाजीच्या काही मोहिमांमध्ये चिमाजी आप्पा बाळाजीपंता सोबत होता. बाळाजी विश्वनाथाने जेव्हा दमाजी थोरात यांच्याविरुध्द मोहीम काढली तेव्हा चिमाजी आप्पा व बाजीराव सोबत होते. यावेळी दमाजीने बाळाजीपंत व त्यांचे पुत्र चिमाजी अप्पा व बाजीराव यांना कैदेत टाकले. मात्र बाळाजीपंताने पैसे देऊन आपल्या पुत्रांची सुटका केली.[२०८] पुढे इ. स. १७१९ मध्ये जेव्हा बाळाजी सय्यद बंधूच्या मदतीसाठी दिल्लीला जाण्यापुर्वी भरलेल्या खास दरबारात ६ ऑक्टोबर १७१६ रोजी बाजीरावला सरदारी व चिमाजी आप्पांना हूजूराची मुतालिकी मिळाली[२०९] बाजीराव पहीला यास जेव्हा पेशवेपद मिळाले त्याच समारंभात चिमाजी आप्पांना 'पंडित' हा किताब व सरदारी मिळाली. त्याचबरोबर दमाजी थोरात यांचा सातारा दरबारने जप्त केलेला सरंजाम, तोही चिमाजी आप्पांना मिळाला.[२१०]

बाजीरावाला पित्याच्या शिक्षणाचा, सहवासाचा व उदाहरणाचा जेवढा फायदा मिळाला तितका चिमाजी आप्पास मिळाला नाही. कारण बाजीरावास जेव्हा पेशवाई मिळाली तेव्हा चिमाजी आप्पा बारा-तेरा वर्षाचे होते. आणि प्रारंभी जेव्हा बाजीराव मोहिमेवर जाई तेव्हा चिमाजी आप्पा साताऱ्यासच घरी राहून शाहू महाराजांकडे पडेल ती सेवा बजावीत असे. परंतू पुरंदरे, चिटणीस व भानू या त्रिकुटाच्या शिकवणुकीने चिमाजी लवकरच राजकारणात वाकबदार झाला.[२११] चिमाजी आप्पांची नेमणूक शाहु महाराजांच्या दरबारात झाली तेव्हा चिमाजी आप्पांवर घरची व बाहेरची असे दुहेरी कामाचा बोजा पडला. त्यात घरात मातोश्रीची मदत झाली तर बाहेरील कामकाजात बाजी भीवराव रेठरेकर यांची मदत झाली. चिमाजी आप्पाची पहिली चारपाच वर्ष हे पेशव्यांच्या खाजगी कामकाजात गेलीत. त्यामुळे चिमाजी आप्पास सुरवातीला सरदारकीची उस्तवारी करता आली नाही.[२१२]

बाजीराव पेशवा बनला असता त्याला सतत मोहीमेवर जावे लागत असे. अशावेळी छत्रपती शाहुच्या दरबार साभांळणे व खाजगी व्यवहार हाताळणे यासाठी बाजीराव यास जीवलग सहकार्याची आवश्यक्ता होती. त्यांचा अर्धाभार अंबाजीपंत पुरंदरे यांनी उचलला तर अर्धी जबाबदारी चिमाजी आप्पांने उचलली.[२१३] बाजीराव व पुरंदरे दोघेही बाहेर कामानिमित्त जात असे तेव्हा चिमाजी छत्रपती शाहु यांच्या जवळच विचार विनीमयासाठी राहत असे.[२१४] शाहु महाराज यांच्या दरबारातील अष्टप्रधानापैकी जे सैन्य घेऊन मोहीमेवर जात असत तेव्हा मुतालीकाना स्वाऱ्यावर जावे लागत असे.[२१५] निजामाने संभाजी महाराजांना हाताशी धरुन शाहु महाराजांच्या विरुध्द गडबड केली. त्याप्रसंगी इ. स. १७१७ मध्ये संभाजी विरुध्द काढलेल्या मोहिमेत चिमाजी आप्पाचा सहभाग होता.[२१६] निजाम पुण्यास शिरला व त्याने पुणे प्रातांत धुमाकुळ घातला त्या स्वारीचे वर्णन चिमाजी आप्पानी स्वता: पत्र पाठवून केले आहे. आप्पा लीहीतात, "तुरुकताजखान, रंभाजी निबांळकर, नेवासकर, थोरात, धीराजी पवार वैगेरीनी येऊन प्रथम मुलकांत धुंदी माजवली. लोहगडचे पेठेपर्यंत गेले. तेथे लोहगडकरानी ठेचून वाअेस लावले. ते माघारे येऊन चिंचवड-पूण्यामध्ये राहीले. तो निजाम संभाजी राज्यासह पुणे प्रांतात अंजनापूरास येऊन राहीला, पुढे तळेगांव शिखर पुरावर जाऊन कौल घेतले. तेथून नारायणगड उदापुरचे ठाणी टाकुण पळाले. खेडचे संरक्षक ठाणे सोडून गेले.

नारायणगडा वरील शिवदीने जुन्नरकर बेगास धुडकावून संभाजी राजांचे निशान घेतले."[२१७] मात्र या प्रसंगी आप्पांनी युध्दात प्रत्यक्ष भाग घेतला की नाही हे स्पष्ट होत नाही. यावेळी चिमाजी आप्पा छत्रपती सोबत पुरदंरे गडावर होते.

कालांतराने बाजीराव पेशवा यांचा पुत्र बाळाजी ऊर्फ नानासाहेब शाहु महाराजांजवळ राहु लागला. तेव्हा चिमाजी आप्पा स्वारीसाठी बाहेर निघाला.[२१८] सन १७२३ मध्ये हैद्राबादकर मोगलांनी उत्तर व दक्षिण पाइन घाटात गडबड केली, ती बंद करण्याकारिता १७२३ च्या सप्टेंबर पासुन ते १७२४ च्या जुलै महिन्यापर्यंत चिमाजी आप्पा, खंडेराव दाभाडे व फतेसिंग भोसले गुंतले होते.[२१९] सन १७२४ पर्यत चिमाजी आप्पा हे मुख्यत: दक्षिणेत राहून राज्यांत ठिकठिकाणी माणसे पाठवून चौथाई व सरदेशमुखीचा ऐवज वसूलीचे काम पाहत असे. तसेच सैन्य मोहीमे करीता पैसे पूरविण्याचे काम पाहत असे. थोडक्यात आप्पाची सूरवातीची ४-५ वर्ष हे पेशव्यांच्या खाजगी कामकाजातच गेलीत.[२२०]

मात्र चिमाजीच्या ख-या कार्याला प्रारंभ झाला तो माळवा मोहीमे पासून. या संदर्भात ना. के. बेहरे म्हणतात, "आपल्या वडीलाचे व वडील बंधूचे पराक्रम त्याच्या डोक्यासमोर होते. आणी त्यांचे अनूकरण करुन आप्पालाही तलवार मारण्याची इच्छा झाली आणि ते स्वाभाविकच ठरते. आप्पा वयाच्या १५व्या वर्षापासून स्वारीवर जाऊलागला. आणि एकोणविस व विसाव्या वर्षापासून आप्पा स्वत: सैन्य नेतृत्व करुन भावाप्रमाणे वा-यासारखा फिरु लागला."[२२१] यानंतरच्या काळात आप्पांनी उत्तर भारत व दक्षीण भारतात मोहीमा काडून मराठा राज्य विस्तारात मोठे योगदान दिले. त्यापैकी चिमाजी आप्पांच्या नेतृत्वात पहीली मोहीम ही माळवा प्रदेशात काढण्यात आली. ज्यात चिमाजी आप्पांनी मोगल सुभेदार गिरीधर बहादूरचा पाडाव केला.

**संदर्भ :**

१. डॉ. कठारे अनिल, आधुनिक महाराष्ट्राचा इतिहास, विद्या बूक्स पब्लिकेशर्स, औरंगाबाद, २०१३, पृ.०१

२. डॉ. दीक्षित दुर्गा (संपा.), महाराष्ट्र सांस्कृतिक इतिहास कोश, डायमंड पब्लिकेशस, पूणे, २००९, पृ. ०४

०३. प्रा. दिनेश मोरे, आधूनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, कैलास पब्लिकेशन्स, औरंगाबाद, २००६, पृ. ३८

०४. डॉ. शेख अफरोज हनिफ, सेनापति त्रिंम्बकराव पेठे, साधना प्रिंटर्स, नागपुर, २०१२, पृ.०२

०५. प्रा. दिनेश मोरे, आधूनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, पुर्वोक्त, पृ. ३८

०६. डॉ. कठारे अनिल, आधुनिक महाराष्ट्राचा इतिहास, पुर्वोक्त, पृ.०३

०७. डॉ. कठारे अनिल, आधुनिक महाराष्ट्राचा इतिहास, पुर्वोक्त, पृ.०३

०८. डॉ. कठारे अनिल, आधुनिक महाराष्ट्राचा इतिहास, पुर्वोक्त, पृ.०३

०९. डॉ. मोरवंचीकर रा. श्री., सातवाहन कालीन महाराष्ट्र, इंदिरा प्रिंटींग प्रेस, सदाशिव पेठ, पुणे, १९१३, पृ. १४

१०. डॉ. मोरवंचीकर रा. श्री., सातवाहन कालीन महाराष्ट्र, पुर्वोक्त, पृ. १५

११. सरदेसाई गो. स., मराठों का नविन इतिहास, शिवलाल अग्रवाल एण्ड कंपनी अस्पताल रोड, आगरा-३, खंड-१, १९७२, पू. ३१

१२. सरदेसाई गो. स., मराठों का नविन इतिहास, खंड-१, पू.४४

१३. कुलकर्णी अ.रा. व खरे ग. ह. (संपा), मराठयांचा इतिहास, कॉन्टिनेटाल प्रकाशन, महाराष्ट्र विद्यापिठ ग्रंथ निर्मीती मंडळ, महात्मा गांधी मार्ग, नागपुर, १९८४, खंड १, पृ.९४

१४. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, (मराठेशाहीतील निवडक पत्रे), निर्णय सागर प्रेस, मुंबई, १९६३, पृ.१२९

१५. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, (सुलतान घराणी), पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, खंड-१, १९९३/१९९५, पृ. २४१

१६. बेंद्रे वा. सी., मालोजी राजे आणि शहाजी महाराज, श्री. मृद्रण मंदीर, पुणे. १९६७, पृ.१८५

१७. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, (सुलतान घराणी), खंड-१, पुर्वोक्त पृ. २४१

१८. प्रा. दिनेश मोरे, आधूनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, पुर्वोक्त, पृ. ४१

१९. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड-१, पुर्वोक्त, पृ. २४१-२४२

२०. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड-१, पुर्वोक्त, पृ. २४३

२१. प्रा. दिनेश मोरे, आधूनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, पुर्वोक्त, पृ. ४१

२२. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड-१, पुर्वोक्त, पृ. २५६-२५७

२३. कुलकर्णी अ. रा., मध्ययुगीन महाराष्ट्र, डायमंड पब्लिकेशन्स, पुणे, २००७, पृ.११

२४. कुलकर्णी अ. रा., मध्ययुगीन महाराष्ट्र, पुर्वोक्त, पृ. ११

२५. सरदेसाई गो. स., मराठों का नविन इतिहास, खंड-१, पृ. ७४

२६. डॉ. शेख अफरोज हनिफ, सेनापति त्रिंम्बकराव पेठे, पुर्वोक्त, पृ. ०१

२७. प्रा. केशट्टीवार के.मु,, मध्ययुगीन भारत, पडगीलवार प्रकाशन, पुणे. १९९२, पृ.११

२८. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड-१, पुर्वोक्त, पृ. २३८

२९. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा), मराठयांचा इतिहास, खंड १, पृ.१२२

३०. कुलकर्णी अ.रा. व खरे ग. ह.(संपा), मराठयांचा इतिहास, खंड १, पृ.११८

३१. प्रा. दिनेश मोरे, आधूनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, पुर्वोक्त, पृ. ४०

३२. प्रा. सु. ह. जोशी, डॉ. म. रा. कुळकर्णी, डॉ. रघुनाथ शेळके, प्रा. शिल्पा कुलकर्णी, (संपा.), इतिहास माहीती कोश, डायमंड पब्लिकेशन्स पुणे,२००९, १ली आवृत्ती, पृ.२११

३३. प्रा. केशट्टीवार के. मु., मध्ययुगीन भारत, पुर्वोक्त, पृ. ३०६

३४. प्रा. दिनेश मोरे, आधूनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, पुर्वोक्त, पृ. ४२

३५. प्रा. दिनेश मोरे, आधूनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, पुर्वोक्त, पृ. ४४

३६. कुलकर्णी अ.रा. व खरे ग. ह. (संपा), मराठयांचा इतिहास, , खंड १, पृ.१३७

३७. प्रा. सु. ह. जोशी, डॉ. म.रा. कुळकर्णी, डॉ. रघुनाथ शेळके, प्रा. शिल्पा कुलकर्णी, (संपा.), इतिहास माहीती कोश, पुर्वोक्त, पृ.१७७

३८. प्रा. दिनेश मोरे, आधूनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, पुर्वोक्त, पृ. ४७

३९. डॉ.राठोड उत्तम व डॉ. धवसे सिध्दार्थ, इतिहासकार : न. र. फाटक, न्यू मॅन पब्लिकेशन, नरवाडी, जि. परभणी, प्रथम आवृत्ती, जुलै २०१४, पृ. १७३

४०. Maharastra State Gazetteers, History Part III-Maratha Period, Bombay, Directorate Of Government Printing, Statonery And Publitions, Maharastrya State, 1967, pp.09

४१. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा), मराठयांचा इतिहास, खंड १, पृ.१५६

४२. Maharastra State Gazetteers, History Part III-Maratha Period, Ibid, pp, 09

४३. डॉ. राठोड उत्तम व डॉ. धवसे सिध्दार्थ, इतिहासकार : न. र. फाटक, पुर्वोक्त, पृ.१७४

४४. प्रा. दिनेश मोरे, आधूनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, पुर्वोक्त, पृ. ४७

४५. डॉ. राठोड उत्तम व डॉ. धवसे सिध्दार्थ, इतिहासकार : न. र. फाटक, पुर्वोक्त, पृ. १७५

४६. बेंद्रे वा. सी., (१९६०), छत्रपती संभाजी महाराज, दि प्राज्ञ प्रेस, वाई, सातारा, पृ.२५

४७. बेंद्रे वा. सी., छत्रपती संभाजी महाराज, पुर्वोक्त, पृ.२६

४८. डॉ. राठोड उत्तम व डॉ. धवसे सिध्दार्थ, इतिहासकार : न. र. फाटक, पुर्वोक्त, पृ.१७५

४९. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड-१, पुर्वोक्त, पृ. २१३

५०. प्रा. केशट्टीवार के. मु, (१९९२), मध्ययुगीन भारत, पुर्वोक्त, पृ. ३१०

५१. Maharastra State Gazetteers, History Part III-Maratha Period, Ibid, pp, १२

५२. बेंद्रे वा. सी., छत्रपती संभाजी महाराज, पुर्वोक्त, पृ.२६

५३. डॉ. राठोड उत्तम व डॉ. धवसे सिध्दार्थ, इतिहासकार : न. र. फाटक, पुर्वोक्त, पृ.१७५

५४. Maharastra State Gazetteers, History Part III-Maratha Period, Ibid, pp, ११-१२

५५. बेंद्रे वा. सी., छत्रपती संभाजी महाराज, पुर्वोक्त, पृ.२६

५६. प्रा. केशट्टीवार के. मु, मध्ययुगीन भारत, पुर्वोक्त, पृ. ३१०

५७. बेंद्रे वा. सी., छत्रपती संभाजी महाराज, पुर्वोक्त, पृ.२७

५८. डॉ. राठोड उत्तम व डॉ. धवसे सिध्दार्थ, इतिहासकार : न. र. फाटक, पुर्वोक्त, पृ.१७५

५९. प्रा. केशट्टीवार के. मु, मध्ययुगीन भारत, पुर्वोक्त, पृ. ३१०

६०. डॉ. राठोड उत्तम व डॉ. धवसे सिध्दार्थ, इतिहासकार : न. र. फाटक, पुर्वोक्त, पृ. १७६

६१. डॉ. दीक्षित दुर्गा (संपा.), महाराष्ट्र सांस्कृतिक इतिहास कोश, डायमंड पब्लिकेशन्स, पूणे, २००९, पूर्वोक्त, पृ. ४३८

६२. डॉ. दीक्षित दुर्गा (संपा.), महाराष्ट्र सांस्कृतिक इतिहास कोश, पुर्वोक्त, पृ.१७

६३. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, राफ्टर पब्लीकेशन्स, मुंबई, दुसरी आवृत्ती जाने. २०१६, पृ.२९

६४. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. २९

६५. बेंद्रे वा. सी., मालोजी राजे आणि शहाजी महाराज, पुर्वोक्त, पृ. ३३

६६. डॉ. दीक्षित दुर्गा (संपा.), महाराष्ट्र सांस्कृतिक इतिहास कोश, पुर्वोक्त, पृ. १७

६७. मेहेंदळे ग. भा., श्रीराजा शिवछत्रपती, दत्तात्रय ग. पाष्टे, डायमंड पब्लिकेशन, पुणे-३० पुनर्मुद्रण-२००७, पृ. ११३१-११३२

६८. मेहेंदळे ग. भा., श्रीराजा शिवछत्रपती, पुर्वोक्त, पृ. ११३४

६९. गर्गे. स. मा. (संपा.), सरदेसाई गो. स., मराठी रियासत, पॉप्युलर प्रकाशन, नविन संदर्भासह संपादित नवीन आवृत्ती, मुंबई, १९८९/१९९१, खंड-२ पृ. २०

७०. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ३२

७१. डॉ. शेख अफरोज हनिफ, सेनापति त्रिंम्बकराव पेठे, पुर्वोक्त, पृ.०३

७२. डॉ. शेख अफरोज हनिफ, सेनापति त्रिंम्बकराव पेठे, पुर्वोक्त, पृ.०४

७३. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ३४

७४. पगडी सेतू माधवराव, (संपा), मोगल-मराठा संघर्ष, (फारशी साधने), चित्रशाळा प्रेस प्रकाशन, पूणे, १९६४, पृ. १८

७५. पगडी सेतू माधवराव, (संपा), मोगल-मराठा संघर्ष, (फारशी साधने), पुर्वोक्त, पृ. १८

७६. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड-१, पुर्वोक्त, पृ. ९६

७७. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड-१, पुर्वोक्त, पृ. ९६

७८. गर्गे.स.मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-२ पृ. २०

७९. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड-१, पुर्वोक्त, पृ. २६०

८०. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ३५

८१. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा), मराठयांचा इतिहास, खंड १, पुर्वोक्त, पृ. ३८८

८२. गुप्त शिवकुमार (संपा.), मध्यकालीन भारत का इतिहास, पंचशिल प्रकाशन, जयपुर, पुर्नमुद्रित २००९, पृ. ७९

८३. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा), मराठयांचा इतिहास, खंड १, पुर्वोक्त, पृ. ३८८

८४. कुलकर्णी अ. रा. (संपा), आज्ञापत्र, डायमंड पब्लिकेशन्स, पुणे, २००७, पृ.३४

८५. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९३/१९९५, खंड-२, पृ. २९६

८६. Maharastra State Gazetteers, History Part III-Maratha Period, Ibid, pp, २४

८७. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड-१, पुर्वोक्त, पृ. ३०१

८८. डॉ. दीक्षित दुर्गा (संपा.), महाराष्ट्र सांस्कृतिक इतिहास कोश, पुर्वोक्त, पृ.१८

८९. Maharastra State Gazetteers, History Part III-Maratha Period, Ibid, pp, २४

९०. डॉ. शेख अफरोज हनिफ, सेनापति त्रिंम्बकराव पेठे, पुर्वोक्त, पृ.०४

९१. डॉ. शेख अफरोज हनिफ, सेनापति त्रिंम्बकराव पेठे, पुर्वोक्त, पृ.०४

९२. डॉ. दीक्षित दुर्गा (संपा.), महाराष्ट्र सांस्कृतिक इतिहास कोश, पुर्वोक्त, पृ.१७

९३. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ३८

९४. कुलकर्णी अ.रा. (संपा), आज्ञापत्र, पुर्वोक्त, पृ.३४

९५. डॉ. शेख अफरोज हनिफ, सेनापति त्रिंम्बकराव पेठे, पुर्वोक्त, पृ.०५

९६. प्रा. बिरादार टी. के. पेशवाईचा कालखंड, (पूर्वार्ध), विद्याभारती प्रकाशन, लातूर, २०००, खंड-२, पृ. ४१

९७. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा), मराठयांचा इतिहास, खंड १, पुर्वोक्त, पृ. ४१३

९८. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ३९

९९. डॉ. शेख अफरोज हनिफ, सेनापति त्रिंम्बकराव पेठे, पुर्वोक्त, पृ.०६

१००. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पूर्वोक्त, पृ.१४८

१०१. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पूर्वोक्त, पृ.१४८

१०२. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ४०

१०३. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ३९

१०४. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पूर्वोक्त, पृ.१४८

१०५. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-२ पुर्वोक्त, पृ. १५४

१०६. डॉ. शेख अफरोज हनिफ, सेनापति त्रिंम्बकराव पेठे, पुर्वोक्त, पृ.०६

१०७. कुलकर्णी अ. रा. (संपा), आज्ञापत्र, पुर्वोक्त, पृ.३४

१०८. सरदेसाई गो. स., मराठों का नविन इतिहास, खंड-१, पृ.४४

१०९. सरदेसाई गो.स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पूर्वोक्त, पृ.१४१

११०. Maharastra State Gazetteers, History Part III-Maratha Period, Ibid, pp,२७

१११. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ४१-४२

११२. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ४१

११३. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, श्रीमंत थोरले बाजीराव, चरित्र मंडळ गीताभवन, सदाशिव पेठ, पुणे, १९७९, पृ. ०४

११४. डॉ. दीक्षित दुर्गा (संपा.), महाराष्ट्र सांस्कृतिक इतिहास कोश, पुर्वोक्त, पृ.१९

११५. डॉ. दीक्षित दुर्गा (संपा.), महाराष्ट्र सांस्कृतिक इतिहास कोश, पुर्वोक्त, पृ.१८

११६. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ४२

११७. कुलकर्णी अ. रा. (संपा), आज्ञापत्र, पुर्वोक्त, पृ.३५

११८. Sinha, 'Rise of the Peshawas', The Indian Press publication, Alhabad 1958, 24

११९. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा), मराठयांचा इतिहास, खंड १, पुर्वोक्त, पृ. ४४२

१२०. पगडी सेतू माधवराव, (संपा), मोगल-मराठा संघर्ष, १४

१२१. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.०५

१२२. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.०५

१२३. डॉ. शेख अफरोज हनिफ, सेनापति त्रिंम्बकराव पेठे, पुर्वोक्त, पृ.०७

१२४. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड-१, पुर्वोक्त, पृ. ३०५

१२५. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड-१, पुर्वोक्त, पृ. २०२

१२६. डॉ. शेख अफरोज हनिफ, सेनापति त्रिंम्बकराव पेठे, पुर्वोक्त, पृ.०८

१२७. Sinha, 'Rise of the Peshawas', Ibid, pp.24

१२८. प्रा. दिनेश मोरे, आधूनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, पुर्वोक्त, पृ. ५६

१२९. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-२ पुर्वोक्त, पृ. ३६२

१३०. प्रा. दिनेश मोरे, आधूनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, पुर्वोक्त, पृ. ५६

१३१. कुलकर्णी अ. रा. (संपा), आज्ञापत्र, पुर्वोक्त, पृ.३६

१३२. डॉ. शेख अफरोज हनिफ, सेनापति त्रिंम्बकराव पेठे, पुर्वोक्त, पृ.०७

१३३. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, ३४

१३४. कुलकर्णी अ. रा. (संपा), आज्ञापत्र, पुर्वोक्त, पृ.३८

१३४अ. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.११

१३५. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.०९

१३६. प्रा. दिनेश मोरे, आधूनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, पुर्वोक्त, पृ. ५७

१३७. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.०९

१३८. गर्गे. स. मा. (संपा.), सरदेसाई गो. स., मराठी रियासत, पुण्यश्लोक शाहू पेशवा बाळाजी विश्वनाथ पेशवा बाजीराव, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, नविन संदर्भासह संपादित नवीन आवृत्ती, खंड-३, १९८९/१९११, पृ.१०१

१३९. डॉ. दीक्षित दुर्गा (संपा.), महाराष्ट्र सांस्कृतिक इतिहास कोश, पुर्वोक्त, पृ. ४४०

१४०. डॉ. कठारे अनिल, आधुनिक महाराष्ट्राचा इतिहास, पूर्वोक्त, पृ.०३

१४१. Maharastra State Gazetteers, History Part III-Maratha Period, Ibid, pp, ४०

१४२. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, मंगेश नारायण कुळकर्णी, भारत गौरव ग्रंथमाला, कर्नाटक प्रेस, मुंबई, १९३०, पृ.१४

१४३. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पूर्वोक्त, पृ.१४

१४४. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ४६-४७

१४५. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पूर्वोक्त, पृ.१९०

१४६. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पूर्वोक्त, पृ. १४८

१४७. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पूर्वोक्त, पृ. १४८

१४८. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तरातील निवडक कागदपत्रे, गर्व्हमेंट सेंट्रल प्रेस मुंबई, १९३०, खंड,७ ले.१२

१४९. हेरवाडकर र. वि. (संपा.), (१९७५), पेशव्यांची बखर, व्हिनस प्रकाशन, पुणे, पृ. ०२

१५०. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ४८

१५१. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ४९

१५२. पुरंदरे कृ. वा. (संपा.), पुरंदर-दप्तर. भाग-१, भारतीय इतितहास मंडळ, पुणे, १९२९, पृ.१०

१५३. पुरंदरे कृ. वा. (संपा.), पुरंदर-दप्तर. भाग-१, पुर्वोक्त, पृ. १०

१५४. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा), मराठयांचा इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ.१०

१५४अ.कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा), मराठयांचा इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ.१०

१५५. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पूर्वोक्त, पृ. १४३

१५६. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पूर्वोक्त, पृ.१४३

१५७. डॉ. शेख अफरोज हनिफ, सेनापति त्रिंम्बकराव पेठे, पुर्वोक्त, पृ.०८

१५८. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पूर्वोक्त, पृ.६२

१५९. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा), मराठयांचा इतिहास, खंड १, पुर्वोक्त, पृ. ४४३

१६०. डॉ. शेख अफरोज हनिफ, सेनापति त्रिंम्बकराव पेठे, पुर्वोक्त, पृ.०८

१६१. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा), मराठयांचा इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. ०८

१६२. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा), मराठयांचा इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. ०९

१६३. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा), मराठयांचा इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. ११

१६४. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पूर्वोक्त, पृ. ३९

१६५. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ६२

१६६. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.०२

१६७. Maharastra State Gazetteers, History Part III-Maratha Period, Ibid, pp,४०

१६८. कुलकर्णी अ. रा. (संपा), आज्ञापत्र, पुर्वोक्त, पृ. ३४

१६९. डॉ.राठोड उत्तम व डॉ. धवसे सिध्दार्थ, इतिहासकार : न.र. फाटक, पूर्वोक्त, पृ.१७७

१७०. कुलकर्णी अ.रा.(२०१३), पुण्याचे पेशवे, राजहंस प्रकाशन, सदाशिव पेठ, पुणे, पृ.१९

१७१. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ.१९

१७२. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ. २०

१७३. प्रा. दिनेश मोरे, आधूनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, पुर्वोक्त, पृ. ५८

१७४. कुलकर्णी अ.रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ.१७

१७५. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुवार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ.७१

१७६. प्रा. दिनेश मोरे, आधूनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, पुर्वोक्त, पृ. ५८

१७७. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ.२०

१७८. प्रा. दिनेश मोरे, आधूनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, पुर्वोक्त, पृ. ५८

१७९. कुलकर्णी अ. रा., मध्ययुगीन महाराष्ट्र, पुर्वोक्त, पृ. २९

१८०. डॉ. कोलारकर. श. गो., गो. मा. पुरंदरे, (२००५), नागपूर राज्याचा अर्वाचीन इतिहास, श्री. मंगेश प्रकाशन, नागपुर, प्रथम आवृत्ती, पृ. ०७

१८१. कुलकर्णी अ. रा., मध्ययुगीन महाराष्ट्र, पुर्वोक्त, पृ. २९

१८२. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पृ.७३

१८३. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा), मराठयांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ. १६

१८४. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ.२०

१८५. प्रा. केशट्टीवार के. मु, मध्ययुगीन भारत, पूर्वोक्त, पृ. ३२७

१८६. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. ६३

१८७. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पूर्वोक्त, पृ. १३१

१८८. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ.२०

१८९. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ.२०

१९०. प्रा. केशट्टीवार के. मु, मध्ययुगीन भारत, पूर्वोक्त, पृ. ३२७

१९१. गर्गे.स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पूर्वोक्त, पृ.१९०

१९२. प्रा. सु. ह. जोशी, डॉ. म. रा. कुळकर्णी, डॉ. रघुनाथ शेळके, प्रा. शिल्पा कुलकर्णी, (संपा.), इतिहास माहीती कोश, पुर्वोक्त, पृ. ४४०

१९३. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. १६९

१९४. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पूर्वोक्त, पृ.२२१

१९५. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पूर्वोक्त, पृ.१९१

१९६. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. ४२

१९६अ.डॉ. कांबळे आर. एच. मराठयांच्या इतिहासातील चिमाजी आप्पांचे योगदान, डायमंड पब्लिकेशन्स, पुणे, २०१६, पृ.०८

१९७. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ७१

१९७अ. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पृ. ४८३

१९७ब. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पूर्वोक्त, पृ. १५३

१९८. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पूर्वोक्त, पृ.१९१

१९९. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पूर्वोक्त, पृ.५८५

२००. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पूर्वोक्त, पृ. ६१

२०१. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. १२०

२०२. पूरंदरे कृ. वा. (शके १८७०), चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, भारतीय इतिहास संशोधन मंडळ, पूणे, श्री शारदा मुद्रणालय, पूणे, पृ. ०२

२०३. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पूर्वोक्त, पृ.१९१

२०४. पूरंदरे कृ. वा., चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ. ०२

२०५. प्रा. सु. ह. जोशी, डॉ. म. रा. कुळकर्णी, डॉ. रघुनाथ शेळके, प्रा. शिल्पा कुलकर्णी, (संपा.), इतिहास माहीती कोश, पुर्वोक्त, पृ. ४४०

२०६. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. १६९

२०७. डॉ. कांबळे आर. एच. मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.०८

२०८. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. ४७

२०९. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.०८

२१०. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.०८

२११. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. ६६

२१२. पूरंदरे कृ. वा., चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ. ०२

२१३. पूरंदरे कृ. वा., चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ. ०३

२१४. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पूर्वोक्त, पृ. ६२

२१५. पूरंदरे कृ. वा., चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.०३

२१६. पूरंदरे कृ. वा., चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.०४

२१७. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ.९८

२१८. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पूर्वोक्त, पृ. ६२

२१९. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. १६९

२००.डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.०९

२२१. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ.२३९

## प्रकरण : २ चिमाजी आप्पा व माळवा

२.१ प्रस्तावना.

२.२ माळवा प्रांताची भौगोलिक पार्श्वभूमी.

२.३ माळवा प्रदेशावरील मराठयांची प्रारंभीक आक्रमणे.

२.४ मोगल दरबाराची स्थिती.

२.४.१ मोगल सुभेदार गिरीधर बहादुरचा पुर्व इतिहास.

२.४.२ गिरीधर बहादूरची मराठा विरोधी भुमीका.

२.५ माळवा प्रांतातील राजकिय स्थिती मराठयांना अनूकुल.

२.६ चिमाजी आप्पाची माळवा मोहीम.

२.६.१ अझमेरा युध्द.

२.६.२ चिमाजी आप्पांवर अभिनंदनाचा वर्षाव.

२.६.३ अमझेरा युध्दानंतरचे आप्पांचे कार्य.

२.७ चिमाजी आप्पाची उत्तर भारतातील मोहीम.

## प्रकरण : २ चिमाजी आप्पा व माळवा

### २.१ प्रस्तावना :-

बाळाजी विश्वनाथ यांनी संकटसमयी मदत केल्यामुळे शाहु महाराजानी बाळाजी यास पेशवाई दिली. बाळाजीने शाहु महाराजाच्या शत्रुंचा बंदोबस्त करुन शाहुचे शासन बळकट केले. इ. स. १७१८ पर्यंत मराठयांने माळवा प्रांतावर आपले वर्चस्व प्रस्थापित केले होते. म्हणून बाळाजी विश्वनाथने तेथील महसुलाचे अधिकार मराठयांना द्यावेत अशी विनंती मोगल बादशाहाला केली. परंतू बादशाहाने त्यास नकार दिला कालांतराने बाळाजी विश्वनाथाने दिल्ली दरबारातून दक्षिणेतील सहा सुभ्याची चौथाई व सरदेशमुखीची सनद आणली[१] त्यामुळे मराठा सरदारांना साम्राज्य विस्तारास वाव मिळाला. मात्र इ. स.१७२० मध्ये सासवड येथे बाळाजी विश्वनाथाचा मृत्यू झाला. बाळाजी हे स्वामिनिष्ठ, प्रमाणीक, आणि कर्तबगार पेशवे होते. परीणामी बाळाजी विश्वनाथच्या मृत्यू समयी शाहु विवंचनेत पडला होता. या स्थितीचे वर्णन इतिहासकार सरदेसाई गो. स. यांनी पुढील प्रमाणे केले आहे. "राज्याचा प्रपंच कोण चालविल, आपलुकिच्या भावनेने आपणासी अनुरक्त राहुन राज्याचा वाढणारा पसारा कोण सांभाळील, स्वार्थी व आपमतलबी सरदाराना आळा कोण घालील ही चिंता शाहुला उत्पन्न झाली."[२] पेशवा बाळाजी अचानक मृत्यू पावले ते आजारी नसल्यामुळे त्या जागी कोणास पेशवा म्हणून नियुक्त करावे याची तजवीन शाहुने केली नव्हती.[३] तसेच बाळाजीच्या मृत्यूनंतर शाहुच्या दरबारात दोन गट निर्माण झाले. बाळाजी विश्वनाथाच्या पुत्रास म्हणजे बाजीराव यास पेशवे पद देण्यांत येऊ नये असा प्रयत्न श्रीपतराव प्रतिनिधी, आनंदराव सुमंत, कान्होजी भोसले इत्यादी मंडळीनी केला.[४] मराठा दरबारातील लोकांना वाटत होते कि, हे पद वंशपरंपरागत नसल्यामुळे जुन्या जाणत्या व्यक्तीला द्यावे. तथापी शाहु महाराजांने बाळाजीचे अपुर्ण कार्य पुर्ण करण्यांची जबाबदारी बाजीरावावर टाकली.[५] वास्तविक यावेळी बाजीरावला अनेकाचा विरोध होता. "ते काळी बाजीराव साहेब बहुत उद्दामप्रकृतीने शिपाईगिरीत अवघा वेळ मग्न, राज्यभार चालावयास सबुरीराव असावी तो भाव नाही. याजमुळे या पदाचे उपयोगी नाहीत. असे राजश्री यांसी बहूतानी मसलत केली."[६] शाहु महाराजांनी बाजीरावाची पेशवे पदासाठी केलेली

निवड जाणीवपुर्वक होती.मात्र बाजीरावास पेशवाई दिली असली तरी छत्रपती शाहु चा फत्तेसींग भोसले, श्रीपतराव प्रतिनिधी यांच्या शहाणपणावर जास्त विश्वास होता.[७]

बाजीरावाने पेशवे पदाची सुत्रे हाती घेतल्या नंतर आक्रमक राजनितीचा स्विकार केला. यावेळी बाजीरावाने जे धोरणअंगीकारले त्या विषयी अ. रा. कुळकर्णी म्हणतात, "नव्या दमाच्या पेशव्याने शाहु महाराजाच्या आर्शीवादाने 'दक्षिणेत वर्चस्व' आणि 'उत्तरेत राजकीय नेतृत्व' संपादन करावयाचे अशी राजनीती बाजीरावाने आखली."[८] मात्र खंडो बल्लाळ, श्रीपतराव प्रतिनधी, खंडेराव दाभाडे,कान्होजी आंग्रे, रघुजी भोसले इत्यादी सर्व मंडळी बाजीरावाच्या योजनेस विरोध करीत असत. परंत बाजीराव यांने दक्षिणेत अडकून पडण्यापेक्षा उत्तरेतील राजकारणाकडे लक्ष केन्द्रीत करण्यांचे ठरविले. कारण दक्षिणेत अनेकांचे हितसबंध गुंतलेले होते. त्याचा बंदोबस्त करण्यांस वेळ लागला असता शिवाय अनेक संकटे उत्पन्न होण्याची शक्यता होती.[९]

उत्तरेत यशस्वी झालो तर दक्षिणेतील शत्रुंना आपोआपच पायबंद बसेल असे बाजीरावास वाटत होते. म्हणून बाजीरावाने माळवा, बुंदेलखंड व गुजरात प्रदेशावर वर्चस्व प्रस्थापित करण्याचे धोरण अंगिकारले. हे कार्य यशस्वी पार पाडण्यासाठी बाजीरावाने होळकर, शिंदे व पवार यांसारखे एकनिष्ठ सेवक निर्माण केले.[१०] या आपल्या नवीन सहकाऱ्यांना म्हणजे शिंदे, होळकर व पवार यांना उत्तरेत पाठविले.[११] शिवाय एक गोष्ट येथे नमुद करणे आवश्यक आहे. राजकीय क्षेत्रात बाजीरावाला जे यश मिळाले त्याचे श्रेय चिमाजी व बाजीराव या दोघानाही जाते. कारण ते दोघेही एकमेकांना सहकार्य करीत असत.[१२] त्यातही चिमाजी आप्पा हा बाजीरावाचा निकटवर्तीय रत्नात मोडत होता.[१३]

शाहू महाराजांच्या कालखंडात अनेक शूरविरांनी मराठी सत्ता विस्तारास हातभार लावला. परंतु खऱ्या अर्थाने राज्य विस्ताराला चालना दिली ती पहीला बाजीराव यांनी. आणि त्यांच्या त्या धोरणाला यशस्वी करण्यासाठी चिमाजी आप्पाने सिंहाचा वाटा उचलला. चिमाजी आप्पाने बाजीरावाच्या कालखंडात माळवा, बूंदेलखंड, गुजरात, मध्ये तसेच हबशी व पोर्तूगिज यांच्या विरूध्द स्वाऱ्या केल्या. मात्र पहिली यशस्वी मोहीम केली ती माळवा प्रांतात.

## २.२ माळवा प्रांताची भौगोलिक पार्श्वभूमी :-

प्राचीन काळापासून माळवा प्रांत हा 'अनुपभूमी' म्हणून ओळखल्या जातो. माळव्यामध्ये धन, धान्य, संपत्ती इतकी विपुल आहे की, उणीव अशी तेथे कशाचीच नाही.[१४] 'मालव' म्हणजे प्राकृत भाषेत 'माळवा' हा शब्द मुळी 'मा+लव' या शब्दापासून झाला आहे आणि त्याचा अर्थ 'लक्ष्मीची विभूती' असा आहे.[१५] माळवा प्रांताचे प्राचीन नांव 'अवंती' होते.[१६] दख्खनची उत्तर सीमा फार कठीण व बिकट असुन त्यामुळेच दक्षिण हिंदुस्थान व उत्तर हिंदुस्थान असे भारताचे दोन भाग पडले होते.[१७] सातपुड्याच्या दक्षिणेत तापी आणि विंध्याद्रीच्या दक्षिण उतरणीवर नर्मदा असुन पलीकडे माळव्याची सीमा लागते[१८] माळव्याच्या पूर्वेस बुंदेलखंड असून पश्चिमेस राजपुताना, उत्तर-पूर्वेकडे गुजरात आणि उत्तरेला आग्राचा सुभा होता. दक्षिण किंवा गुजरात मध्ये जाण्यासाठी मग ते व्यापार अथवा लष्करी मोहिमेसाठी मार्ग माळव्यातून जात होते.[१९] समुद्र सपाटी पासुन ५००-६०० मीटर उंचीवर असलेला माळवा प्रदेशातील जमीन सुपीक व क्ाही होती.[२०] माळवा प्रांतात प्रवेश करण्यासाठी नर्मदेच्या पलीकडे तांडा, भैरव, नालछा इ. अनेक घाट आहेत.[२१] चंबळ, बेटवा आणि नर्मदा यांचा मध्यवर्ती असलेली माळव्याची भूमी अत्यंत सुपीक होती. इतकी की सुपारी फोडायला तिथे दगड मिळणे कठीण. नर्मदा, चंबळ, वैत्रवती, उर्फ बेटवा, क्षिप्रा कालीसिंध, गंभीरा, पार्वती इत्यादी लोकमानाच्या पावन जलाने ती भूमी भिजलेली होती.[२२] अशा माळवा प्रांताचे महत्व स्पष्ट करताना प्रा. बिरादार म्हणतात, "आर्थिक व राजकिय दृष्ट्या हा प्रांत महत्वाचा होता. त्याचप्रमाणे उत्तर व दक्षिण भारताला जोडणारे सर्व मार्ग या प्रांतातून जात असल्यामुळे त्यास लष्करी दृष्टयाही महत्व होते."[२३] समृध्द माळवा प्रांताचे वर्णन कबीराने आपल्या दोहात पुढील प्रमाणे केले आहे, "देश माळवा गहर गंभीर, पग पग रोटी पग पग नीर."[२४] या माळवा प्रदेशाचे ऐतिहासीक, राजकीय क्षेत्रांत मोठे योगदान आहे.[२५]

माळवा प्रांतात लष्करी ठाणी प्रस्थापित केल्याशिवाय राजपुताना, गुजरात तसेच बुंदेलखंड यांचेवर नियंत्रण प्रस्थापित करणे अशक्य होते. माळवा प्रांताला फक्त लष्करी महत्वच होते असे नव्हे तर माळवा प्रांत कृषी उत्पादन व कापड उद्योग याकरिता सुध्दा समृध्द होता.[२६] प्राचिन काळी माळवा

प्रांत विद्येचे माहेर घरच होते. या संदर्भात सरदेसाई गो. स. म्हणतात, "हिदूस्थानच्या अत्यंत भरभराटीच्या काळात उज्जनी शहराएवढे विद्या व कला हयानी सुसज्ज असे दुसरे शहर पृथ्वीच्या पाठीवर नव्हते."[२७]

अशा समृध्द माळवा प्रांतावर मोगलाची सत्ता होती. मोगल बादशाहाचे जे उत्तर भारतातील एकूण १६ सुभे होते त्यापैकी एक माळवा प्रांत. माळव्याच्या सुभ्यात एकूण ११ सरकारे व २६२ महाल होते. माळवा उर्फे उज्जैन तर्फे फजीयाबाद या सुभ्यामधील ११ सरकारची यादी पुढीलप्रमाणे आहे.

१)सरकार हवेली

२) चंदेर

३) सागरपूर (सारंगपूर )

४) शहाबाद

५) अलतगीरपूर

६) खरगून

७) गतार किंवा गागर

८) मंदोसर

९) हंडिया

१०) कांबरी (कुंभेरी)

११) पोनज दिनावाड,[२८]

**२.३ माळवा प्रदेशावरील मराठयांची प्रारंभीक आक्रमणे :-**

अशा सुपीक प्रदेशावर प्राचिन काळात पहीले आक्रमण करणारा इस्लामीक शासन म्हणजे गुलाम वंशीय अल्तमश होय. त्याने १२३५ मध्ये उज्जेनवर हल्ला करून तेथील अनेब भव्य इमारती नष्ट केल्या.[२९] मात्र माळवा प्रांतावर मराठयांची आक्रमणे आरंगजेबाच्या काळात सुरु झालीत.जेव्हा मोगल सम्राट औरंगजेब दक्षिणेत मराठा सत्तेच्या बंदोबस्तासाठी आला. त्याकालखंडात मराठ्यांनी माळवा प्रांतावर आक्रमणे केलीत.[३०] मोगल बादशाहा औरंगजेब व राजपूत राजे यांच्यात नेहमी संघर्ष

झाल्यामुळे राजपूतांनी मराठ्यांना सहकार्य करण्याचे ठरविले. त्यांच्या मदतीनेच मराठ्यांनी माळव्यात प्रवेश केला.[३१] विंध्य पर्वतावरील घाट व नर्मदेवरील उताराची माहीती मराठ्यांना राजपुतांकडूनच मिळाली त्या माहितीच्या आधारे मराठयांचा माळवा प्रांतात प्रवेश झाला.[३२] इ. स. १६९९ पासून ते इ. स. १७०६ या कालखंडात जवळ जवळ दरवर्षी मराठे औरंगजेबांच्या पिछाडीवर हल्ले करुन त्याची स्वराज्यावर असलेली पकड कमकूवत करण्यांची शर्थ करित होते.[३३] मराठ्यांचे माळव्यावरील पहिले आक्रमण इ. स. १६९९ मध्ये झाले. त्यावर्षी कृष्णा सावंत १५००० सैन्यासह नर्मदा नदी ओलांडून माळवा प्रांतातील धामणीपर्यंत लुट करून परतला.[३४] इ. स. १७०३ मध्ये मराठ्यांनी पुन्हा नर्मदा नदी ओलांडून उज्जैन सिरोंजा पर्यंत मजल मारली.[३५]

महाराणी ताराबाईच्या काळात मराठा सैन्य माळवा प्रांतावर मोठया प्रमाणात आक्रमणे करु लागले. मोगल बादशाहा सिंहगडास वेढा देऊन बसला असता, जाने. १७०३ मध्ये पन्नास हजार सैन्य घेऊन नेमाजी शिंदे माळव्यात घुसला.[३६] त्यावेळी केसो त्रीमल हा शूर सेनानी त्यांच्या सोबत होता. त्यांनी ऑक्टो. १७०३ मध्ये वऱ्हाडचा सुभेदार रुस्तमखान याचा पराभव केला. शिवाय माळव्यात लुटालूट केली. नेमाजी शिंदे यांनी सिरोज पर्यंत लुट केली. मात्र फिरोजजंगामुळे मराठ्यांचा आक्रमणाला पायबंद बसला.[३७] इ. स. १७०४ च्या फेब्रुवारी महिन्यांत नेमाजी शिंदे, केसोपंत पिंगळे, परसोजी भोसले पन्नास हजार सैन्यासह नर्मदा उतरुन काळाबागपर्यंत गेला. त्यांना रोखण्यासाठी मोगल बादशहाने गाजुद्दीनखानास पाठविले. खानाने सिरोच येथे नेमाजीचा पराभव केला.[३८] ऑक्टों. १७०४ च्या सुमारास नेमाजी शिंदे यांनी पुन्हा माळव्यावर आक्रमण केले परंतु यावेळी माळव्याचा सुभेदार सवाई जयसिंग असल्यामुळे शिंदे ची डाळ शिजली नाही.[३९] त्यानतर काही मराठयांची माळवा प्रांतावरील हल्ले कमी झालेत. दरम्यानच्या काळात माळवा प्रांतात राजकीय दुरावस्था मिर्माण झाली. म्हणून इ. स.१७०८ नंतर छत्रपती शाहू यांनी माळव्याकडे लक्ष पुरविले.[४०]

इ. स. १७१० नंतर मराठ्यांची माळव्यावरील आक्रमणे पुन्हा सुरु झाली. इ. स. १७१० मध्ये गंगाराम यांने संपूर्ण माळव्यात धूमाकुळ माजवून खंडणी वसूल केली.[४१] इ. स. १७११ नंतर मालोजी भोसले व चिमणाजी दामोदर यांच्या नेतृत्वाखाली मराठा सैन्य माळव्यात घुसले.[४२] दरम्यान

मोगल बादशाहाने सुभेदार अलीखान यास पदावरुन कमी करुन त्याजागी अंबरचा राजा सवाई जयसिंग यांची माळव्याच्या सुभेदारपदी नेमणूक केली. याचकाळात इ. स. १७१५ मध्ये कान्होजी भोसले व खंडेराव दाभाडे यांनी माळव्यात प्रवेश करुन खरगोन, धरमपुरी, बदवाणी, मंडू व महेश्वरी या भागातून खंडंणी वसुल केली.[४३] तसेच मराठयांनी मंडू आणि महेश्वर यावर आपले वर्चस्व प्रस्थापित केले.[४४] तेव्हां सवाई जयसिंग माळव्याच्या संरक्षणसाठी धाऊन आला. तेव्हा १० मे १७१५ रोजी मराठा व सवाई जयसिंग यांच्या सैन्यात पिलसूद येथे संघर्ष झाला. परिणामी मराठ्यांना माळव्यातून माघार घ्यावी लागली.[४५]

इ. स. १७१५ मध्ये पुन्हा खंडेराव दाभाडे व कान्होजी भोसले यांनी तिस हजार सैन्यांसह माळव्यात प्रवेश केला व धामधुम केली. दाभाडे व भोसले यानी उज्जयीनी जवळची अनेक गांवे लुटली.[४६] सन १७१६ मध्ये संताजी भोसले माळवा प्रदेशावर स्वारी करुन चौकीगढ येथील अधिकाऱ्याचा पराभव केला. संताजीने त्यानंतर सिंदोरा व दोराहा दिशेने मे १७१६ च्या सुमारास सरकला व तेथे लुटालुट केली.[४७] याच दरम्यान मराठ्यांच्या एका तुकडीने नर्मदेचा ढोलकियाचा घाट चढून माळव्यत जाळपोळ व लूटालूट केली. इ. स. १७१६ मध्ये मराठे संपूर्ण माळव्यात धुमाकूळ घालीत असता तेथील नायब सुभेदार रूपराम दभई हा स्वस्थपणे आपल्या राजधानीत बसला होता.[४८] इ. स. १७१७ साली खंडेरावाच्या नेतृत्वाखाली मराठा फौजेने पुनः माळव्यात प्रवेश केला. यावेळी खंडेराव दाभाडेनी आष्टा, देवगड, सिंहोर अशा अनेक प्रांतातून खंडणी वसूल केली. संताजी भोसले हा सुध्दा दाभाडे यांना येऊन मिळाला. संताजीने भिलसा येथून खंडणी वसूल केली.[४९] अशाप्रकारे बाजीराव पेशवा बनन्या अगोदर मराठयांनी मोगलाच्या प्रदेशावर आक्रमणे करुन खंडण्या मिळविण्याचा सपाटा लाविला. मात्र याला गती मिळाली ती बाजीराव हे पेशवा बनल्यानंतर.

### २.४ मोगल दरबाराची स्थिती.

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर स्वतःला बादशाहा घोषीत करुन आज्जमशाह दिल्लीकडे निघाला. त्याने कैदेत असलेल्या शाहुला दक्षिणेतील सहा सुभ्याची सरदेशमुखी देण्याचे कबुल करुन सोडून

दिले.[५०] मात्र दिल्लीकडे निघालेल्या आज्जमशाहाला जजूआ येथे शहाआलमने पराभुत केले. शाहआलमने मराठयांसोबत झालेला करार कायम ठेवला. दक्षिणेत मराठयांचे मोगलांविरुध्द सरशी झालेली असल्यामुळे मोगलांना मराठयांना चौथाई व सरदेशमुखी देणे भागच होते.[५१] इ. स. १७१२ मध्ये औरंगजेबाचा पुत्र बहादूरशहा हा मृत्यू पावला. तेव्हा त्यांच्या पुत्रात गादीसाठी संघर्ष निर्माण झ ाला. त्या संघर्षात जहांदारशाहचा विजयी होवून तो मोगल बादशाह बनला. परंतू यावेळी त्याचा भाऊ अजिमुशन याचा पुत्र फरुखशियर हा बंगालमध्ये होता. त्यांने बंड करुन सैय्यद बंधूच्या सहकार्याने दिल्लीवर आक्रमण केले.[५२] त्यातुन १ जानेवारी १७१३ रोजी आग्रा जवळ समुगड येथे झालेल्या संघर्षात जहागीर पराभूत होवून मारला गेला.[५३] तेव्हा फरुखशियर हा मोगल बादशाह बनला. मात्र १८ फेब्रुवारी १७१९ रोजी सय्यद बंधूनी फरुखशियर यास कैद केले. त्यानंतर दिल्लीत अंतर्गत संघर्ष होवून दोन बादशहा दिलीच्या गादीवर आले. शेवटी मंहमंदशाह हा दिल्लीचा बादशहा बनला त्याने ८ सप्टेंबर १७१९ रोजी राज्यरोहण केला.[५४] मराठयांच्या सहकार्याने सय्यद बंधूने दिल्लीच्या गादीवर मंहमंदशाह यास बसविले.[५५] सय्यद बंधूने मराठयांना मोगल बादशाहाकडून दक्षिणेतील सहा सुभ्याची चौथाई व सरदेशमुखी सनद मिळवून दिली.[५६] यानंतर दिल्लीच्या दरबारात सय्यद बंधुचे वर्चस्व निर्माण झाले. परंतू अल्पावधीतच सय्यद बंधुची दिल्ली दरबारातून हकालपट्टी झाली. एवढेच नव्हे तर ८ ऑक्टो. १७२० रोजी सय्यद हुसेन यास ठार करण्यांत आले. तर सय्यद अब्दुला यास कैद करण्यांत आले. अशाप्रकारे सय्यद बंधुचा बंदोबस्त झ ाल्यानंतर दिल्लीच्या दरबारात निजाम-उल-मुल्क यांचे वर्चस्व प्रस्थापित झाले. निजाम-उल-मुल्क अतिशय मुत्सद्दी व कटकारस्थानी होता. महत्वाची गोष्ट म्हणजे निजाम-उल-मुल्क हा मराठयांचा कट्टर विरोधक होता. त्याने इ. स. १७१९ मध्ये बादशाहाशी झालेला तह नाकारुन मराठयांना चौथाई व सरदेशमुखी देण्यांचे नाकारले.[५७]

मात्र कालांतराने निजामाने नालछा येथे बाजीरावाची भेट घेतली. १८ मे १७२४ बंडखोर म्हणून जाहीर केलेल्या निजाम उल मुल्क यास यावेळी मराठयांच्या सहकार्याची नितांत आवश्यकता वाटत होती. त्यामुळेच याभेटीत त्याने दक्षिण सुभ्यातुन चौथाई व सरदेशमुखी वसुल करण्याचे अधिकार मराठयांना देऊ केले. या शिवाय पेशवा बाजीराव यांना सैन्य उभारण्यासाठी आर्थीक मदत

करण्याचेही आश्वासन दिले.[५८] याचवेळी मोगल बादशाहाने गिरीधर बहादूर यांची माळवा प्रांताच्या सूभेदारपदी नेमणूक केली. तो माळवा प्रांतात आल्यानंतर मराठयांना विरोध करावयास सूरवात केली. तेव्हां गिगराधर बहादूरचा बंदोबस्त करण्यांसाठी चिमाजी आप्पाला माळवा प्रदेशात पाठविण्यात आले. माळवा मोहीम करुन आप्पाने गिरीधरचा कायमचा बंदोबस्त केला. चिमाजी आप्पा व गिरीधरचा संघर्षाचा आढावा घेण्यापुर्वीमुळे गिरीधरचा पुर्व इतिहास पाहणे आवश्यक ठरते.

### २.४.१ मोगल सुभेदार गिरीधर बहादुरचा पुर्व इतिहास.

मोगल बादशाहीत अनेक नामवंत सरदार होवून गेलेत. त्यापैकी एक गिरीधर बहादुर हा मोगलांचा माळवा प्रांताचा सुभेदार. त्यांच्या पूर्वजांनी (बहादूर घराण्यानी) अनेक वर्ष मोगल बादशाहीत सेवा केला. गिरिधर बहादुरचे वडील दयाराम व काका छबिताराम मोगल बादशाहाच्या चाकरीत होते.[५९] त्यापैकी दयाराम बहादूर यांनी तर मोगल बादशाहासाठी आपले प्राण गमाविले. त्यानंतरचा काळात छबितराम यांने मोगल बादशाहा जहांगीर यांना सहकार्य केले. त्यामुळे बादशाहा जहांगीरने छबिताराम यास करामा विकपुरचा फौजदार म्हणून नेमले. त्याकाळी गिरिधर बहादूर आपल्या काका सोबत म्हणजे छबिताराम सोबत राहत असे. कालांतराने मोगल बादशाहा जहांगीर व फरुखशियर यांच्यात मदभेद होवून संघर्ष झाला. त्यावेळी छबिताराम बहादूर यांने पराक्रम केल्यामुळे फरुखशियरला विजय मिळाला.[६०] नंतरच्या काळात दिल्लीच्या दरबारात सय्यद बंधूचे वर्चस्व निर्माण होवून त्यांनी मराठयांच्या सहकार्याने मोगल बादशाह फर्रुखशियर यास कैद करुन ठार केले. त्याचवेळी सय्यद बंधुने छाबिताराम यास ठार करण्यांचे ठरविले. परंतू छबिताराम याचवेळी मृत्यू पावला.[६१] तेव्हा छाबिताराम यांच्या अंतविधीसाठी गिरिधर बहादूर प्रयागला गेला. त्यानंतर गिरिधर बहादूर वर्षभर परत आलाच नाही. तिकडेच त्याने अलाहाबादचा किल्ला ताब्यात घेतला. तसेच मोठया प्रमाणात सैन्य व प्रचंड संपत्ती जमविली. त्यामुळे गिरिधर बहादुर बलाढय बनला. अशावेळी त्यांच्या मैत्रीची आवश्यक्ता सय्यद बंधूला वाटू लागली. त्यांनी आपल्या दिवाणामार्फत गिरीधर बहादुर यास अयोध्याचा सुभा दिला. शिवाय तिस लाख रुपये देवून सय्यद बंधूने गिरिधर सोबत मैत्री प्रस्थापित केली. इ. स. १७२२ मध्ये मोगल बादशाहाने गिरिधर बहादूरला माळवा

प्रांताची सुभेदारी दिली. याचवेळी जयसिंगाने आग्रा आपल्याजवळ ठेवून गिरिधरला त्याच्या वतीने माळव्याची सुभेदारी दिली.[६२] गिरिधर बहादूर व दयाबहादुर हे ३० ऑगष्ट १७२२ ते १५ मे १७२३ या कालावधीत माळव्याच्या कारभार पाहत होते.[६] मात्र गिरीधर माळवा प्रातात आला व त्यांने मराठयांना विरोध करण्यास सुरुवात केली परीणामी त्याचा बंदोबस्त करण्यांसाठी शाहू महाराज व पेशवा बाजीराव यांनी आप्पाच्या नेतृत्वात माळवा मोहीम काढावी लागली. त्यासाठी गिरिधर यांचे व त्यांचे चुलत बंधू दया बहादूर यांचे मराठा विरोधी धोरण कारणीभूत ठरले.

### २.४.२ गिरीधर बहादूरची मराठा विरोधी भुमीका.

मोगल बादशाहाच्या दरबारात याकाळात निजामाचे वर्चस्व वाढून तो वजिरपदी आरुढ झाला होता. मात्र निजाम-उल-मुल्क यांनी वजिर पदाचा राजीनामा दिला व दक्षिणेकडे प्रयाण केले.[६४] परीणामी निजाम-उल-मुल्क यांच्या हलगर्जीपणामुळे मोगल बादशाहाने पुनः अजित मुल्लाच्या जागी गिरिधर बहादूर यास माळवा प्रांताची सुभेदारी दिली. १२ एप्रिल १७२५ रोजी गिरिधर बहादूरने माळव्याची सुत्रे हाती घेतली.[६५] सूत्रे हाती घेताच गिरिधरने माळव्याकडे प्रयाण केले. २ जुन १७२५ रोजी तो उज्जयीनीला पोहचला.[६६] गिरिधर बहादूर माळव्यात दाखल झाला असता सवाई जयसिंग यांनी त्यास मराठयांशी सहकार्याचे धोरण ठेवण्याचा सल्ला दिला. मात्र गिरिधर बहादूर यांने त्या सल्याकडे दुर्लक्ष केले. उलट स्वतःच्या स्वतंत्र धोरणाला जास्त महत्व दिले. कारण त्यास समजून चुकले होते की, दिल्लीची बादशाही ऱ्हासाला लागली आहे. त्यामुळे माळव्यात आपले स्वतंत्र्य राज्य निर्माण करावे[६७] त्यानंतर गिरिधर बहादूर हा दया बहादूरच्या सहाय्याने स्वतंत्र्यपणे माळव्याचे सुत्रे साभांळू लागला. त्यामुळे सवाई जयसिंग व गिरिधर यांच्यात मतभेदास सुरुवात झाली.[६८] गिरिधर बहादुर सोबत त्यांचा चुलत भाऊ दया बहादूर होता. त्यांने मराठयांना माळव्यातून हाकलून लावण्याची शपथ घेतली होती. त्यास लागण्याऱ्या सर्व प्रकारची मदत मोगल बादशहानी त्यांना दिली[६९] परीणामी गिरिधर बहादूरने मराठयांना माळवा प्रदेशात चौथाई व सरदेशमुखी वसुली करण्यांस मनाई केली. अशावेळी मराठा सरदारांनी गिरिधर बहादूरची छत्रपती शाहुकडे तक्रार केली. शाहु महाराजांनी गिरिधर बहादूर यास मराठयांना वसुली करु द्यावी असा

आदेश दिला.[७०] तसेच बाजीराव पेशवा यांचा माळवा प्रांतात चौथाई व सरदेशमुखी वसुली करण्याऱ्या केसो महादेव यास शाहू महाराजांने आश्वासन पर पत्र लिहीले. "प्रधानपंती आपणांस माळव्यात पाठविले. परंतू गिरिधर बहादूर सरदेशमुखी व चौथाईचा अंमल चालो देत नाही या विशी त्यांनी स्वामीस लिहीले आहे. अंमल चालो देणे म्हणून त्यास लिहीले आहे. याउपरी अंमल चालवतील."[७१] परंतू गिरिधर बहादूरने त्याचा गांभीऱ्यांने विचार केला नाही.[७२] कारण याकाळात माळवा प्रदेशात गिरिधर बहादूर परिवाराचे वर्चस्व प्रस्थापित झाले होते. माळवा प्रांतातील बहादूर परिवाराच्यां स्थितीचे वर्णन करताना प्रा. पुराणीक लिहीतात, "गिरिधर बहादूर सुभेदार, दया बहादुर सेनापती आणि भवानीराम, गिरिधरचा मुलगा यांच्या कडे उज्जयीनीचा कारभार अशी एकंदर कौटूंबिक स्थिती होती."[७३] त्यामुळे गिरिधर बहादूर व दयाबहादूर यांनी मराठयांना माळवा प्रदेशात चौथाई व सरदेशमुखी वसुली करण्यांस मनाई केली. त्याच्या भुमिकेविषयी नगराळे लिहीतात, "Daya Bahadur the cousin of Giridhar Bahadur restrainted the maratha activities with all his valour. The Maratha were practically driven out of the province. They could not collect a single rupee inspite of their best efforts."[७४]

माळवा प्रांतात राजकीय वर्चस्वाबरोबरच बहादूर बंधूकडे मोठया प्रमाण्यात सैन्यही होते. त्यांची माहिती पुढील प्रमाणे, 'दया बहादूर सुभा उज्जैन बीतशाई आहेत, त्याबरोबर सरंजाम साठ हजार पठान व चाळीस हजार गोलंदाज तर तिनशे तोफा आहेत.'[७५] राजकीय वर्चस्व, सैन्यबळ याबरोबरच गिरिधर बहादूरकडे अमाप संपत्ती होती. त्यामुळे शाहु महाराजांनी त्यास पत्र पाठविले असले तरी त्यास भिक घालणारा गिरिधर नव्हता. त्यांनी मराठयांच्या अनेक सरदारांशी लढा देण्यांची तयारी सुरु केली होती. माळव्यावर आक्रमणासाठी येत असलेल्या पिलाजी जाधव, आनंदराव पवार, कंठाजी कदमबांडे इत्यादीना परतून लावण्याचा आटोकाट पर्यंत बहादुर बंधु करीत होते.[७६] बहादुर बंधुच्या मराठा विरोधी धेरणामूळे त्यांचा बंदोबस्त करण्यांसाठी आप्पाच्या स्वारीचे प्रयोजन करण्यांत आले. आप्पाने स्वत: नेतृत्वाखाली केलेली माळवा ही पहीली मोहीम होती. या मोहीमेला यावेळेची माळवा मधील राजकीय स्थिती अनुकूल होती.

## २.५ माळवा प्रांतातील राजकिय स्थिती मराठयांना अनूकुल.

गिरिधर बहादूर माळवा सुभेदार बनल्यानंतर माळव्याच्या राज्य कारभारात गोधंळाची स्थिती निर्माण झाली. गिरिधर बहादूर अत्याच्यारी धोरणामुळे तेथील प्रजा अतिशय त्रस्त झाली होती. जनतेबरोबर जमीनदार व ठाकूरही त्रस्त झाले होते.[७७] त्यांनी मोगल बादशाहाकडे सुभेदाराची तक्रार केली. मात्र मोगल बादशाहाने त्यांच्या तक्रारीकडे दुर्लक्ष केले. परिणामी ठाकुर व जमीनदाराने सवाई जयसिंगाकडे सुभेदाराविषयी तक्रारी केली. तेव्हा सवाई जयसिंग यांनी मराठयांचे सहकार्य घ्यावे असा सल्ला दिला.[७८] याकाळात दिल्ली दरबाराचे आपल्या सरदारांवर नियंत्रण नव्हते. निजाम-उल-मुल्क दिल्ली सरकारच्या आदेशाला न जुमानता दक्षिणेत आपल्या मर्जी प्रमाणे वागत होता. दिल्लीच्या मोगल बादशाहाला निजाम-उल-मुल्कचे बंदोबस्त करणे आवश्यक होते. यासाठी बादशाहाने इ. स. १७२२ मध्ये गिरीधर बहाद्दुरची माळव्याच्या सुभेदार म्हणून नेमणूक केली.[७९] गिरीधर बहादूर व दया बहादूर ३० ऑक्टोबर १७२२ ते १५ मे १७२३ पर्यंत माळव्यावर कारभार पाहत होते.[८०] त्यांच्या अत्याचारी धोरणामुळे रयतेची स्तिथी अतिशय दयनीय झाली होती. कोणी यावे व रयते कडुन पैसा लुटावा असे प्रकार सतत होवू लागले. जनतेने बादशाहाकडे दाद मागितली मात्र बादशाहाने साथ दिली नाही.[८१] या अस्थिर स्थितीचा फायदा मराठयांना झाला. बाजीरावाने पेशवाईची सुत्रे हाती घेतल्यापासुन माळवा आणि गुजरात प्रांतावर आपला अंमल बसविण्याचा प्रयत्न सुरु केलेला होता.[८२] शिवाय पेशवा बाजीरावाने पुरंदरे, दाभाडे, भोसले यांना गुजरात, खानदेश, वऱ्हाड, माळवा प्रांतात मोहीमेवर पाठविले. त्यांनी उत्तरेत अनेक स्वाऱ्या करुन मोगल बादशाहाला त्रस्त केले. परिणामी मराठयांचा उत्तरेत दरारा प्रस्थापित झाला.[८३] इ. स.१७२६ मध्ये अंबाजी त्रिंबक, पिलाजी जाधव, रघुजी व राणोजी भोसले आणि आनंदराव पवार यांनी माळव्याप्रदेशात आक्रमणे करीत होते. त्यांना परवून लावण्याचा बहाद्दूर बंधू शर्थीचे प्रयत्न करीत होते.[८४]

बाजीराव पेशवा यांचे यावेळी ठाम होते की, उत्तर भारत काबिज करावयाची असेल, तर माळवा या मोक्याच्या ठाण्यावर आपले वर्चस्व असले पाहीजे. हे साध्य करावयाचे असल्यास प्रथम माळवयातील एक प्रमुख सत्ता म्हणजे राजपुत. तेव्हा रजपुतांशी स्नेहसंबंध वाढविण्याचा त्याने

प्रयत्नही केला होता. राजपूत मोगलांचे ताबेदार असले, तरी त्याच्या बंधनातून मुक्त होण्याची त्यांचीही इच्छा होती.[८५] कमकुवत झालेली बादशाही राजपूत व मराठे यांनी मिळून नष्ट करावी अशी राजपुत राजा जयसिंगाची मनिषा होती.[८६] चिमाजी आप्पाच्या मोहीमेसाठी उत्तरेतील काही सरदारांनीही योग्य ती मदत केली. नर्मदाचे उत्तर व विध्यांचलाचे घाट याची माहीती आगाऊ आणून मोगली सैन्यांची रचना बिनचुक आणण्याचे कार्य मल्हारराव होळकर, उदाजी पवार इत्यादींनी योग्यरित्या पार पाडली.[८७] विशेषत: यावेळी नंदलाल मंडलोई यांचे सहकार्य मराठयांच्या उपयोगी पडले. नंदलाल यांचे नर्मदेच्या घाटांवर नियंत्रण होते.[८८] याकाळात सवाई जयसिंग यांनी गिरीधर बंधूना मराठयांबद्दल सहानुभूती ठेवून सहकार्य करण्यांचा सल्ला दिला होता. त्यासोबतच नंदलाल मंडलोई या ग्वाल्हेर जमीदारानीही मराठयानां सहकार्य करण्यांचा गुप्त सल्ला.[८९] नंदलाल हा अतिशय प्रभावशाली जमीनदार होते. त्याचे आसपासच्या जमीनदार व वतनदारावर वर्चस्व होते. महत्वाचे म्हणजे माळव्यात प्रवेश करण्यासाठी सोयीच्या असलेल्या घाटांवर त्याचे वर्चस्व होते. भैरव, तांडा, नालछा व इतर उथळ पात्र असलेल्या ठिकाणावर मंडलोईचा कब्जा होता.[९०] वास्तविक पहाता यावेळी मंडलोई प्रमाणेच बढवानीचा अनुपसिंग ठाकुर हाही गिरीधर बहादूर यांच्या अत्याचाराने त्रस्त झाला होता. अनुपसिंग यांने पेशवा बाजीरावाची जानेवारी १७२३ च्या सुमारास भेट घेतली. तेव्हांच अनुपसिंगाने मराठयांना सर्वोतोपरी मदत देण्याचे कबुल केले होते.[९१] काही सरदारा प्रमाणेच काही जमातींनी मराठयाना सहकार्य केले. विध्यांद्रीच्या परिसरात भिल्ल लोकांचे वास्तव होते. त्याचा व्यवसाय म्हणजे वाटमारी करणे. त्यांनाही दया बहादुर व गिरिधर बहादूर यांनी त्रस्त केले.[९२]

थोडक्यात याकाळातील माळवा प्रांतातील स्थिती मराठयांना अनूकूल होती. बाजीराव पेशवा यांची अनेक वर्षापासुन माळवा प्रांतातून चौथाई व सरदेशमुखी वसुल करण्याची इच्छा होती आणि या कार्यासाठीच चिमाजी आप्पास माळव्यात पाठविले होते.[९३] आता पर्यत आप्पा हे घरातील, छत्रपती शाहूंच्या दरबारातील छोटे मोठे कामं पाहत होते. म्हणजेच घरगुती व मुलकी कार्यच पार पाडीत. परंतु पेशवा बाजीराव यांनी यावेळी आप्पांवर मोठी जबाबदारी टाकली ता सैन्य नेतृत्व करण्यांची. आणि तेही दुरच्या माळवा प्रांताची.

## २.६ चिमाजी आप्पाची माळवा मोहीम.

चिमाजी आप्पा यांच्या माळवा माहीमे आधीच कंठाजी व सेनापती खंडेराव दाभाडे यांनी इ.स. १७२८ च्या प्रारंभी स्वारी करुन डोंगरपुर, बालवाडा, झबुवा व ईतर अनेक ठीकाणे लुटून मुलख खराब केला होता.[९४] यावेळी माळव्यातील राजपुत राजे, जमीदार, बुंदेले राजपुत यांनी औरंगजेबाचा अत्याचार आठवून त्यांनी मराठयांना सहकार्य करण्यांची भुमीका घेतली. राजपुतांचे सहकार्य व बाजीरावाच्या सहकारी वर्गाच्या धाडशी व युक्तीबाज कार्याने मराठयांना माळवा जिंकणे सोपे झाले.[९५]

पेशवा बाळाजी विश्वनाथच्या काळापासूनच मराठे माळव्याच्या राजकारणात सक्रिय झाले होते. शिवाय त्यापूर्वीच मराठे माळवा मध्ये गेले असल्यामुळे तो प्रदेश त्यांना चांगला परिचयाचा होता.[९६] बाळाजी विश्वनाथाने दिल्लीच्या बादशाहा कडून दक्षिणेतील चौथाई व सरदेशमुखीची सनद आणली त्यामुळे मराठयाची साम्राज्य विस्ताराची महत्वाकांक्षा जागृत झाली.[९७] कालांतरानी निजाम-उल-मुल्क हा दक्षीणेत आला असता बाजीराव व निजाम यांची बोलशा येथे बाजीराव व निजाम यांची १८ मे १७२४ रोजी ही भेट झाली. तयाभेटीत बाजीराव यांनी निजामाला दक्षीणेतील सगळी माहीती सांगीतली. तेव्हा निजामाने मराठयांना चौथाई व सरदेशमुखी देण्याचे मान्य केले.[९८] त्याभेटीनंतर उत्तरेत मोहीम काढण्याचे बाजीरावानी ठरविले. नर्मदा व विध्यांद्री या मधील जंगलमय तसेच अवघड प्रदेश ताब्यात घेवून दक्षिणेत येणारा मार्ग बंद करण्याचा त्याचा हेतू होता.[९९]

माळवा प्रदेशातील महत्वाची सत्ता म्हणजे राजपुताची, आणि राजपुत तर अनेक वर्षा पासुन मोगलाचे अनूयायी होते.[१००] मात्र रजपुत मोगलांचे ताबेदार असले तरी त्यांच्या बंधनातून मुक्त होण्याची त्यांची मनिषा होती.[१०१] जयपुरचा राजा जयसिंग हा प्रारंभा पासुन शाहु महाराजांकडे कल असलेला व्यक्ती होता.[१०२] जेव्हा याळात गिरीधर यांने माळवा प्रांतात अत्याचार चालविला होता. अशा ही परीस्तिथीत मोगल बादशाहाने गिरिधर बहादूरचा पाठपुरावा सुरु केला. तेव्हा बादशाहाला खच्ची करण्यांची ताकद मराठे यांच्यातच आहे, हे सवाई जयसिंगाने ओळखले होते[१०३] अशावेळी दादोराव भिमसेन यास पेशवा बाजीरावा यांने सवाई जयसिंगाच्या भेटीस पाठविले. त्यांने माळवा प्रांतावर स्वारी केल्यास आपणास दिल्लीहुन कितपत पाठबळ मिळेल याची विचारणा केली. त्यावेळी

दादाराव भिमसेन यानी १७ ऑगष्ट १७२८ रोजी जयपुर येथून पेशवा बाजीराव यांना निरोप पाठविला. "दसरा होताच फौजेनिशी यावे म्हणजे मोठे मनोरथ सफल होतील. फौज माळव्यात येऊन धामधूम केली पाहीजे".[१०४] त्यापत्रावर भिस्त ठेऊन चिमाजी आप्पा व बाजीरावाने उत्तरेतील मोहिमेचे नियोजन केले.[१०५]

चिमाजी आप्पा यांच्या माळवा मोहीमेची कारणे पुढील प्रमाणे.

धान्य उत्पादनासाठी सैन्याची आवश्यकता, फौजेचा खर्च भागविण्यासाठी किफायतशीर काम पाहीजे. शिवाय राज्यकारभार सुरळीत चालविण्याची सर्व जबाबदारी बाजीरावाची होती. त्यासाठी एखाद्या परिणाम कारक विजय मिळविल्या शिवाय पेशव्याची हुकूमत चालत नव्हती. अशा अनेक अडचणीचा विचार विनीमय चिमाजी आप्पा व बाजीरावानी आपल्या निकटवर्ती सहकार्यांशी केला.[१०६] याशिवाय चिमाजीच्या या उत्तरेकडील स्वारीचा एक उदेश हाही होता की, खंडेराव दाभाडे, भोसले, सरलष्कर इत्यादींना वठणीवर आणणे ते शिरजोर बनल्यास त्याजागी आपल्या हुकूमतीतील वागणारे नवीन सहकारी मिळविणे.[१०७] त्यासाठी संपत्ती व सैन्या विषयी चिमाजी व बाजीराव याने विचार विनिमय केला व उत्तरभारताकडे आपली दृष्टी वळविली.[१०८] माळवा प्रांताविषयी बाजीरावाची सारी भिस्त चिमाजी आप्पा या आपल्या बंधुच्या सहकार्यावर अवलंबुन होती. कारण कर्नाटकातील राजकारणे, निजाम, दाभाडे, कोल्हापूरचा संभाजी राजा इत्यादी मंडळी बाजीरावाला हवी ती स्वस्थता मिळू देत नव्हती.[१०९] बाजीरावाचे असे ठाम मत होते की, उतर काबिज करावयाची असेल तर माळवा या महत्वाच्या प्रांतावर आपण पहिले कब्जा मिळविला पाहिजे. इ. स. १७२८ च्या पावसाळयात चिमाजी अप्पा व बाजीराव या बंधूंनी आपल्या निकटच्या सहकाऱ्यांशी अनेक दिवस चर्चा केली. चर्चेअंती चिमाजीने बागलाण खानदेश मार्गांनी सैन्य गोळा करीत जावे. त्यानंतर नर्मदेवर स्तिथीचा आढावा घेऊन आपली आघाडी मारावी.[११०] या मोहिमेची माहीती छत्रपती शाहूला दिल्या गेली नाही. कारण छ.शाहू नाराज होतील व स्वारीला अनुमती देणार नाहीत. त्याना हे माहित होते की महाराजावर फार कर्ज झाले आहे आणि त्यांना कर्जमुक्त करणे हाच आपला उद्देश्य आहे.[१११]

स्वत: बाजीराव पेशवा माळवा मोहीमेवर जाणार होते. परंतू दक्षिणेत कटकट उदभवला त्यामुळे बाजीराव पेशवा याने माळवा मोहीमेची धूरा चिमाजी आप्पाने सांभाळावी असे ठरविले.[११२]

*चिमाजी आप्पाने व बाजीराव पेशवा यांनी यावेळी आपल्या बायका स्वारी सोबत घेतल्या होत्या.*[११३] *बाजीरावाने अहमदनगर, चांदा आणि देवगडमार्गे बुंदेलखंडात जाण्याचे ठरले. दोघांनीही एकमेकांच्या संपर्कात राहण्याचे ठरविले कारण आवश्यकता पडल्यास एकमेकांना सहकार्य करता येईल.*[११४]

*चिमाजी आप्पा दिवाळीपर्यंत माळवा मोहिमेसाठी रवाना होऊ शकले नाही. तर बाजीराव त्यापेक्षा उशिराने मोहिमेस निघाला. कारण सातार्‍याच्या शाहू छत्रपतीने बाजीरावास आपल्या जवळ बोलावून घेतले होते. शाहू महाराजांना तुळजापूरला देवीच्या दर्शनासाठी बाजीरावास सोबत न्यायचे होते.*[११५] *याचवेळी मातोश्री राधाबाई पंढरपुर व तुळजापूरला जगदंबा देविच्या दर्शनासाठी गेल्या होत्या. त्या देवदर्शनाहुन  पुण्यात परत आल्यानंतर मातोश्री राधाबाईचा आशीर्वाद व पेशवा बाजीरावाची आज्ञा घेऊन चिमाजी आप्पा माळव्यांच्या रोखाने निघाला.*[११६] *पूर्वसंकल्पाप्रमाणे कार्तिक शुध्द द्वितीयेला भाऊबीज उरकून चिमाजी अप्पा पुण्याहून निघाला.*[११७] *चिमाजी माळवा मोहीम जाताना बाजीरावाकडे  सरदाराची मागणी करतो. तेव्हा बाजीराव चिमाजी आप्पास लिहीतो, 'गोरखोजी भापकर व देवकाते व सोलके वग्रे लोक तुम्हाला येवून मिळतील. तुम्ही मजल दरमजल जाणे.'*[११८] *याशिवाय  बाजीराव पेशवा प्रमाणे चिमाजी आप्पांना लिहतात. 'तो बैसऊन पुढेपारे मरावया तिकडे जाणे तिकडे जाऊ. तुम्ही वर्तमान निरंतर लिहीत जाणे. सारांश गोस्ट विचारे करुन कर्जाचा परिहार होऊन पोख्ता हाय ते करणे.'*[११९]

*बाजीराव पेशवा याने माळवा स्वारीवर निघण्यापुर्वी पुन: एकदा या स्वारीचे उदेश चिमाजी आप्पांना सांगीतले. शाहुच्या कर्जफेडीसाठी पैसा उत्पन्न करण्याच्या हेतूची जाणिव चिमाजी आपपास करुन दिली. "येथे कर्जदारियांची व दरमाहेच्या पैकियाची वोढ सातार्‍यास आहे. त्यास तुम्ही तिकडे गेलीयावर अर्ध यैवज साधेल तो हरयेले पाठवून देणे, म्हणून तुम्हास सांगीतले. त्यास तुम्हीही मान्य केले आहे. तदंनुरुप यैवज येथून पाठवावा हे विवंचनात असाल. त्यास मार्ग दुर्घट, ऐवज आला पाहीजे,हा कदाचित विचार प्राप्त होईल, तर केशवदास कुंवरजी साहुकार औरंगबादेस मातबर आहेत. याचे गुमास्ते उज्जनीस किसनाजी सावकार आहे. त्यास केसोदास याचे पात्र पाठविले आहे, जर तुम्हांस यैवज पाठवायचे कार्य लागले तर रा. जगन्नाथ नाईक याचा गुमीस्ता काढू.*

यास उजनीस पाठऊन केशवदास कुवरजी याचे पत्र पाठऊन त्या गुमास्तियास बोलाऊन, आपणावळ आणून पैका त्याचे पदरी घालून, त्याची हुंडी करु पाठविणे, म्हणजे यैवज सातारीयास वोढीच्या प्रयोजनास परविष्ट होईल. राजश्री कृष्णाजी नाईक जोशी यांचा पैका बहुतच द्यावा आहे. त्यास मारनिलेकडील शामजी नाईक यास येथे ठेवून घेतले आहे. तुम्हां बराबरी माहादाबा नाईक बाल मंकुदजी हे दोघेजण आहेत. त्याचे पदरी पैका घालुन सुरक्षित पावे ते गोष्ट करणे. पन्नास साठ रुपये पर्यंत घालणे. राजश्री स्वामी कडुन पैकिया साठी कारकुन व जमादार समागमे आहेत. त्यास एक रुपयापर्यंत पैका देणे जर ईश्वर इच्छेने पैका फारसा (मिळाला) तरी उभयतांचे समाधान रसून नेमस्त गोष्ट दरबारी सांगन यैसे करुन ठेवणे. जिकडे पैसा फारसा मिळेत आसेन तिकडे जाणे. कर्जदार आधी वाटणे. लोकास पैसा फारसा न देणे. तनू पोटाची राखणे."[१२०] पेशवा बाजीराव यांचे पत्र मिळताच चिमाजी आप्पाने पेशवा यास जबाब दिला की, "सातारियाकडे ऐवजखाना करावा विसी लिहीले याखेरीज दुसरा निजीध्यास नाही."[१२१] यावरुन हे स्पष्ट होते की माळवा माहीमेचे एक कारण हे पैसा वसूल करणे होता.

९ नोव्हेंबर १७२८ रोजी पेशवा बाजीराव यांच्या आदेशाने चिमाजी आप्पा गोदावरी, बागलाण व खानदेश मार्गे माळव्याकडे निघाला.[१२२] माळवा मोहीमेवर निघालेल्या चिमाजी आप्पा यांचा पहीला मुक्काम गाणेश नजीक वाघोळे येथे झाला. त्यानंतर घोडनदी-संगमनेर, पिपंळ, चांदवड यामार्गानी मार्गस्थ होवून चिमाजी आप्पा कार्तीक वद्य पक्षात खानदेशात प्रवेश केला. ही मोहीम अतिशय जलदगतीने मार्गस्थ झाली. एका महीन्यात चिमाजी आप्पाचे सैन्य नर्मदा तिरावर पोहचले. यावेळी त्यांच्याबरोबर भिमराव रेठरेकर, गणपतराव मेहेंदळे, नारो शंकर, संताजी माणकेश्वर, गोविंद बल्लाळ अशी नव्या दमाची माणसे होती.[१२३] शिवाय गोरखोजी भापकर, मल्हारराव होळकर, उदाजी पवार, देवकांते, सोळंकी इत्यादी करती व विश्वासाची माणसे होती.[१२४] २५ नोव्हेंबर १७२८ रोजी धरमपुरीजवळ त्याने नर्मदा ओलांडली.[१२५] त्यानंतर मंडू या धाटमार्गाने चिमाजी आप्पाने नालछाकडे प्रयाण केले.[१२६] यावेळीमल्हारराव होळकराने मंडलोईस आज्ञा केली की "आम्हास घाटातील वाट निरोध्याची दाखवावी दोन प्रहरचे संधीस आम्हास त्याजवर नेऊन सोडावे."[१२६अ] इंदूरच्या नंदलाल चौधरी मंडलोई यांच्या मार्फत नर्मदेवरील उतऱ्याच्या जागांची

माहीती मराठयांना करुन दिली.[१२७] सुरुंगाची बातमी समजता नंदलाल मंडलोई व अनुपसिंग ठाकुर यांच्या सल्ल्याने चिमाजी आप्पा तांडा घाटाने न येता रस्ता बदलून आड मार्गाने भैरवघाटाने कुच करुन नालछा गाठले.[१२८] २७ नोव्हेंबर १७२८ रोजी चिमाजी आप्पाने नालछा येथे छावणी केली.[१२९] माळवा माहीमेत आप्पाचा मुक्काम विवीध ठिकाणी झाला त्याची सविस्तर नोंद पुढीलप्रमाणे.

"छ २१जमादिलाखर समान अशरीन २२ जानेवारी १७२८

छ मजकुरी रा. उदाजी पवार यांची भेट जाली.

"छ २५ रजब समान अशरीन २५ जानेवारी १७२८

फालगून बहूल द्वाअसी भानूवासर मु. नजीक पालखेद मुघलारस जुज जाल.

| मुक्काम | समान अशरीन |
|---|---|
| छ १ साबान | मु. गलनिंब |
| छ २ साबान | |
| चैत्र शु. चतुर्थी भानुवासर | मु. गलनिंब |
| छ ३ साबान | मु. खरडी |

( बाजीरावाचे मुकाम अशरीन )

मा.

१. गलनिंब

२. गलनिंब

३. खरडी पा सेवगाव नजीक पैठण गंगा दक्षिण तीर

४. खरडी पा सेवगाव नजीक पैठण गंगा दक्षिण तीर

५. सौम्यवार चैत्र शु. ७ (६ एप्रील१७२८) नजीक मुंगी प्रा सेवगाव छ मजकुरी तह मुघलासी जाला.

६. नजीक मुंगी प्रा सेवगाव

७. नजीक मुंगी प्रा सेवगाव

८. नजीक मुंगी प्रा सेवगाव

९. टाकसरी मुंगी प्रा सेवगाव

१०. गंगातीर

११. लाखेफळ प्रा सेवगाव

१२. सावखेडे

१३. बळनिंब

१४. जांबगाव गोदा दक्षिण तीर

१५. पाचलेगाव प्रा नेवासे

१६. पाचलेगाव प्रा नेवासे

१७. नेवासे

१८. बारागाव नांदूर

१९. बारागाव नांदूर

२० वावरथ

२३. निघोज प्रा पारनेर

२४. निरगुड

२५. निरगुड

२६. निरगुड

२९. कोथळे

तिसा अशरीन

स्वारी राजश्री चिमनाजी बलाळ

रबिलाखर

छ १७ राखर कातिंक वा ४ पिपळस जांबली प्रा चांदवड ९ नोव्हेबर १७२८

छ १९ राखर झाडी प्रा निंबाईत

छ २३ राखर वारी प्रा धूळे

छ २५ राखर तोरखेड प्रा नंदुरबार

| | |
|---|---|
| छ २७ राखर | मदीने प्रा सुलतानपुर |
| छ २९ राखर | बारी करवंदीचे तोंडी नजीकवड |
| छ २ जावल | मु. राजपुरानजीक |
| छ ३ जावल | नर्मदा दक्षिणतीर |
| छ ४ जावल | नर्मदा उतरतीर नजीक धर्मपुरी |
| छ ६ जावल | नालछा सरकार मांडवा सूभा माळवा |
| छ ८ जावल | मार्गसीर्ष शु. १० भृगुवार ( २९ नोव्हेबर १७२८) |
| | मु. आंबझीरे" [१२९अ] |

अशाप्रकारे मार्गक्रम करीत जात असताना बाजीरावचे आप्पाच्या मोहीमेवर लक्ष होते. चिमाजी आप्पांच्या मोहिमेवेळी बाजीराव तुळजापूरला असला काय किंवा गंगाथडी किंवा नगरमार्गे वऱ्हाड कडे दौड चालू असली तरी त्याचे सारे लक्ष चिमाजीकडे लागले होते. कारण चिमाजी आप्पांनी महाराष्ट्रा बाहेर स्वत:च्या नेतृत्वात केलेली ही पहिलीच मोहिम. त्या संदर्भात म. श्री. दीक्षित म्हणतात, "बाजीरावाला पेशवाई मिळाल्यापासून चिमाजीने अंगावर घेऊन केलेली मोठी अशी ही मोहीम पहिलीच होती. मोहीम तशी दुर्घटच होती कारण प्रांत माळवा होता आणि गाठ गिरिधर बहादूरसारख्या बादशाहीतील अनुभवी, जुन्या, हरहुन्नरी सुभेदाराशी होती. त्याच्यामुळे प्रथमच नर्मदा ओलांडून उत्तर प्रदेश पाहणारा तिशीच्या आतला चिमाजी म्हणजे केवळ कालचे पोर होते. त्यामुळे चिमाजीच्या हिम्मतीबद्दल उदंड खात्री असली तरी प्रत्यक्ष मोहिमेचा निकाल लागेपर्यंत बाजीरावाच्या जीवाला स्वस्थता नव्हती."[१३०] आप्पांच्या माळवा मोहीमेच्यावेळी मल्हारराव होळकर २२ हजार सैन्यासह आघाडीवर होता.[१३१] यापुर्वीच बाजीरावाने राणोजी भोसले यांनी मदत करावी म्हणून ७ ऑक्टोबर १७२८ रोजी एक करार केला होता.[१३२] परंतू त्याचा फायदा झालेला दिसत नाही.

### २.६.१ अझमेरा युध्द (२९ नोव्हेंबर १७२८)

चिचमाजी आप्पा सैन्य माळवा प्रदेशात गेला. यावेळी त्यांच्या सैन्याची मार्गक्रमाची गती भयंकर तेज होती. चिमाजी आप्पा व उदाजी पवार हे तिस कोसाचा मजला मारीत २२००० फौजेनिशी नर्मदा ओलांडून माळव्यात घुसले. त्यानंतर गिरिधर बहादुरवर चालून गेले.[१३३] तरीही तो गुर्मीतच होता. त्याला चिमाजी आप्पा पोरवयीन आहे. त्याला लढाईचा अनुभव नाही. आपण त्यास सहज मारु! अशा तो-यात गिरिधर होता.[१३४] यावेळी आप्पांने आपल्या सैन्याची विभागणी दोन तुकडयरत केली. चिमाजी आप्पाने एक तुकडी मंडूच्या किल्ल्याकडे पाठविली. मंडूचा किल्लेदार मुहम्मद उमरखान हा गिरिधर बहादुरच्या मदतीला जाईल अशी चिमाजी आप्पाला शक्यता वाटत होती. आणि म्हणून त्यास रोखण्यांचे काम या तुकडीवर सोपविण्यांत आले. अशाप्रकारे चिमाजी आप्पाने गुजरात व दिल्लीहुन गिरिधर बहादुराला कोणतेही मदत मिळणार नाही अशी व्यवस्था केली.[१३५] तर दूस-या तूकडीने बहादूरच्या तळाकडे प्रयाण केले. मराठयांची फौज येत आहेत असे समजताच दया बहादुर आमझे-यांची घाट अडवून बसला आणि मांडवगढच्या मार्गात तीन सुरुंग पेरुन ठेवले. आमझे-यापर्यंतच्या मार्गात हया सुरुंगांनी गनिमाच्या येतायेताच चिंधड्या उडाव्यात आणि त्यातुन बचावून आमझे-यापर्यंतच्या तळापर्यंत येण्यांचे धाडस केलेच तर तोफांनी त्यांना भाजुन काढावे अशी त्याची चतुर व दूरदर्शी योजना होती.[१३६] मात्र अतिशय झपाटयाने कूच करीत चिमाजी आप्पा पचिश्मेस वळून दया बहादुरच्या पिछाडीवर आला. सावध व कर्ता दया बहादुर (मराठयांच्या) अचानक आक्रमणाने चकित झाला. आणि तळावरचा तोफखाना तळावरच सोडून घाईघाईने मराठयांवर चालुन आला.[१३७] यावेळी बहादूर बंधूकडे जवळ जवळ साठहजार पठाण व चाळीस हजार गोलदांज व तिनशे तोफा होत्या.[१३८] यावेळी मराठयांकडे तोफा नव्हत्या, काही अल्पगुणी बंदूका व भात्ते, ब-यच्या तलवारी एवढीच मराठयांची शस्त्रे. मात्र एकूण एक मराठे विर तारुण्य, शौर्य, हिंमत निश्चय अशागुणांनी युक्त होते. शिवाय मराठे सैन्य कर्तव्यनिष्ठ होते.[१३९] यावेळी मोगल - मराठा यांच्या सैन्यात नक्की संघर्ष कूठे झाला हे आज पर्यन्त स्पष्ट झालेले नाही. परंतू चिमाजी आप्पा व गिरिधर बहादूर यांच्या सैन्याची गाठ मांडवगडाजवळ अझमेरा आणि तिरला या गांवाच्या दरम्यान असलेल्या मोकळया व सपाट मैदानात २९ नोव्हेंबर १७२८ रोजी पडली.[१४०]

तेव्हा सकधार आणि अमझेरा यांच्या मध्ये असलेल्या तिरला येथे गिरिधर बहादूर व मराठा सैन्य यांच्यात संघर्ष घडून आला.[१४१]

यावेळी अमझेरा येथे हातघाईची लढाई सुरु झाली. राव गुलाबराव व सलाबतखान हे दोघे मराठयांवर चालुन आले पण ते दोघेही मारले गेले.[१४२] हा संघर्ष दोन प्रहर म्हणजे जवळजवळ सहा तास चालला.[१४३] यासंघर्षात मोगली तोफा मराठयांच्या गनिमी युध्दापुढे कुचकामी ठरत होत्या.[१४४] मराठा सैन्य मोगली तिरंदाजी व तोफखाना यांना दाद न देता मोठया त्वेषाने शत्रूंवर तुटून पडले. त्यामुळे दुपारनंतर मराठयांची सरशी होऊ लागली. मोगल सुभेदार गिरीधर बहादूर व दया बहादूर यांनी जातीने लढण्यांची पराकाष्ठा केली. गिरीधर बहादूर स्वत: हत्तीवर बसुन तिरंदाजी करीत होता. लढत लढत त्याचे बाणाचे चार भाते रिक्ते झाले. चिवट प्रतीकार करण्यां-या गिरीधर बाहदूर संध्याकाळच्या सुमारास मराठयांच्या गोळीबारात मारल्या गेला.[१४५] ज्या शत्रुची गोळी छातीस घुसून गिरिधर बहादूर गतप्राण झाला तो शत्रु उदाजी पवार होय.[१४६] इतिहासकार कस्तुरे यांनी मात्र गिरिधर बहादूर यास स्वत: चिमाजी आप्पांनी ठार केले असे मत व्यक्त केले आहे.कस्तुरे लिहीतात, "दोघेही हटत नव्हते आणि एके क्षणी, काय झाले कुणास ठाऊक, पण चिमाजीआप्पांच्या तलवारीच्या फटक्याखाली गिरिधरबहादरचे मुंडकेच उडाले. गिरिधरबहाद्दरसारखा समशेरबहाद्दर आप्पांनी स्वत:च्या हाताने मारला."[१४७] गिरिधर बहाद्दरच्या बरोबर रणक्षेत्रावर लढत असलेला त्यांचा चुलत भाऊ दया बहादुरही यावेळी काही मातब्बर सरदारांबरोबर मारला गेला. आनंदराव व त्यांचा भाऊ शंभुरास यास मराठयांनी पकडून घेतले.[१४८] त्यामुळे मोगली सैन्यात पळापळ सुरु झाली. अशास्थितीत मराठयांनी मोगली सैन्यांचा पाठलाग करण्यांस सुरुवात केली. त्यांनी गिरीधर बहादुराची छावणी लुटली, तोफा हस्तगत केल्या, हती काबीज केले.[१४९]

अशाप्रकारे अमझेरा येथील युध्दात चिमाजीने गनिमी युदिध्दतंत्राने मोगलांवर विजय मिळविला.[१५०] हया युध्दात गिरीधर बहादूर व दया बहादूर हयांसारखे मातब्बर सरदार मारले गेले. आप्पाच्या या विवजयाचे महत्व स्पष्ट करताना सरदेसाई म्हणतात, "विद्यूत गतीने चिमाजीच्या विजयाची वार्ता संपूर्ण भारतात पोहचली व त्यांने संपूर्ण हिंदुस्थान हादरुन सोडले."[१५१] यावेळी

चिमाजी आप्पाने अपूर्व धाडस दाखवून आणि चपळाईने अमझेऱ्यास निर्णायक विजय संपादीत केला होता.[१५२]

चिमाजी आप्पाने गिरीधर बहादूर यांच्या पराभव केला तेव्हा बाजीराव पेशवा यांचा मुक्काम पुण्यापासुन फारसा दुर नव्हता[१५३] पेशवा बाजीराव गोदावरी ओलांडून वऱ्हाडात पोहचला होता. त्यांच्या सोबत पिलाजी जाधव व दावलजी सोमवंशी होते. येथे मुक्कामास असतांनाच त्यांना चिमाजी आप्पाने अझमेरा येथे मिळविलेल्या विजयाची बातमी बाजीरावास समजली.[१५४] तेव्हा पेशवा बाजीरावा यांनी त्वरीत चिमाजी आप्पास पत्र लिहीले, "तुमची पत्रे छ. जमादिलौवलीची (३०/११/१७२८) आबझिरे मुक्कामाची आली. ती प्रविष्ट जाहाली.गिरधर बहादूर वहमेंकरुन युध्यास आला, त्याचे आपले युध्य बहुत जाहाले, निदान त्यास सेनासहवर्तमान बुडऊन येश प्राप्त जाहाले, हे कितेक वर्तमान तपासिले लिहिलें ते कलले. यैसियास शत्रु अभिमानेकरुन युध्यास प्रवर्तला त्यास विडीलांचे व धण्याचे पुण्ये करुन पराजये केला आणि येश संपादिले यावरुन बहुत समाधान जाहाले. श्री. सदैव तुम्हांस याच प्रकारे येषस्वी करो व तुम्ही ही याच प्रकारे निरंतर आपणाकडील संतोषाचे वर्तमान लिहीत जाणे."[१५५] याशिवाय बाजीराव यांनी आप्पा यांना संदेश पाठविला की, गिरिधर बहादूर यास बुडविल्यावर तुम्ही पुढे उज्जनीकडे गेलेच असाल. त्याच विचारे उज्जनीवरी करुन दबाव घालुन व गिरिधर याच्या कुलजहागीरा बाद करुन पोस्त टका साधने आणि कर्जाचा परिहार करणे.[१५६] बाजीराव यांना आप्पांनी मिळविलेल्या विजयाची माहीती मिळाली असली तरी बाजीराव हे चिमाजी आप्पांने हातानी लिहिलेल्या पत्राची वाट पहात होता. ते पत्र बाजीरावास वाशीम कडे असतांना मिळाले ते वाचून त्यांना आनंद झाला.[१५७]

अमझेरा येथे चिमाजीने गिरिधर बहादूरचा पराभव केला. तेव्हा मराठयांच्या हाती फार मोठी दौलत आली. शिवाय माळवा ताब्यात आल्यावर तेथे मराठयांना तोफा हस्तगत झाल्यात. तसेच यावेही मराठयांनी काही हत्ती काबीज केलेत.[१५८] शिवाय चिमाजी आप्पाच्या माळवा विजयाने पेशवा बाजीराव यांचा सर्वत्र दरारा वाढला. तसेच यानंतरच्या काळात मराठयांनी माळव्यात आपली पावले मजबूत केली.[१५९] माळवा मोहीमेत चिमाजी आप्पाला महसूलही मिळाला त्यामुळे सातारा दरबारातील पेशवा यांच्या विरोधकांची तोंड बंद झालीत.[१६०] अझमेरा येथील प्रचंड विजयामुळे

चिमाजी आप्पांवर सगळी कडून स्तूतीचा व अभिनंदनाचा वर्षाव झाला.[१६३] या विजयामुळे मराठयांच्या हितचिंतकांना अतिशय आनंद झाला. मात्र शत्रुवर्गात धडकी भरली.

अमझेरा विजया संबंधीत एक पत्र भावानिराम यांनी सवाई जयसिंग यांस लिहिले आहे. त्यावरुन अमझेरा संघर्षावर प्रकाश पडतो. भावानिराम लिहीतात,"कंठाजी कदम दहा हजार फैजेनिशी माळव्यात उपद्रव्य करीत होता. त्याजवर गिरीधर बहादूर चालुन गेला, म्हणून कंठाजी पळून गुजरातेत बासवाडा येथे गेला. तेव्हा गिरीधर बहादूरने अझमेरा येथे मुक्काम केला. इतक्यात बाजीरावाचा बंधु चिमाजी अप्पा व उदाजी पवार बावीस हजार फौजोनिशी अकस्मात नर्मदा पार होऊन रोज तीन कोसांच्या मजला करीत गिररिधरवर चालुन आले. धरच्या बंदोबस्तात महंमद उमरखान होता. त्याने बहादुरच्या सहायास येऊ नये म्हणून एक लहानशी टोळी चिमाजीने धारच्या रत्यावर ठेऊन दिली. चिमाजी आप्पाने २८ नोव्हे.१७२८ रोजी येऊन बहादूरच्या छावणीस वेढा घातला. रा गुलाबराव व सलाबखान मराठयांवर चालुन गेले. पण दुर्दैवाने ते गारद झाले. राव आनंदराव यास दोन गोळ्या लागुन जखमा झाल्या तेव्हा आनंदराम व त्याचा भाऊ शंभुराम यास मराठयांनी पकडून घेतले. खुद्द गिरीधर बहादुर हत्तीवरुन चालुन येऊन आपल्या बाणांनी पुष्कळ मराठयांस ठार केले. हत्तीवर बाणांचे चार भाते होते ते सर्व खलास झाले. इतक्यात शत्रुची गोळी छातीत घुसून राजाबहादुर गतप्राण झाले."[१६५] मात्र अमझेरा संघर्षात गिरधर व दया बहादूर हे दोघे बंधू मारले गेले अथवा एकटे गिरिधर बहादूर मारले गेले हे तत्कालीन पत्रांवरुन स्पष्ट होती.

### २.६.२ आप्पावर अभिनंदनाचा वर्षाव :-

चिमाजी आप्पाने दयाबहादुर यास मारल्याची माहीती पिलाजी जाधव व ब्रम्हेंद्रस्वामी यांना लिहलेल्या पत्रातुन मिळते. चिमाजी आप्पा यांनी पिलाजीस लिहीले. "दया बहादुर अमझेराचा घाट बंद करुन आमझारीयावरी राहीला होता. त्यास तो घाट टाकुन मांडवगडचे घाटे चढोन गेलीयावरी तो चालोन आला. याकरिता जरुर जाणून युध करु ो लागले. त्यास राजश्री स्वामीचे प्रतापे पराभवाते पावला. खासा वगैरे सरदार ठार पाडले. लस्कर लुटले, हत्ती अठरा पाडाऊ आले, म्हणून तपसिले लिहीले त्यावरुन बहूत समाधान जाले. वडिलांचे पुण्य आपले पदरी समर्थ आहे श्रीने येश थोर

दिल्हे."[१६६] चिमाजी आप्पा यांनी ब्रह्मेंद्रस्वामीस लिहतो, "तिर्थरुप रायांनी माळवा प्रांतात पाठविलेले होते. त्यास दया बहादुर युध्दास आला स्वामीच्या आर्शीवादाने त्यास पराभवाने पाठविले."[१६७]

चिमाजी आप्पाने गिरीधर बहादुरचा पराभव केला. त्यानंतर अनेक सुहद्यानी, इष्टमित्रांनी चिमाजीच्या या पराक्रमांची मुक्त कंठाने स्तुती केली. माळवा मोहीम चिमाजी आप्पाच्या नेतृत्वाखाली यशस्वी पार पडल्यामुळे संपुर्ण महाराष्ट्रातून चिमाजी आप्पावर अभिनंदनाचा वर्षाव झ ााला.[१६८] आप्पाचा एक हितचिंतक लीहीतो, "राजश्री स्वामीने पुण्यप्रतापेकडून श्रीने तुम्हास येश दिले आहे. हे श्रवण करुन बहुत संतोष जाहला."[१६९]

अशाप्रकारची कित्येक पत्र चिमाजी आप्पांना आलीत. दावलजी सोमवंशी आप्पास अभिनंदन करताना लिहतात, "दया बहादूर फौजेनिशी वहमियाने चालुन आले. त्याचे व आमचे दोन प्रहर उध्द जाहले. दया बहादर ठार पडले व वरकड मातब्बर येक-दोघे सरदार त्यांकडील पडले, हत्ती निशाणे, नगारे व घोडी पाडाव करुन लुटून फन्ना केले, ध्यान्याचे व वडिलाचे पुण्ये फत्ते जाली म्हणून युध्दाचे वर्तमान तपासिले आणी लिहीले, संतोषाच्या कोटी जाल्या. कस्त आपण सीमेवरती केली व महदयेश संपादिले. आपण येशस्वीच आहेत."[१७०] कृष्णराव महादेव चिमाजी आप्पास लिहीतो की, "स्वामी पुण्यपुरुष, श्रीची दया व वडिलांचे पुण्य समर्थ यामुळेस येसी येशे स्वामीचे पदरी पडतात. याउपरी पुथ्वी स्वामीस वद्य आहे."[१७१]

अमझेऱ्यांची लढाई या नावाने ओळखली गेलेली ही लढाई चिमाजी आप्पाने मिळविलेल्या प्रमुख व निर्णायक विजयाची लढाई होती. त्यामुळे चिमाजीची प्रतिष्ठा वाढली. सोबतच माळव्यावर मराठयांचे वर्चस्वही प्रस्थापित झाले. दक्षिण माळव्यातुन मोगल्यांची सत्ता जवळजवळ नामशेष झ ााली.[१७२] मराठी रियासतकार सरदेसाई यांनी या युध्दाचे महत्व विशद करतांना जे मत व्यक्त केले आहे त्यावरुन हा विजय किती महत्वाचा होता हे स्पष्ट होते गो. स. सरदेसाई म्हणतात, "औरंगजेबाच्या कैदेतून केवळ स्वतःच्या बुध्दीमताने आपली सुटका केल्याबरोबर जसा विजयोत्साह देशभर पसरला, तशाच तोडीचा विजयोत्सव पुनरपि चिमाजीच्या या पराक्रमाने उत्पन्न होऊन हिंदी राष्ट्रात मराठयांना थोरपना प्राप्त झाला."[१७३] माळवा मोहीमेत चिमाजी आप्पाने गिरिधर बहादूर

यांच्याविरुध्द आमझेरा येतील संघर्षावेळी गनिमी युध्द पध्दतीचा योग्य वापर केला. याविषयी प्रा. टी. के. बिरादार लिहीतात, "प्रत्येक मोहीमेच्या यशासाठी घोडदळाचा अत्यंत परीणामकारक पध्दतीचे वापर करुन शत्रुंचे युध्द अगोदरच मनोधैर्य खच्ची करण्याचे तंत्र अंमलात आणलेले दिसुन येते. याच तंत्राचा उपयोग करुन त्याचा भाऊ चिमाजी आप्पा यांनी आमझेऱ्याच्या लढाईत ( २९ नोव्हेंबर १७२८) मोगल सैन्याविरुध्द मिळविलेला विजय हा गनिमी युध्द पध्दतीचे एक अप्रतिमच उदाहारण होते." [१७४] अमझेरा विजयासंबधी इतिहासकार काबंळे म्हणतात, "हे यश खरोखरच अभिनंदनीय होते. माळव्याचा सुभेदार व त्याचा सेनापती लोळवला जाऊन त्याची सर्व सलतनत मराठियांस मिळून मराठी भाल्याचा तीक्ष्णपणा उत्तर हिंदूस्थानात गाजला गेला." [१७५]

**२.६.३ अमझेरा युध्दानंतरचे आप्पाचे कार्य :-**

अमझेरा येथे चिमाजी आप्पाला यश मिळाले मात्र त्यामुळे माळव्यात मराठयांचे वर्चस्व निर्माण झाले असे नाही. त्या युध्दाने गिरिधर बहादुर व दया बहादुर असे नामवंत मोगल सरदार त्याच्या सैन्यासह गारद झाले. त्यामुळे माळव्यातील मोगल सत्तेचा कणाच मोडला असला तरी माळव्याच्या काही भागात मोगलांचे वर्चस्व टिकुन होते. त्यामुळे मराठे अमझेऱ्याहुन उज्जैनला आले व त्यांनी उज्जैनला वेढा दिला. इकडे गिरिधर बहादूरचा पुत्र भवानीरामाने बापाच्या पश्चात प्रातांचा कारभार हाती घेवून मराठयांचा प्रतिकार चालविला.[१७६] उज्जैनचा बंदोबस्त करुन त्याने ते शहर हातचे जाऊ दिले नाही. म्हणून बादशाहाने त्याला 'चिमणा बहादूर' हा किताब व बापाची जागीर देऊन दोन लाख रुपये खर्चास पाठविले.[१७७] एवढेच नव्हे तर सय्यद नजमुद्दीन अलीखान, सवाई जयसिंग यांना भावनिरामाच्या मदतीकरता रवाना केले.[१७८] मात्र त्यांची मदत न होता उलट भवानीरामास त्रास झाला. यावेळी चिमाजी आप्पास बाजीरावाने सुचना केली होती. "गिरधर बहादर यास बुडविल्यावर तुम्ही पुढे उज्जनीकडे गेलेच असाल. त्यास विचारे करून उज्जनीवरी दबाव घालुन व गिरधर याच्या कुल जहागीरा बाद करुन पोक्ता टका साधने व कर्जाचा परिहार होये ते करणे."[१७९]

यावेळी चिमाजी आप्पाच्या मदतीस बाजीराव पुर्वे कडून येत होता. मात्र आप्पा उज्जानीस वेढा घालुन बसला होता.[१८०] २३ जानेवारी १७२९ दरम्यान चिमाजी आप्पाने अमझेरा येथे तिन दिवस मुक्काम करुन थकल्ल्या फौजास विश्रांती दिली. त्यानंतर चिमाजी आप्पा ३ डिसेबर १७२८ रोजी उज्जैनकडे निघाला.[१८१] ता. ६ रोजी देवळापुर व १३ डिसंबर रोजी तो उज्जेन येथे दाखल झ ााला. त्यापुर्वीच उदाजी पवारने उजनीस वेढा घातला होता.[१८२] २० डिसेंबर १७२८ रोजी चिमाजीने उज्जैनला वेढा दिला. मात्र उज्जेनचा किल्ला जिंकणे अशक्य झाले.[१८३] 'बोली जाहाली होती त्याचप्रमाणे बोला मातब्बर घेतल्या असिल्या आणि पैकीयांचा निर्वाह होत असिला तरी उत्तम जाहाले. कदाचित दिल्लीकडून कोण्ही सुभा येणार असिला, त्यांची वार्ता ऐकुण बळ धरीत असिले आणि न देत तरी त्या पैकीयासाठी तेच स्थळी गुंतून राहता येत नाही. आपण अवघ्या प्रांतचा व जी महास्थळे तेथिल पैका जप्त करुन वसुल घ्यावे.'[१८४] बाजीराव या स्वारी दरम्यानच्या काळात अनेक पत्र पाठवितात. 'तो बैसऊन पुढे पारे मरावया तिकडे जाणे तिकडे जाऊन तुम्ही वर्तमान निरंतर लिहीत जाणे. सारांश गोस्ट विचारे करुन कर्जाचा परिहार होऊन पोख्ता हाय ते करणे.'[१८५] बाजीरावाच्या अशा पत्रावरुन या स्वारीचा एक उदेश स्पष्ठ होते ते म्हणजे कर्जाचा परीहार करणे.

यावेळी उज्जियीनीच्या कोतलवालाकडून चिमाजी आप्पांनी पाच हजार खंडणी घेतली. मात्र बाजीरावाचे पत्र मिळाल्यामुळे चिमाजी आप्पाने उज्जैनला न राहता वेढा उचलुन गुजरातकडे प्रयाण केले.[१८६] १३ जानेवारी १७२९ ला चिमाजी आप्पाने उज्जयिनी सोडली. फेब्रुवारी पर्यंत चिमाजी आप्पा सारंगपुरला आला होता.[१८७] यावेळी चिमाजी आप्पाने शहाजहापुर, राजगढ, सारंगपूर, भालपुरा, रामपुरा, जावद इ. भागातुन खंडणी वसुल केली.[१८७अ] ५ फेब्रुवारी १७२९च्या सुमारस चिमाजी आप्पा बुंदी, कोटा येथून खंडणी वसूल केल्यानंतर झालोद व दोहाद मार्ग त्यांनी गुजरातेत प्रवेश केला आणि ४ मे १७२९ रोजी चिमाजी अप्पा पुण्यांला परत आला.[१८८]

याचदरम्यान बाजीराव पेशवे पण बुंदेल खंडातून परत आले. दोघा बंधूनी मोहीमेवरुन परत आल्यानंतर सातारा यथे जावून छत्रपती शाहुचा आर्शीवाद घेतला.[१८९] चिमाजी आप्पा व पेशवा बाजीराव हे दोघे भाउ ऑगस्ट ते सप्टेबर १७२९ याकाळात मराठयांची राजधानी सातारा येथे होते. यावेळी दोघा बंधूचा अनपेक्षीत पराकृम ऐकूण त्यांना शाबासकी दिली. 'ऐसा पराक्रम करुन कार्य

साधाल असे वाटले नाही. शर्थ आहे तुमची, आप्पाची, प्रधानपंत, घोडयाला आता अंमल विश्रांती द्या आणी वर्षातून जरा हौस मैस करा. राज्यावरील कधि संपनार नाहीत. तूर्तास तुमच्या भरवशावर आम्ही निर्धास्त आहोत."[११०]

## २.७ चिमाजी आप्पाची उत्तर भारतातील मोहीम.

चिमाजी आप्पा पुण्यांला परत आले. त्यांनतर माळव्याच्या मोगल सुभेदार भवानीराम पेचात आला. त्याला मदत कदत करायाला म्हणून बादशाहाने पाठविले. नजमुद्दीन अलीखान व सवाई जयसींग यांचा स्वत:च माळव्याच्या सुभेदारीवर डोळा असल्यामुळे त्यांचे भवानीराम यांच्याशी पटेना. म्हणून ते त्याच्या कारभारात विघ्ने निर्माण करुन मराठयांशी कारस्थाने करु लागली. त्याच्या जवळ सैन्याला पगार देण्यांस पैसा नव्हता. अशा स्थितीत वर्षभरात त्याला बादशाहाने बडतर्फे करुन त्याच्या जागी महंमद बंगषाची नेमणूक केली.[१११] इ. स. १७३० मध्ये मल्हाळराव होळकर व पवार यांनी चिखलदरा येथे एकत्र येवून माळव्यातुन खंडण्या वसुल केल्या. त्यावेळी भवानीराम त्यांचा आडवा आला. मात्र यावेळी मल्हालरावानी मांडवगडचा किल्ला जिंकला. मल्हाररावनी मांडवगड जिकल्यांची बातमी चिमाजी आप्पाला समजताच आप्पाने बातमीदारास बक्षिस दिले.[१११अ]

भवानीराम अपयशी ठरत असल्यामुळे त्याजागी महमंद बंगष यास बादशहाने माळवा प्रातात पाठविण्यांचे ठरविले. महमंद बंगष माळवा मोहीमेवर निघताना 'मला माळव्याची सुभेदारी द्याल तर मी मराठयांना तेथून काढून देतो."[११२] यानंतर पैशाची तरतुद करून बंगष यांने आग्रा सोडले व माळव्यात प्रवेश केला. तेव्हा बंगष व मल्हारराव यांच्यात शहाजादापुर जवळ २७ जानेवारी १७३१ रोजी युध्द झाले.[११३] मात्र त्याचा निकाल लागला नाही. माळव्यात महमंद बंगष आला खरा पण येथील मराठयांच्या आक्रमणाला थोपविणे कठिण आहे हे त्याला लगेच समजले. कारण मराठे गनिमी काव्याचा आधार घेऊन सगळया माळव्यात धुमाकूळ घालीत होते. मल्हारराव होळकर रामपूर प्रांतात अंताजी माणकेश्वर काठ प्रांतात, फतेसिंग दावलशी मांडू भागात आणि स्वत: बाजीराव झाबुआ प्रांतात फिरत होता.[११४] सप्टेबर १७२९ मध्ये बाजीराव पेशवा यांने माळव्याच्या प्रांताची वसुली करण्यांचे काम चिमाजी आप्पा, मल्हार होळकर व उदय पवार यांच्याकडे दिले.[११५] यावेळी

महमंद बंगषाची  स्थिती अतिशय दयनिय होती. त्यांना प्रांतातून वसुली येत नव्हती. परिणामी त्यांनी आपले ठाणे उज्जेनहुन सिरोंजला हलविले. या सुमारास मराठयांची प्रंचड फौज माळवयात घुसली. फत्तेसींह, भिकाजी जाधव आणि उदाजी पवारचा भाऊ आनंदराव पवार हे तिस हजार सैन्यांनिशी सिरोंजच्या पुर्वेस सात कोसावर आले. चिमाजी आप्पा आणि मल्हाराव होळकर हे तिस हजार सैन्यासह उमतवाडयाजवळ आले.[१९६] आणखी एक दहाबारा हजारांचे सैन्य गढामंडळाच्या मार्गाने बंगषाच्या विरुध्द चालुन आले.[१९७] यादरम्यान शिंदे, पवार व होळकरांनी पुण्यास येऊन चिमाजीच्या मार्फत शाहु महाराज यांच्या कडून माळव्यांतील महालांची वाटणी राजरोस करुन घेतली.[१९८] शाहू महाराजांनी सप्टेंबर १७२९ मध्ये गुजरात, माळवा प्रांताची वसुली व्यवस्था चिमाजी आप्पा, उदाजी पवार, मल्हाराव होळकर यांच्या कडे देण्यांत आली.[१९९] त्या संबंधीत माहीती, " यादी --------- सन सलास सलासीन जमा साल मजकुर महालानिहाय सुभा प्रांत माळवा, दफाते पत्रे छ.१० सफर,सरंजाम राजश्री मल्हारजी होळकर व राणेजी शिन्दे  दिमंत राजश्री चिमणजी बल्लाळ महाल विनतपशील-"

५ कित्ता परगणे मजकुर

१ परगणे डोंगरपर याचे वाटणी पैकी एकुण महाल

१ परगणे दोहाद

१ परगणे झालोद

१परगणे सुप

१परगणे आली

-----------------

५

१३।।    कित्ता सरकारे

१ सारंगपूर उज्जैन

१ सरकार मंदसोर

१ सरकार पिंडावा कोळी गागुर्णी

१सरकार भेलसे

१सरकार मांडवगड

१सरकार चंदरी बुंदरुक व खुर्द

१सरकार आढयाबाद

१सरकार अलमगीरपूर

१ सरकार धाकोणी

१ सरकार गढे

१ सरकार शहाबाद

।। सरकार हांडे पैकी महाल ७ एकुण निम्मे

१ सरकार काटे

१ सरकार बुंदी

-------------------------------

१३।।"२००

याकाळात होळकरांनी महमंद बंगषाला जेरीस आणून सर्व माळवा प्रातांत आपला अंमल रगडून बसविला. बंगषाची नाचक्की होऊन त्यास बादशहाने कामावरुन दूर केले. महंमदखान बंगष याच्या अपशयानंतर मोगल बादशहाने सवाई जयसिंग यांची इ. स. १७३२ मध्ये माळवा प्रांताच्या सुभेदारपदी नेमणूक केली.[२०१] तेव्हा जर आपण सवाई जयसिंग यास विरोध केला नाही तर आपले माळवा प्रांतातील महत्व कमी होईल अशी मराठयांना भिती वाटत होती. कारण मोगल बादशाहाने मराठयांच्या बंदोबस्तासाठीच जयसिंग यांची नेमणूक केली होती. अशावेळी सवाई जयसिंगाला रोखण्यांची जबाबदारी शाहू महाराजांनी चिमाजी आप्पावर सोपवीली. चिमाजी आप्पा इ. स. १७३२ च्या दस-यानंतर उत्तरेच्या मोहीमेवर निघाले.[२०२] खानदेशात प्रवेश केल्यानंतर आप्पाने आपल्या सैन्यांची विभागणी दोन गटात केली. मल्हारराव होळकर व शिंदे यांनी गुजरातेतील कार्य पार पाडून माळव्यात यावे तर आप्पाने नेमाड मार्गो माळव्यात यावे. या मोहीमेच्या काळात चिमाजी आप्पाने

मानाजी जाधवांच्या जहागीरीत धुमाकूळ घातला.[२०३] तेव्हा एक तक्रार मानाजी जाधवाने शाहु महाराजांकडे केलेली नमुनेदार आहे. "चिमाजी पंतानी आम्हास दबावाच्या गोष्टी सांगीतल्या, आम्हांस भेटीस घेवून गेले त्यांची आमची भेट जहाली. त्यास तेथे जे आम्हांस बोलो नये ते बोलला की, तुम्ही महाराजांची पाठ करुन राहतां तर एक दिवस मारुन तरसज करीन. त्रिंबकराव दाभाडा मारला महाराजांनी आमचे काय केले ? तुम्ही वीट (वाईट) करुन किती दिवस राहाल! ऐसा आम्हांसी आकस लाविला आहे, की तमाम सरदार आमचे चाकर आहेत. तुम्हीही एकभावाने चाकरी करावी."[२०४]

यावेळी जयसिंग बादशाहा बोलणी करून जयपुरला आला होता. त्यानंतर जयसिंग २० आक्टोंबर १७३२ रोजी उज्जनीस आला. त्यासंबंधीत सर्व माहीती मराठयांना आपल्या वकीला कडून मिळत होती. यावेळी चिमाजी आप्पा यांचा मुक्काम मंदसोर येथे होता.[२०५] यावेळी मराठयांनी माळवा प्रदेशावर दोन्ही बाजुंनी आक्रमण केले. एका बाजुंनी होळकर गुजरात मधून माळव्यात शिरले तर दूसरी फौज बुंदेलखंड मार्गे ग्वाल्हेर प्रदेश उद्‌वस्त करीत सन १७३३ मध्ये माळव्यात आली. तेव्हा मंदसोर येथे मराठा व सवाई जयसिंग यांच्या सैन्यात युध्द झाले. त्या संघर्षात जयसिंगाचा पराभव झाला.[२०६] त्यानंतर मराठयांनी बुंदीवर आक्रमन करून तेथे जयसिंगांनी गादीवर बसविलेल्या दलेलसिंग याची हकालपटी करून त्याजागी बूधसिंगाला गादीवर बसविले. अशाप्रकारे मराठयांनी रालस्थानांच्या राजकारणात प्रवेश केला. त्यानंतर मल्हारराव यांनी माळव्यात अनेक मुलूखातून खंडणी वसुल केली. याचदरम्यान मीर बक्षी खान माळव्याकडे निघाले त्यांने मारवाडातील अनेक राजपुत राजे आपल्या सैन्यात सामाल करून निघाला. तेव्हा त्या मोगली सैन्यापुढे आपला निभाव लागणार नाही म्हणुन मल्हरराव होळकर यांनी मागयांचा मुकूंदरा नदीचा भाग उदध्वस्त करण्यास सुरुवात केली. परीणामी मीर बक्षीला अनेक संस्थानिक सोडून गेले. तेव्हा मीर बक्षी यांने मराठयांशी जयसिंगांमार्फत बोलणी केली. त्यांने मराठयांना चौथाईबदल २३ लाख रुपये देण्याचे मान्य केले. यानंतर होळकर, शिंदे सन १७३५ मध्ये पूण्याला आले.[२०७]

*सारांश :-*

*मराठा स्वातंत्र युध्दकाळापासून मराठयांनी माळवा प्रांतावर आक्रमण सुरु केलीत. पेशवा बाळाजी यांच्या काळातही मराठा सरदारांची उत्तर भारतात आक्रमणे सुरुच होती. मात्र माळवा प्रांतावरील आक्रमणाला गती मिळाली पेशवा बाजीराव पहीला यांच्या काळात. त्याकाळात चिमाजी आप्पांनी उत्तरेत स्वा-या करुन मराठा राज्यविस्ताराला गती दिली. अर्थात यासाठी त्यांना मल्हारराव होळकर, शिंदे व पवार यांची मदत झाली. त्यांनी माळवा प्रांतावर वर्चस्व प्रस्थापित करण्यांसाठी खूप मेहनत घेतली. आणी म्हणूनच पेशवा बाजीरावाच्या काळात चिमाजी आप्पांच्या पराक्रमामुळे मराठयांचे माळव्यावर वर्चस्व प्रस्थापित झाले.*

*मोगल बादशाहाची मंजूरी येण्यास जरी त्यानंतर आणखी कैक वर्ष अवकाश लागला. मात्र पेशवा बाजीरावाच्या काळापासूनच माळव्यांत मराठयांची सत्ता प्रबळ झाली. अर्थात याचे श्रेय पेशवा बाजीरावाला दिले जाते. मात्र माळवा प्रदेशावर मराठयांच्या वर्चस्वामध्ये आप्पा यांनी बाजीरावापेक्षा सरस योगदान दिलेले दिसून येते..*

संदर्भ :


०१. प्रा. मोरे दिनेश, आधुनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, पुर्वोक्त, पृ.५८-५९

०२. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. २२२

०३. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.२२१

०४. डॉ. गुजर यादव (१९९१), मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, श्रीराम प्रिंटर्स, गांधीबाग, नागपुर पृ. १२

०५. प्रा. मोरे दिनेश, आधुनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, पुर्वोक्त, पृ.५९

०६. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ.२२

०७. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. ७९

०८. कुलकर्णी अ. रा., मध्ययुगीन महाराष्ट्र , पुर्वोक्त, पृ.२९

०९. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. १३६

१०. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. १५८

११. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.१२

१२. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ.१५८

१३. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. १३

१४. प्रा. पुराणिक श. श्री., (१९९९),पेशवा पहिला बाजीराव, (पुर्वार्ध), काळ प्रकाशन, सदाशिव पेठ, पुणे, पृ.१६२

१५. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ. १६२

१६. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ. १६२

१७. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. १३

१८. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.१३

१९ डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. १३

२०. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इतिहासातील चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.३३

२१. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ३१६

२२. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ. १६२

२३. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ.११९

२४. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ. १६२

२५. डॉ. दीक्षित दुर्गा (संपा.), महाराष्ट्र सांस्कृतिक इतिहास कोश, पुर्वोक्त, पृ. ०७

२६. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.१३

२७. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड-१, पुर्वोक्त, पृ.३०२

२८. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.१३

२९. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इतिहासातील चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.३०

३०. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.१३

३१. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.१३

३२. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा), मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ. ४७

३३. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. १३

३४. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ.११८-११९

३५. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ.११९

३६. प्रा. पुराणिक श.श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ. १४५

३७. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ.११९

३८. डॉ. कोलारकर श. गो., गो. मा. पुरंदरे, नागपूर राज्याचा अर्वाचीन इतिहास, पुर्वोक्त, पृ.३

३९. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.१४

४०. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इतिहासातील चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.३३

४१. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.१४

४२. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. १४

४३. प्रा. बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. ११९

४४. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. १६३

४५. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पूर्वोक्त, पृ.१४

४६. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१४५

४७. प्रा. बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ.११९

४८. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.१४

४९. प्रा. बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ.११९

५०. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.१४

५१. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.१४

५२. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.१५

५३. पगडी सेतू माधवराव, (संपा), महाराष्ट्र आणि मराठे, पुर्वोक्त, पृ. ८२

५४. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.१५

५५. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. ५९

५६. प्रा. बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. ७३

५७. प्रा. बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ.९२

५७अ. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. १३

५८. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ३१७

५९. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. १३२

६०. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१३२

६१. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१३२

६२. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ३१८-३१९

६३. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.१७

६४. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इतिहासातील चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.६०

६५. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ३१३

६६. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.२६१

६७. प्रा. बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ.१२४

६८. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. १६०

६९. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. ९९

७०. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१३२

७१. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तरातील निवडक कागदपत्रे, गर्व्हमेंट सेंट्रल प्रेस मुंबई, १९३१, खंड-१३, ले.०५, पृ.०४

७२. प्रा. बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ.१२५

७३. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१३३

७४.Nagrale N.N., Peshawa Maratha Relations and malharrao Holkar, publication scheme,Jaipur, 1989, pp, 15

७५. प्रा. पुराणिक श.श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१३२

७६. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१३२

७७. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.१६-१७

७८. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. १६-१७

७९. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इतिहासातील चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.६०

८०. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. १७

८१. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. १७

८२. कुलकर्णी अ. रा., पूण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ. ३३

८३. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१३१

८४. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१३२

८५. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ४८

८६. कस्तूरे कौस्तूभ, ।। पेशवाई।।,पुर्वोक्त, पृ.१०३

८७. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.३१५

८८. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. २०४

८९. प्रा.बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ.१२४

९०. प्रा. बिरादार टी. के, पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. १२४

९१. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. १७

९२. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. १७

९३. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.०३

९४. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इतिहासातील चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.३७

९५. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पूर्वोक्त, पृ. ३११

९६. Dighe v. G., Peshwa Bajiraol, Maratha Expansion, 1944, pp, 80

९७. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. २१५

९८. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. १८

९९. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. १६

१००. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ३२९

१०१. कुलकर्णी अ. रा., पूण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ. ३४

१०२. कुलकर्णी अ. रा., पूण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ. ३४

१०३. कुलकर्णी अ. रा., पूण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ. ३४

१०४. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. २०४

१०५. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ३१३

१०६. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. २०४

१०७. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.३१३

१०८. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. २१५

१०९. कुलकर्णी अ. रा., पूण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ. ३४

११०. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.३१३

१११. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पूर्वोक्त, पृ. ३१५

११२. कस्तूरे कौस्तूभ, ।। पेशवाई ।।,पुर्वोक्त, पृ.१०३

११३. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.३१२

११४. प्रा.बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. १२५

११५. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.३१४

११६. कस्तूरे कौस्तूभ, ।। पेशवाई।।,पुर्वोक्त, पृ.१०३

११७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१२७

११८. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१३, ले.२७

११९. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१३, ले.१४, पृ. १५

१२०. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ३४-३५

१२१. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ३५

१२२. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.२०३

१२३. डॉ. कांबळे आर.एच.,मराठयांच्या इतिहासातील चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.३६

१२४. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१२७

१२५. प्रा. बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ.१२५

१२६. कुलकर्णी अ. रा.व खरे ग. ह. (संपा), मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.४९

१२७. कुलकर्णी अ. रा., पूण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ. ३३

१२८. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१३, ले. २३,

१२९. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१३, ले.३०, पृ. २८,

१२९अ.डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.३७-३९

१३०. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. २०४

१३१. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. १७

१३२. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ३७

१३३. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ३१०

१३४. कस्तूरे कौस्तूभ, ।। पेशवाई।।,पुर्वोक्त, पृ.१०३

१३५. प्रा.बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ.१२५

१३६. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पूर्वोक्त, पृ.१३३

१३७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१३३-१३४

१३८. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. २०४

१३९. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ३१०

१४०. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१३४

१४१. Nagrale N. N., Peshawa Maratha Relations and malharrao Holkar, publication scheme, Jaipur, 1989, pp, 20

१४२. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.३११

१४३. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१३४

१४४. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ३१०

१४५. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ३१०

१४६. प्रा. पुराणिक श.श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१५१

१४५. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ३११

१४६. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१५१

१४७. कस्तूरे कौस्तूभ, ।। पेशवाई।।, पूर्वोक्त, पृ.१०४

१४८. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा), मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.४९

१४९. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१३४

१५०. प्रा. बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ.२११

१५१. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.३१४

१५२. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.२०४

१५३. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.३१४

१५४. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.२०४

१५५. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१३, ले.२३, पृ.२३

१५६. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.४२

१५७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१३१

१५८. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१३४

१५९. प्रा. सु. ह. जोशी, डॉ. म.रा. कुळकर्णी, डॉ. रघुनाथ शेळके, प्रा. शिल्पा कुलकर्णी, (संपा.), इतिहास माहीती कोश, पुर्वोक्त, पृ.२३४

१६०. कस्तूरे कौस्तूभ, ।। पेशवाई।।,पुर्वोक्त, पृ.१०४

१६१. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पुर्वोक्त, पृ.२६

१६२. प्रा.बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ.२०८

१६३. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.३१५

१६४. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.३१४

१६५. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव , पुर्वोक्त, पृ.२०४

१६६. सरदेसाई गो. स.(संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१३, ले. २७, पृ. २६

१६७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१३५

१६८. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१३, ले. २६,

१६९. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१३, ले.१७, पृ.१८

१७०. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१३, ले. २६, पृ.२५-२६

१७१. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पूर्वोक्त, पृ.२७

१७२. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), पुर्वोक्त , पृ.१२६

१७३. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.३१५

१७४. प्रा. बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ.२११

१७५. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.४७

१७६. प्रा. बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ.१२६

१७७. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.३११

१७८. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१४७

१७९. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१३, ले.२३, पृ.२३

१८०. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.३३५

१८१. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.२०४

१८२. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.३११

१८३. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.३३५-३३६

१८४. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१३, ले. ३०, पृ.२९

१८५. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१३, ले.१४, पृ.१५

१८७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१४७

१८७अ. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.५२

१८८. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.२०५

१८९. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१३, ले.१५

१९०. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.५४

१९१. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१४७

१९१अ.डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.२५

१९२. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.३१२

१९३. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.४९

१९४. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१४७-१४८

१९६. पगडी सेतू माधवराव, (संपा), महाराष्ट्र आणि मराठे, पुर्वोक्त, पृ. ८८

१९७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ.१४७-१४८

१९७अ. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. २३१

१९८. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.४५०

१९९. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पूर्वोक्त, पृ.२०५

२००. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.३२-३३

२०१. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.४५०

२०२. डॉ. कांबळे आर .एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ४९-५०

२०३. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.५०

२०४. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१७, ले. ३०,

२०५. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ४५६

२०६. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.५०

२०७. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ५०-५१

## प्रकरण : ३ चिमाजी आप्पा व बुंदेलखंड

३.१ बुंदेलखंडाची भौगोलिक पार्श्वभुमी.

३.२ बुंदेले घराणे

३.२.१ राजा छत्रसाल

३.२.२ राजा छत्रसाल व महमंद बंगष संघर्ष

३.३ पेशवा बाजीरावाची बुंदेलखंड मोहीम

३.३.१ बाजीराव पेशवा व महमंदखान बंगष संघर्ष

३.३२. पेशवा बाजीराव व राजा छत्रसाल यांच्यातील करार

३.४ चिमाजी आप्पाची बुंदेलखंड मोहीम:

३.४.१ चिमाजी आप्पाची बुंदेलखंड स्वारीची कारणे

३.४.२ चिमाजी आप्पाची बुंदेलखंड स्वारी

३.४.३ बाजीराव व आप्पा याच्या बुंदेलखंड स्वारीचे महत्व.

## प्रकरण : ३ चिमाजी आप्पा व बुंदेलखंड

### ३.१ बुंदेलखंडाची भौगोलिक पार्श्वभुमी.

भारताच्या इतिहासात बुंदेलखंडाला प्राचीन काळापासून महत्व आहे. कारण बुंदेलखंडात प्राचीन काळापासून अनेक ऐतिहासिक घराणे प्रसिध्द होते. त्याकाळात गुप्त, वाकाटक व कालचूरीया यांचे साम्राज्य बुंदेलखंड अस्तिवात होते. बुंदेलखंड प्रदेशाच्या सर्वसाधारण सिमा पुढीलप्रमाणे होत्या. पुर्वेला विंध्य पर्वतश्रेणी, पश्चिमेला चंबळ नदी, दक्षिणेला नर्मदा, उत्तरेस यमुना नदी, या बुंदेलखंडच्या चतु:सिमा. जबलपुर जिल्हाच्या काही भाग, हमीरपुर, जालौन, झांसी, दतिया, बांदा, सागर, पन्ना, छतरपुर, ओच्छा इत्यादी पुर्वीची संस्थाने बुंदेलख्ंडात मोडत होती.[१] साधारण: बुंदेलखंडाचा विस्तार यमुना व नर्मदा या नद्याच्या मध्ये आहे.[२] या राज्याला डांगीचे राज्य असेही म्हणत. बुंदेलखंडाच्या पूर्वेस राजा छत्रसालाचे राज्य होते. डांग या शब्दाचा अर्थ जंगल. त्या अर्थाने राजा छत्रसालाचे राज्य झाड झुडूपांनी समृध्द होते. बुन्देखंडात अनेक नद्या होत्या. वेत्रवती ऊर्फ बेटवा, कालासिंध, यमुना, चर्मण्वती ऊर्फ चंबळ, नर्मदा, होस अशा इतिहासात आणि काव्यात आणि पुराणात विख्यात असलेल्या लहान-मोठया लोकमाताच्या पाण्याने या राज्याची भुमी भिजलेली होती.[३] बेनवा, घसान, केन, बीरमा, बागई इत्यादी नद्या बुंदेलखंडातुन वाहतात. या प्रदेशाचे क्षेत्रफळ सुमारे २१, ५०० चौ. मैल आहे.[४]

### ३.२ बुंदेले घराणे

प्राचिन काळी बुंदेलखंड हे चेदीदेश म्हणून ओळखले जात होते. तेथे शिशुपाल नावाचा अधिकारी होता. चंदेल हे शिशुपालाचे वंशज म्हणून ओळखले जाते. या घराण्यांत जेजाक किंवा जयशक्ती नावाचा एक पराक्रमी राजा होवून गेला. त्यामुळे हे राज्य 'जेजाक भुक्ती' म्हणून ओळखल्या गेले.[५] बुंदेलखंड हे भौगोलिक दृष्टया माळवा व उत्तरप्रदेशाच्या सरहदीवर १३ व्या शतकात उदयास आलेले राज्य होय. या प्रदेशातील जनता व राज्यकर्ते स्वत:ला बुंदेले या राजापुतांच्या वंशाची शाखा असल्याचे समजत. राज्यकर्ते स्वत:ला गहरवार कुळाचे व काशी राज्याचे

वंशज समजत. या बुंदेले घराण्यांतील १९ वा वंशज राजा प्रताप इ. स. १५०१ मध्ये उदयाला आलेला एक कर्तबगार राजा होता. त्यानेच ओर्छा नावाचे नवीन शहर वसविले. त्यानंतर त्या शहरास आपल्या कारकीर्दीतच्या शेवटीच्यावर्षी स. १५३१ मध्ये राजधानी बनविले होते.[६] राजा प्रताप याला बारा पराक्रमी व तेजस्वीपुत्र होते. या पुत्रांनी बुंदेलखंडात त्यांचे स्वातंत्र्य राज्य निर्माण केले. परंतू मोगल सत्तेपुढे ते मर्यादीतच राहीले.[७] राजा प्रताप वाघाच्या हल्यात गायीला बाचविताना मारला गेला असल्याचे उल्लेख सापडतात.[८]

राजा प्रतापच्या मृत्यू नंतर बुंदेल सत्ताधिश विरसिंगदेवाचा उल्लेख येतो. विरसिंगदेव हा मोघल बादशहा अकबराच्या काळात सत्तेवर होता. अकबराच्या मृत्यूनंतरच्या काळात विरसिंगदेव यांचे महत्व वाढले. मात्र विरसिंगदेव यांच्या मृत्यूनंतर सन १६३६ मध्ये चंपतराय हा बुंदेलखंड राजा बनला.[९] चंपतराय बुंदेले हे मोगल बादशाहा औरंगजेब यांचे एकनिष्ठ चाकर होते. औरंगजेब यांनी दिल्लीची गादी बळकाविण्यासाठी जेव्हा वडीलांविरुध्द आक्रमण केले तेव्हा चंपतराय यांनी मिर्झा राजा जयसिंग यांना बरोबरीची साथ दिली. परीणामी औरगंजेबाला विजय मिळाला.[१०] चंपतराय हा महोबा येथे राज्य करीत होता. तो अतिशय हुशार व स्वदेशभिमानी आणि स्वधर्माभिमानी होता. जेव्हा मोगल बादशाहा जहांगीर यांच्या मृत्यूनंतर बुंदेल राज्यांनी एकत्र होऊन दिल्लीचे सार्वभौमत्व झुंगारुन देण्याचा प्रयत्न केला. या संघाचे नेतृत्व चंपतराय यांनी केले. तेव्हा त्यांच्या बंदोबस्त करण्यासाठी मोगल बादशाहा शहाजहान यांनी बांकिखान नावाच्या सरदारास पाठविले. परंतू बुंदेले राजा चंपतराय यानी आव्दितीय पराक्रम करुन बादशाही फौजेचा पराभव करुन त्यांना पिटाळून लावले. मात्र या लढाईत चंपतरायचा पुत्र सर्वाहन मारला गेला.[११] त्यानंतर हिंदूधर्माभिमान बाळगण्या चंपतरायचा मोघल बादशहा औरंगजेब यांने छळ केल्यामुळे चंपतरायने आत्महत्या केली.[१२] चंपतराय यांच्या मृत्यु नंतर त्यांच्या पत्नीने, म्हणजेच छत्रसालाच्या आईने, कलाकुसरीने आपली मान काटून आत्महत्या केली. परीणमी छत्रसाल व त्यांचे चार बंधू पोरके झाले. चंपतराय यांचा पराक्रम मिर्झा राजा जयसिंग जाणून होते. त्यामुळे राजा जयसिंग यांनी चंपतरायच्या पाचही मुलांचा सांभाळ केला.[१३]

### ३.२.१ राजा छत्रसाल

चंपतराय हे ओर्छापासून २३ मैलांवर असलेल्या मोहबा येथे लहानसे संस्थान सांभाळीत होते. मात्र चंपतरायच्या मृत्यू नंतर त्यांचे संस्थानही गेले. चंपतराय नंतर छत्रसाल हा बुंदेलेचा वारस ठरला. राजा छत्रसालाचा जन्म २६ मे १६५० मध्ये झाला.[१४] छत्रसाल यांचे लहानपणीचे शिक्षण बहुतेक अंशी शिवाजी सारखेच झाले. पैराणीक कथा श्रवण करण्याची त्याला विशेष आवड होती. मात्र वडील्याच्या मृत्यूनंतर स्वदेशात स्वातंत्र्य राज्य स्थापन करण्यांस देह झिजविण्याचा त्याने संकल्प केला होता.[१५] आई वडील्यांच्या मृत्यूसमयी छत्रसाल केवळ १२ वर्षाचा होता. त्यांने मोगलांना विरोध करणे शक्य नसल्याचे पाहून छत्रसालाने मिर्झा राजा जयसिंग यांच्या सैन्यात नौकरी पत्करली. याच काळात त्याला यूध्दाचे प्रशिक्षण मिळाले.[१६] प्रारंभी छत्रसाल यास आपल्या वडील्याच्या मृत्युनंतर रानोमाळ भटकावे लागले. मात्र त्यांने अतिशय कठीण परिस्थितीत स्वकर्तुत्वाने एका विशाल राज्याची निर्मीती केली व त्याची राजधानी पन्ना येथे स्थापन केली. त्यानंतर राजा छत्रसाल शिवाजी महाराज्यांच्या कारकिर्दीत जयसिंग सोबत महाराष्ट्रात आला होता.[१७] यावेळी छत्रसालाचा भाऊ अंगदास यांने पुरंधराच्या लढयात जिवावरचे साहस केले. परिणामी जयसिंगाने अंगदास यास एक हजार व छत्रसालास तीनशे अशा मनसबी मोगल बादशहाकडून ३ ऑगष्ट १६६५ रोजी मिळवून दिल्या.[१८] महाराष्ट्रात आल्यानंतर छत्रसाल शिवाजी राजे यांच्याकडे गेले. तेव्हा भिमानदीच्या काठी दोघांची भेट झाली. राजे शिवाजी यांनी छत्रसाल यास बुंदेलखंडात जाऊन तेथील लोकांस मोगलांविरुध्द उठाव करण्यांविषयी सांगीतले. त्यानंतर शिवाजीने छत्रसाल यास तलवार बक्षिस देऊन बुंदेलखडास रवाना केले.[१९] याकाळात छत्रपती शिवाजी यांच्या कार्याची छाप छत्रसालाच्या मनावर पडली. परीणामी त्यांनेही बुंदेलखंडात स्वतंत्र राज्य निर्माण करण्याचे ठरविले.[२०] छत्रसाल याला शिवाजी पासून स्वराज्याची प्रेरणा मिळाली या संदर्भात गो. स. सरदेसाई म्हणतात, “दक्षिणेत आल्यापासुन शिवाजीचे पराक्रम ऐकून छत्रसालास नविनच स्फुर्ती उत्पन्न झाली आणि मोगलाच्या पदरी हलकी नोकरी करण्यापेक्षा त्यांजविरुध्द आपले क्षात्रतेज गाजविण्याचा त्याने निश्चय केला.”[२१]

बुंदेलखंडात परत गेल्यानंतर छत्रसालाने शुकरण बुंदेल्याची भेट घेतली. त्याप्रसंगी बुंदेलखंड मुक्ती साठी छत्रसालानी मदत मागीतली. परंतू शुकरण यांने छत्रसालास मदत देण्यास नकार दिला. उलट स्वातंत्र्य प्राप्तीच्या विचारांपासून छत्रसालास परावृत्त करण्याचा त्याने प्रयत्न केला. तसेच छत्रसाल यास मोगल बादशाह औरंगजेब यांच्याकडून मनसदारी मिळवून देण्याचे आश्वासन दिले.[२२] मात्र छत्रसाल आपल्या ध्येयापासुन विचलीत झाला नाही. उलट अंधकारमय स्थितीतही छत्रसालाने बुंदेलखंडात गेल्यावर शिवाजी महाराज यांच्या प्रमाणेच शुन्यातून सृष्टी निर्माण केली.[२३] छत्रसालाच्या स्वराज्यप्रेमाविषयी सरदेसाई म्हणतात, 'महाराजांचे मराठे व मध्यहिंदूस्थानचे बुंदेले हयांच्या हया वेळच्या चरित क्रमांत एक प्रकारचे विलक्षण साम्य आहे. दोघेही स्वदेश स्वातंत्र्या करिता जिवापाड मेहनत करीत होते.'[२४]

छत्रसालानी त्यानंतर बुंदेलखंडात औरंगजेबाविरुध्द बंड करुन ते यशस्वी करुन दाखविले. त्यामुळे स. १७७२ मध्ये बुंदेलखंड स्वतंत्र झाला.[२५]

### ३.२.२ राजा छत्रसाल व महमंद बंगष संघर्ष

छत्रसाल यांच्या स्वराज्याच्या कार्यामुळे मोगल-बुंदेले यांच्यात संघर्ष उदभवला. परीणामी त्यांच्यात अनेक दिवस संघर्ष सुरु राहीला. मात्र त्यानंतर इ. स. १७२४ पर्यंत महमंद बंगष याला छत्रसाल यांच्या कडे लक्ष देता आले नाही. कारण त्या काळात दिल्ली दरबारात अनेक भानगडी सुरु होत्या. त्यास राजपुत राजे जयसिंग, अजितसिंग, अमरसिंग यांच्या बंडाळया व उद्योग कारणीभुत होते. मात्र इ. स. १७२४ मध्ये महमंदखान बंगष यांने बुंदेलखंडात प्रवेश केला. परिणामी छत्रसाल व बंगष यांच्या सैन्यात झटपटी सुरु झाल्या. यावेळी देन्ही सैन्यात जवळजवळ सहा महिने संघर्घ सुरु राहीला. तेव्हा महमंद बंगष याने छत्रसालाशी तह करुन माघार घेतली व बंगष ग्वाल्हेरकडे निघून गेला. तरीही इ. स. १७२५-२६ या काळात दोघांनीही एकमेकांचा प्रदेशावर आक्रमणे करुन प्रदेश उध्दवस्त केलेत. नंतरच्या काळात मात्र राजा छत्रसालांच्या दोन पुत्रांनी (हिरदेश व जगतराज) छत्रसालाचा सबुरीचा सल्ला न एकता महमंद बंगष यांच्या बऱ्याचशा प्रदेशावर ताबा मिळविला.[२६] बुंदेले यांच्या मोगलांच्या प्रदेशावरील हल्यामुळे मोगल बादशाहा अस्वस्थ झाला. तेव्हा बादशाहाने



3594

बुंदेले यांचा बंदोबस्त करण्यासाठी बंगष याला पाठविण्यांचा निर्णय घेतला. महमंद बंगषाला सैन्यबळ आणि द्रव्यबल कमी पडू नये म्हणून महिना दोन लाख रुपये देण्यांची व्यवस्था मोगल बादशाहाने केली. त्यानंतर १७२७ च्या जानेवारी महिन्यांत महमंद बंगष याने बुंदेलखंडात प्रवेश केला. त्याच्या प्रतिकारासाठी छत्रसाल एक लाख पायदल व विस हजार घोडदल यासह सज्ज होते. वास्तविक यावेळी बंगष यांच्याकडे सैन्य संख्या फार कमी होती. परंतू त्यांना फार मोठा तनखा बादशाह कडून मिळत असल्यामुळे त्यांने कवडी न कवडी खर्च करुन झपाटयाने सैन्य भरती सुरु केली. या काळात दोन्ही सैन्यात एकाचवेळी अनेक ठिकाणी चकमकी सुरु झाल्या.[२७]

इ. स. १७२८ च्या प्रारंभी राजा छत्रसाल व त्यांच्या पुत्रांच्या बऱ्याच फौजा पश्चिम बुंदेलखंडात सरकल्या होत्या. त्यांच्या मागे बंगष यांचे सैन्य होते. या काळात बुंदेले बंगषाच्या सैन्याच्या प्रतिकार करित होते. मात्र बुंदेले सैन्याचा प्रतिकार कमी पण सैन्याची पळापळच जास्त होती. यावेळी एका समोरा समोर झालेल्या संघर्षात छत्रसाचा मुलगा जखमी होऊन कोसळला. तेव्हा छात्रसालाची पत्नी जैतकुंवर हिने मोगली सैन्याशी सामना करुन त्यांना पिटाळून लावले.[२८] छत्रसाल व बंगश यांच्या सैन्यात जुन १७२८ मध्ये भयंकर युध्द झाले. तेव्हा राजा छत्रसालाने जैतपूरच्या किल्याचा आश्रय घेतला. मात्र त्यानंतर तो किल्यात अतिशय त्रस्त झाला व किल्यांहुन लढत लढत बाहेर पडण्याचा प्रयत्न केला.[२९] यावेळी वयोवृध्द असलेल्या छत्रसाल यांची माणसे फार मारली गेली. लढाईच्या वेळी त्यांच्या जवळ एक लाख पायदळ व विस हजार सैन्य होते. परंतू एका अजूलीच्या संघर्षात त्यांचे १३ हजार सैन्य मारले गेले. तेव्हा इरेला पेट्न आणखी माणसे मारुन घेण्यास मतलब नाही. असा विचार करुन १७२८ च्या डिसेंबर महीन्यात जैतपूरचा किल्ला बंगषाने विजीत केल्यानंतर छत्रसाल यांने आपल्या पुत्रासह शरणागती पत्कारली.[३०] यावेळी छत्रसालाने बंगष यांच्याशी लढा दिला त्याविषयी डॉ. गुजर लिहीतात, 'छत्रसाल वयोवृध्द असुनही सैन्यात अग्रभागी भीष्माचार्यासारखे लढत होते.[३१] मात्र ते बंगष यांच्याविरुध्द यशस्वी होवु शकले नाही. त्या बिकट प्रसंगी त्यांने बाजीराव यास मदतीस बोलविण्याचा निणर्य घेतला.

### ३.३ पेशवा बाजीरावाची बुंदेलखंड मोहीम

इ.स. १७२८ च्या पावसाळयात, बुंदेलखंडात महमंदखान बंगष यांने स्वारी केली. वृध्द छत्रसाल राजाचे चार-पाच परगणे व्यापुन तो जैतपूरला वेढा देऊन बसला. अशावेळी राजा छत्रसाल महोबाच्या किल्याचा आश्रय घेऊन तेथून बाजीरावास मतदीची हाक दिली.[३२] एप्रिल १७२८ मध्ये बंगष याने जैतपूरच्या किल्यास वेढा दिला. परंतू पावसामुळे वेढा रेंगाळू लागला. जमीन ओली असल्यामुळे किल्याभोवती लावलेले सुरुंग कारागीर होत नव्हते. परंतू चिकट असलेल्या बंगष याने चार महीने वेढा दिला.[३३] यावेळी राजा छत्रसाल हताश झाला होता. कारण संपूर्ण बुंदेल वंशच संकटात सापडला होता. अशा संकट समयी बाजीरावाच मदत करेल आणि बुंदेल्यांनाही वाचवेल असा विश्वास छत्रसालाला वाटत होता.[३४] यासंकट समयी वृध्द छत्रसालाने करुणा युक्त दोहा व्दारे बाजीरावास संदेश पाठविला,

जो गति ग्राह गजेंद्रकी सो गत है आज ।

बाजी जात बुंदेलकी राखो बाजी लाज ।।[३५]

सोबतच छत्रसाल यांने बाजीराव यांच्या कडे दुर्गादास राठोड यास पाठविले, तेव्हा निरोप घेऊन दुर्गादास बाजीराव यांच्याकडे आला.[३६] बाजीरावास छत्रसालाचे मदतीचा निरोप आला तेव्हा बाजीरावानी देवगडहुन लगेच आप्पाला पत्र लिहीले, "मै छत्रसाल के सहातार्थ जा रहा हू। जैसा आप उत्तम समझे मुझसे स्वातंत्र रुप मे अपनी प्रगती का प्रबन्ध कर सकते है।"[३७] पेशवा व भाऊचिमाजी आप्पा यांना माळवा व गुजरातमधिल आपले वचर्स्व कायम करणे हाच सर्वात महत्वाचा पश्न वाटत होता.[३८] मात्र तरीही बाजीराव यांने छत्रसालास मदत करण्याचे ठरविले. या दरम्यान बाजीरावानी चिमाजी आप्पा यांना अनेक पत्र पाठविलीत. बाजीराव आप्पांना लिहीतात, "येथून देवगडाची (सरहद) येक मल आहे. देवगडावरी जातो. अगर संग्राम दोहोतून अेक काये करितील पहावे जहालयावरी बुदेलखंडाकडे जातो. राणोजी भोसले फौज सहवर्तमान माळवा प्रांते जाणार. संप्रत घाटउत्तरोन नेमाडाकडे गेले. कदाचित माल विचात आले तरी लुटून टाकणे. माळवा प्रांताचा टका अवघ जप्त करणे. आम्ही तिकडे यावे म्हणुन तुम्ही दोचौपत्री लिहीले, त्यासी आम्ही गढे छत्रसालाचे मुलकात आलो आहो. दोनी लस्करे येका जागी होउन पैका कैसा मिळेल."[३९] यावरुन या दोन्ही

मोहीमेमागे बाजीरावाचा उदेश पैका जमा करणे हाच होता असे दिसते. बाजीराव यावेळी देवगडचा गोंड याजकडून वार्षीक पाऊण लाख खंडणी मिळवीतो.[४०]

छत्रसालाचे पत्र मिळताच बाजीराव छत्रसालास मदत करण्यांसाठी ४ फेब्रु. १७२९ रोजी बुंदेलखंडास निघाला.[४१] छत्रसालाला सोडविण्यासाठी ५ मार्च रोजी खिजरी येथे व नंतर पवईजवळच्या मार्गाने विमपुर येथे आले. विमपुरला पेशवा यानी आपली छावनी टाकली. यावेळी बाजीराव सोबत पिलाजी जाधव, तुकोजी पवार, इत्यादी नामवंत सरदार व ३० हजार घोडदळ होते. त्यानंतर बाजीराव १० मार्चला विमपुर वरुन राजगढ येथे आले.[४२] दरम्यान मल्हारराव होळकर बाजीरावास येऊन भेटले.[४३] यावेळी दिवसाला तिस-पत्तीस कोसांची मजल मरीत बाजीराव थेट गोंडवनातील देवगडा पासुन बुंदेलखंडात आला.[४४] यावेळी छत्रसालाचे पुत्र मदनसिंग आपल्या सैन्यासह बाजीरावास येऊन मिळतो तेव्हा त्यांच्या सैन्याची संख्या सतर हजारापेक्षा जास्त होते.[४५]

### ३.३.१ बाजीराव पेशवा व महमंदखान बंगष संघर्ष

बाजीराव पेशवा बुंदेलखंडात आल्यानंतर भरतसींग या छत्रसालाच्या पुत्राने बाजीरावाची भेट घेतली. त्यानंतर ३ दिवसांनी १३ मार्च १७२९ रोजी महोबाजवळ बाजीराव व छत्रसाला यांची भेट झाली. यावेळी छत्रसाल यांचा वकील आसाराम हेही हजर होते. राजा छत्रसालाने यावेळी बाजीरावाला मेजवानी दिली. तसेच बाजीराव पेशवा यांचा सत्कार करण्यांत आला. त्याचा खर्च ४९८९ रुपये आला.[४६] यावेळी आपल्या तळापासुन २२ मैलावर बाजीराव व त्यांचे सैन्य येईपर्यंत बंगषाला काहीच माहीती नव्हती. बाजीराव व छत्रसाल यांने २५ मार्च १७२९ रोजी बंगष यांच्या लष्करी तळाला वेढा दिला. तेव्हां त्यांचे सर्व मार्ग बंद करण्यांत आले.[४७] बंगषाकडे पंधरा हजार फौज होती. इतक्या लवकर बाजीराव आपणास गाठेल याची त्याला अजिबात कल्पना नव्हती. त्याचा अंदाज चुकला व महमंद बंगष बाजीरावाच्या तावडीत सापडला.[४८] यावेळी मोठया मुश्कीलीने महमंद बंगष यांने १० हजार पायदळ आणि १० हजार घोडेस्वार इतके सैन्य पुढे केले. तसेच किल्याभोवती खंदक खणून बंगष युध्दासाठी सज्ज झाला.[४९] बाजीरावांनी दिलेला जैतपूरचा हा वेढा पुष्कळ दिवस चालला. कारण जैतपुरचा किल्ला फार मजबुत होता. त्यास मराठयांनी वेढा दिला.

त्यामुळे त्यांच्या सैन्यासह बंगष किल्लांच्या आंत कोंडला गेला. या वेढयाच्या वेळी अनेक पराक्रमी सरदार बाजीराव यांच्या सोबत होते. मल्हाराव होळकर, पिलाजी जाधव, दावलजी सोमवंशी व विठ्ठल शिवदेव हे प्रसिध्द सरदार होते.[५०]

अशा संकटसमयी बंगष यांचा मुलगा कायमखान त्यांच्या मदतीला धावून आला. परंतू मराठयांनी त्याची व बंगष यांची भेट न होऊ देता जैतपूरनजीक सुपे येथे त्यास मराठयांनी घेरले. तेव्हा कायमखान शंभर घोडदलासह पळून गेला. त्यांचे लष्कर लुटण्यात आले. या लुटीने तीन हजार घोडी व १३ हत्ती मिळाले.[५१] कायमखन यांचा पराभव केल्या संबंधीचे पत्र २८ एप्रिल १७२९ रोजी आप्पाला पाठविण्यांत आले. त्या पत्रात लिहीले होते की, "कै. नानांच्या पुण्यप्रतापे करुन नांव लावून फन्ना केला. सहा हजार फौज बुडवली. सरदार मृत्यू पावला. एकोणीस हत्ती पाडाव आले. वर्तमान ऐकोन राजश्री बहुतसे संतोषी जाले."[५२]

मराठयांच्या जैतपूरचा वेढा यावेळी चालूच होता. त्यामुळे बंगष त्रस्त झाला होता. कारण जैतपुरच्या किल्याला होणारी रसद तोडुन बंगष याला मराठयांनी जेरीस आणल होते. किल्यातील सैनिकांना अन्नधान्य मिळेनासे झाले. १०० रुपये देऊ नही एक शेर कणिक मिळत नव्हती. तेव्हा निराश होऊन बंगशाने आत्मसमर्पण केले व कौल घेतला. तेव्हा मराठयांनी बंगशाच्या फौजेस धर्मवाट दिली[५३]

### ३.३.२. पेशवा बाजीराव व राजा छत्रसाल यांच्यातील करार

बंगषावर विजय मिळविल्यानंतर छत्रसाल यांने आपल्या राजधानीत पेशवा बाजीराव यांचे भव्य स्वागत केले. तसेच छत्रसालाने आपल्या राज्याचे तीन समप्रमाणात भाग केले. त्यापैकी दोन आपल्या हरदेश व जगतराज या  पुत्रानां तर तिसरा पेशवा बाजीराव यास दिला.[५४] यावेळीच छत्रसाल व बाजीराव यांच्यात एक करार झाला. त्यानुसार राजा छत्रसालाने बाजीराव पेशवा यास काल्पी, हटा, सागर, झाशी, सिरोज, कुंच, गडकोट आणि हरदेनगर इत्यादी प्रदेश मिळाला.[५५] यावेळी बाजीरावाला जी देणगी छत्रसाल राजाकडून मिळाली त्या मोबदल्यात बाजीरावाने खालील अटी कबुल केल्या. "तुमचा व्यवहार बढाई, मरतीब आहे तो कधी कमी  होणार नाही. तुमचे किल्ल्यांची व

जागाची रद्बदल करणार नाही. तुम्हांस गैरराजी होतील त्यास आम्ही ठेवणार नाही. आमची फौज तुमच्या मुलखातून गेल्यांस तिचा खर्च आम्ही भागवू. पादशाही फौज तुमचेवर लढाई करुन आल्यास तुमचे संरक्षण करु:, आणि आम्हांवर आल्यास तुम्ही मदत करावी. तुम्ही पाच लाखांची जाहागिर आम्हा दिली आहे त्याशिवाय जास्त रुपयाची किंवा गावाची रद्दबदली करणार नाही. यास दरम्यान चिमाजी आप्पा, नाना, पिलाजी जाधव, मल्हारराव, राणोजी व यशंवतराव पवार व जानोजी समशेर आहेत."[५६] छत्रसालाच्या देणगीमुळे बुंदेलखंडातील बराच मोठा प्रदेश बाजीराव यांच्या मालकीचा झ् ााला.[५७] छत्रसाल यांनी दिलेल्या प्रदेशाचे दोन भाग करण्यांत आले. त्यापैकी सागर येथे गोविंद बल्लाळ खरे व झांशी येथे रघुनाथ हरीपंत नेपाळकर या आपल्या विश्वासू लोकांना सुभेदार नेमले.[५८]

बाजीराव यांनी छत्रसालास मदत करुन त्याची मुक्तता केल्यामुळे, त्याची सत्ता मिळवून दिल्यामुळे बाजीराव पेशवा यांच्यावर छत्रसालाने पुत्रवत प्रेम केले.[५९] याचवेळी राजा छत्रसाल यांने बाजीरावास मस्तानी नावाची आपली पुत्री, मुसलमान रक्षेपासून झालेली, ती अर्पण केली.[६०] यास मराठी रियासतकार यांनेही दुजोरा दिला आहे. सरदेसाई लिहतात की, " बहुत सम्मभव है की असी समय पर नवयुवती मस्तानी को अदभुत उपहार के रुपने छत्रसाल ने बाजीराव को दे दिया गया."[६१]

त्यानंतर २२ मे १७२९ रोजी बाजीरावानी छत्रसालाचा निरोप घेतला आणि आपल्या २० हजार घोडदळासह दक्षिणेकडे कुच केले. परंतु जाण्यापुर्वी बाजीरावाने छत्रसालाचे काम करुन दिले होते. कारण किल्यात जेरबंद होऊन पडलेल बंगष यांने टेकीला येऊन छत्रसालाशी सल्ल्याचे बोलणे सुरु केले होते.[६२] त्यांनतर छत्रसाल व राजघराण्यांतील व्यक्तीचा निरोप घेवुन मस्तानीला सोबत घेऊन पेशवा पुण्याला परत निघाला.[६३] २३ मे १७३९ रोजी जैतपुरहुन गढा, केतुधन, बुऱ्हानपुर, मकराई मार्गे १६ जुलै १७२९ रोजी बाजीराव पुण्यात पोहचला.[६४] जेव्हा बाजीराव यांचे पुण्याला आगमन झाले त्यावेळी चिमाजी आप्पा यांनी भांबुर्डा आणि गारपिराच्या टेकडीवरुन तोफांचे बार काढण्याची आज्ञा दिली.[६५]

बाजीराव परत दक्षिणेस निघाला असला तरी राजा छत्रसालो जैतपुरचा वेढा चालू ठेवला. बंगष यांच्या सैन्याचे यावेळी खुप हाल झाले. त्यांच्यावर उपासमारीची वेळ आली. अशावेळी बंगश यांचा मुलगा मदतीला येत आहे असे दिसताच छत्रसालानी बंगष यांच्याकडे वाटाघाटीचा प्रस्ताव

पाठविला. तेव्हा बंगश यांने तहाला सहमती दर्शविली. त्यानुसार महमंद बंगष यास जैतपुरच्या बाहेर सुरक्षीत पडण्यास छत्रसालाने अनुमती दिली. यावेळी बंगष यांनी पुन्हा बुंदेलखंडावर आक्रमण न करण्याच मान्य केले. छत्रसाल यांनेही जहागिरीच्या प्रदेशातील उत्पन्नाच्या मोबदल्यात पुर्वी प्रमणेच खंडणी देण्याचे मान्य केले.[६६] ऑगस्ट १७२९ मध्ये बंगष यांनी किल्ला खाली करुन त्याचा ताबा राजा छत्रसाला यास दिला. ३ ऑक्टोबर १७२९ रोजी बंगष यांने काल्पीजवळ यमुना ओलांडली. त्यानंतर बंगष पुन्हा बुंदेलखंडात आलाच नाही.[६७]

### ३.४ चिमाजी आप्पाची बुंदेलखंड मोहीम:

चिमाजी आप्पा व बाजीराव यांच्या माळवा व बुदेलखंड विजयानंतर परत आल्यावर त्यांची सर्वत्र स्तुती, अभिनंदन करण्यांत आले. परंतू शाहु महाराज यांना मात्र आनंद झालेला दिसत नाही. छत्रपती शाहु महाराजाना भिती वाटत होती की, कदाचित पेशवा बंधूने केलेल्या स्वारीमुळे संकट निर्माण होईल.[६८] याकाळात पेशवा परीवारात विवाहाचा योग आला. चिमाजी आप्पांच्या पत्नी रुख्माबाई यांच्या मृत्यू होऊन एक वर्ष झाले होते. आप्पाचे मनही तेव्हापासुन उदासच होते. पण वरकरवी तसे अजीबात जाणवू न देता चिमाजी आप्पा पेशव्याच्या वतीने साताऱ्यास मुतालकी पाहत होते. तेव्हा मातोश्री राधाबाईच्या मनात होते की, चिमाजी आप्पाचे दुसरे लग्न लावून द्यावे. मात्र आप्पा कोणाचेही ऐकत नव्हता. तेव्हा बाजीराव यांने तेवढासाठी आप्पास साताऱ्याहुन बोलावून घेतले. सर्वांनी आप्पांची समजुत काढली आणि शेवटी कोणाचेही नाही. पण आपल्या थोरला बंधुचे (बाजीराव) चिमाजीने ऐकले.[६९] त्यानंतर राधाबाई यांनी ९ डिसेंबर १७३१ रोजी आप्पाचे दुसरे लग्न थत्यांची कन्या अन्नपुर्णाबाईशी लावून दिला.[७०] परंतू याविवाह सोहळानंतर आप्पाला परत उत्तरेत जावे लागले.

इ. स. १७३२ हे वर्ष बाहेरील कार्याच्या दृष्टीने शाहु महाराजाच्या दरबारात व पेशव्याच्या दृष्टीने विफलच गेले. यावेळी मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे व उदाजी पवार हे सरदार जरी माळव्याच्या मुलुखगिरीवर होते. पण बाजीराव-चिमाजी मोहीमेसाठी बाहेर गेले नाहीत. चिमाजी आप्पा व पेशवा बाजीराव सन १७३२ साली बाहेर न जाण्याचे कित्येक महत्वाचे कारण होते.

उमाबाई डभईच्या युध्दाने असंतुष्ट होता. म्हणून चिमाजी आप्पा व बाजीराव यांना शाहु महाराजाने आपल्या जवळ ठेविले होते.[७१] महमंद बंगष जैतपुरला पराभुत झाला असला तरी इ. स. १७३१ व १७३२ या दोन वर्षाच्या कालावधीत त्याने मराठयांना माळवा प्रांतातुन हाकलुन लावण्याचा निकराचा प्रयत्न केला. बंगष याने १ एप्रिल १७३१ रोजी चिखलठाण हे ठाणे काबिज केले. त्यांनतर तो मल्हारराव होळकरांवर चालुन गेला. त्यावेळी गनीमी युध्द पध्दतीने मल्हारावाने छत्रसालास त्रस्त केले. जुन १७३१ मध्ये अंताजी माणकेशर यांचा महमंद बंगषाने पराभव केला.[७२] मात्र त्यानंतर माळवा प्रांताचा सुभेदार बंगष याला काढून त्या जागी सप्टेंबर १७३२ मध्ये जयसिंगची पुन्हा माळवा प्रांताच्या सुभेदारपदी नेमणूक केली.[७३] त्यानंतर जयसिंग बादशाहाशी बोलणी करुन मराठयांच्या बंदोबस्त करण्यासाठी जयपूरास परत आला. २० ऑक्टो. १७३२ रोजी जयपुरहून निघुन तो डिसेंबर मध्ये उज्जयनीस येऊन पोहचला.[७४] याच दरम्यान आप्पाने बुंदेलखंडात स्वारी केली.

### ३.४.१ .चिमाजा आप्पांच्या बुंदेलखंडात स्वारीची कारणे.

राजा छत्रसाल यांने बाजारावास राज्याचा तिसरा हिस्सा अनेक दिवस प्राप्त झाला नाही. त्यासाठी बाजीराव यांने राजा छत्रसाल यास पत्राने निरोपही पाठविला होता.[७५] मात्र जहागिरीचा हिस्सा मिळाला नाही. त्यातच ३१ डिसेंबर १७३१ राजी रेजा छत्रसाल मृत्यु पावला. त्यावेळी त्यांचे वय ८२ वर्षाचे होते. त्यास अनेक पूत्र होती. त्यापैकी हिरदेश व जगतराज यांनी राज्य वाटून घेतले.[७६] मात्र मरण्यापूर्वी राजा छत्रसाल यांने राज्याचा हिस्सा बाजीरावास देवुन त्याची मदत पुढे यापल्या वारसाला सदैव मिळत जावी अशी योजना करुन ठेविली.[७७] यावरुन छत्रसाला यांने आपल्या वारसांचा संरक्षणाचा विचार करुन ठेवला असे दिसते. छत्रसाल याच्या मृत्यू पत्रातही बाजीरावास दयावयाच्या हिस्साच्या उल्लोख केला होता. त्यानुसार वडील पुत्र हरदेश यास ४२ लाख, दुसरा पुत्र जगतराज यास ३६ लाख व पेशवा बाजीराव यांना ३३ लाख रुपय वार्षीक उत्पन्नाचे प्रदेश वाटून द्यावे अशी इच्छा व्यक्त केली होती.[७८] छत्रसालाच्या पुत्रांनी बाजीरावास सव्वा दोन लाख वसूलीचा प्रदेश देण्याचे मान्य केले होते.[७९] बाजीराव पेशवा यांच्या बुंदेलखंड स्वारीनंतर त्याला द्यावयाच्या जहींगिरी विषयी अनेक दिवस वाटाघाटी झाली होती. त्याकामासाठी राजा छत्रसालांचे वकील

हरीदास व आशाराम पुण्याला आले होते.[८०] मात्र तडजोड झाल्याचे दिसुन येत नाही. तेव्हा आप्पा बुंदेलखंडयाच्या स्वारीवर गेले. चिमाजी आप्पांचा बुंदेलखंडाच्या मोहीमेवर जाण्याचे मुख्य उद्देश छत्रसाल यांनी दिलेल्या वचनानुसार त्यांच्या राज्याचा तिसरा हिस्सा प्राप्त करणे.

### ३.४.२ आप्पांची बुंदेलखंड स्वारी

११ नोव्हेबर १७३२ रोजी चिमाजी आप्पा ससैन्य भासली, नरसापुर, मेहूनवार, खांडवा, सुहागपूर, टेंभुरणे मार्गानी बुंदेलखंडात गेले. चिमाजी आप्पा २४ डिसेंबर १७३२ रोजी हिरदेनगर येथे पोहचले. यावेळी चिमाजी सोबत गोंविद बल्लाळ व बाजी भीवराव रेटरेकर होते.[८१] ज्यावेळी चिमाजी आप्पा उत्तरेत गेला. त्यापुर्वीच हिरेदेसाचे वकील आशाराम व हरिदास पुरोहीत बाजीराव पेशवा यांच्या कडे पुण्यांस गेला. तेव्हा बाजीरावानी त्यांच्या बरोबर बोलणी करुन त्यांच्या सोबत आपला वकील देवून चिमाजी आप्पा यांच्याकडे बुंदेलखंडास पाठविले.[८२] मात्र मुधोजी येण्यापुर्वी चिमाजी आप्पा ने गोविंदपंत बुंदेलल्याचे वतीने हिरदेसा व जगतरास राज यांच्याशी बोलणी चालविली होती.[८३]

यावेळी चिमाजी आप्पा यांनी हिरदेसाह यांच्या कडून सव्वालाख रुपये, राजगडचा किल्ला व जैतपूरच्या राज्याकडून एक लक्षाची जहागीरी प्राप्त केली. म्हणजेच सन १७३३च्या सुरवातीलाच एकूण सव्वा दोन लाख रुपय उत्पन्नचा मुलख व राजगडाचा किल्ला देण्याबाबत करार आप्पा यांनी हरीदास पुरोहीत व आसाराम यांना मध्यस्ती ठेवून केला. करारानुसार वसूली कमी झाल्यास उरलेली रक्कम हिरदेसाह व जगतराज यांनी भरावी.[८४] थोडक्यात यावेळी राजा छत्रसालाने बाजीरावास देऊ केलेली जहागीर चिमाजीने मिळविली.[८५] चिमाजी आप्पाने हरिदेस व जगतराज याची पुर्ण समजुत काढून औच्छा दातिया इत्यादी राज्यांवर शह बसविला व खंडण्या वसुल केल्या. राजकारणामुळे चिमाजी आप्पास लाभांश जरी झाला नसला तरी गोडी गुलाबीने वागुन त्याने उत्तर भारतात मराठी अंमल बसविला.[८६] त्यावेळी चिमाजी आप्पांनी बुंदेलखंडावर मराठयांचे वचर्स्व टिकवून ठेवण्यासाठी व कर वसूली करण्यासाठी गोविदपंत व मुण्ध्धोजी हरी यांची नेमणूक केली.[८७] याच दरम्यान कमरुद्दीन हा मोगलाचा वजीर चिमाजी आप्पावर चालुन आला. मात्र त्याचवेळी चिमाजी दक्षिणेत

परत आला.[८८] त्यानंतर पावसाळ्यात आप्पां, शिंदे व होळकर यांना सोबत घेवून जून १७३३मध्ये यांना घेऊन दक्षिणेत आला.[८९] अशाप्रकारे बुंदेलखंड मोहीम आटोपून चिमाजी आप्पा ७ जुन १७३३ रोजी पुण्यास परत आला.[९०]

चिमाजी आप्पा पुण्यास आला तेव्हा बाजीराव सिदीच्या विरुध्द युध्दात गुंतला होता. परिणामी माळवा-बुंदेलखंडचा कार्यभाग अर्धावर राहीला होता. त्यामुळे पचिश्म किनाऱ्या वरील कार्य सोडून उत्तरेतील मोहीमेसाठी चिमाजी आप्पा व बाजीराव यांना छत्रपतीची आज्ञा मिळत नव्हती.[९१]

### ३.४.३ बाजीराव व आप्पा यांच्या बुंदेलखंड स्वारीचे महत्व.

१. बुंदेलखंड स्वारीमुळे मराठयांचे उत्तरेत वर्चस्व प्रस्थापित झाले. बुंदेलखंडातील सागर, काल्पी, हाता, सिरोंज, झांशी व गढकोट इत्यादी प्रदेश बाजीराव यांच्या वचर्स्वाखाली आले.
२. बुंदेलखंड स्वारीमुळे मराठा साम्राज्य विस्ताराला चालना मिळाली.
३. आर्थीक फायदा झाला. तेथे मिळालेल्या पैशातून कर्ज फेड करण्यात आली.
४. बुंदेलखंडावर वचर्स्व प्रस्थपित झाल्यानंतर दुआबचा प्रदेश, बिहार व बंगालमध्ये मराठा सत्तेचा प्रसार करण्यासाठी फायदा झाला.
५. हिंदूधर्म रक्षणाचे काम झाले.

एकंदरीत बाजीराव पेशवा व चिमाजी आप्पा यांच्या बुंदेलखंड मोहीमामुळे मराठयांना राजकीय, आर्थिक फायदा. पण त्याबरोबरच बुंदेलखंडातील एका हिंदू राज्याला मदत करुन त्यांचे राज्य वाचविले. म्हणजेच हिंदूधर्म रक्षणाचे फार महत्वाचे काम केले.

**संदर्भः**


१. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.७२

२. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. १६५

३. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पूर्वोक्त, पृ. १९३

४. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ७१.

५. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ७२

६. प्रा.बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. १४५

७. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. १६५

८. प्रा.बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. १४६

९. प्रा.बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. १४६

१०. कस्तूरे कौस्तूभ, ।। पेशवाई।।,पुर्वोक्त, पृ. १०५

११. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. १६५

१२. प्रा.बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. १४६

१३. कस्तूरे कौस्तूभ, ।। पेशवाई।।,पुर्वोक्त, पृ. १०५

१४. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. १०३

१५. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड २, पुर्वोक्त, पृ. २७३

१६. प्रा.बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. १४६

१७. गर्गे. स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड-२, पुर्वोक्त, पृ. २७३

१८. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड २, पुर्वोक्त, पृ. २७३

१९. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड २, पुर्वोक्त, पृ. २७४

२०. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. १०३

२१. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड २, पुर्वोक्त, पृ. २७३

२२. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ७८

२३. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ७८

२४. गर्गे स. मा. (संपा.), मुसलमानी रियासत, खंड २, पुर्वोक्त, पृ. २७३

२५. कस्तूरे कौस्तूभ, ।। पेशवाई।।,पुर्वोक्त, पृ. १०७

२६. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ८६

२७. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ८६

२८. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ८६-८७

२९. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. १०३

३०. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पूर्वोक्त, पृ. १९३

३१. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. २५

३२. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. १६७

३३. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ. १९३

३३. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ८८

३५. कस्तूरे कौस्तूभ, ।। पेशवाई।।,पुर्वोक्त, पृ.१०७

३६. कस्तूरे कौस्तूभ, ।। पेशवाई।।,पुर्वोक्त, पृ.१०७

३७. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. १०४

३८. प्रा.बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. १४९

३९. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ५१

४०. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ५२

४१. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. २६

४२. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ८८-८९

४३. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. २६

४४. कस्तूरे कौस्तूभ, ।। पेशवाई।।,पुर्वोक्त, पृ.१०८

४५. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ५२

४६. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ८९

४७. प्रा.बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. १४९

४८. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ५२

४९. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ८९

५०. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. १७१

५१. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ५३

५२. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ९०

५३. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ९०

५४. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. २६

५५. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ३३८

५६. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. १७२

५७. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. २६

५८. कस्तूरे कौस्तूभ, ।। पेशवाई ।।,पुर्वोक्त, पृ. ११३

५९. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ. ३४

६०. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. २६

६१. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. १०६

६२. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पूर्वार्ध), पुर्वोक्त, पृ. २०४

६३. कस्तूरे कौस्तूभ, ।। पेशवाई ।।,पुर्वोक्त, पृ. ११३

६४. प्रा.बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. १५२

६५. कस्तूरे कौस्तूभ, ।। पेशवाई ।।,पुर्वोक्त, पृ. ११४

६६. प्रा.बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. १५०-१५१

६७. प्रा.बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. १५१

६८. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. १०६

६९. कस्तूरे कौस्तूभ, ।। पेशवाई ।।,पुर्वोक्त, पृ. १२०

७०. कस्तूरे कौस्तूभ, ।। पेशवाई ।।,पुर्वोक्त, पृ. १२०

७१. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ४५५

७२. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. १७४

७३. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ४५६

७४. सरदेसाई गो. स., मराठों का नविन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. १०६

७५. प्रा.बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. १५२

७६. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ४३७

७७. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ४३७

७८. प्रा.बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), खंड-२, पुर्वोक्त, पृ. १५२

७९. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ४३७

८०. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ३३८

८१. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ९२

८२. सरदेसाई गो. स., मराठों का इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. १७६

८३. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ४५७

८४. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. ९२

८५. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ५३

८६. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ४५७

८७. सरदेसाई गो. स., मराठों इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. १४८

८८. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ४६५

८९. सरदेसाई गो. स., मराठों का इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. १४९

९०. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ४६५

९१. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ४५८

# प्रकरण : ४ चिमाजी आप्पाचे गुजरात मधील कार्य

४.१. खंडेराव दाभाडे.

४.२ मोगलांचे गुजरात विषयक धोरण.

४.२.१ मोगल-मराठा संघर्ष.

४.२.२ सरबुलंदखान - मराठा संघर्ष.

४.३ चिमाजी आप्पाची गुजरात मोहीम.

४.४ निजाम - दाभाडे कारस्थान.

४.५ चिमाजी आप्पाची दाभाडे विषयक भुमीका.

४.६ निजाम - बंगष भेट

४.७ दाभाडे यांची युध्दाची तयारी .

४.८ चिमाजी आप्पाची डभई मोहिम.

४.८.१ चिमाजी आप्पा - अभयसिंग भेट.

४.८.२ डभोईची लढाई (१ एप्रिल १७३१)

## प्रकरण : ४ चिमाजी आप्पा व गुजरात.

*शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर २० वर्षापर्यंत मराठयांनी गुजरातमध्ये अनेक स्वाऱ्या केल्या. याच काळात मोगल बादशहा औरंगजेब सर्व शक्तीनिशी मराठा राज्य नष्ट करण्यासाठी महाराष्ट्रात आला होता. त्यामूळे मराठा-मोगल यांच्यात संघर्ष निर्माण झाला. बादशाहा औरंगजेब मराठयांशी लढत असताना माळवा व गुजरात प्रांतावरील मोगल बादशाहाची पकड सैल होऊ लागली. अशा स्थितीत मराठा सरदारांनी माळवा-गुजरात प्रांतावर मोठया प्रमाणात आक्रमणे सुरु केलीत. मराठयांचे सरदार मोगली प्रदेशावर अचानक आक्रमण करुन लुट करु लागले. परंतू मराठा सरदारांच्या या आक्रमणातून मराठा सरदारात आपसी संघर्ष सुरु झाला. कालांतराने बाळाजी विश्वनाथ यांनी सय्यद बंधुना मदत केल्यामुळे सय्यद बंधुचे दिल्ली दरबारात महत्व वाढले. तेव्हां सय्यद बंधूनी मोगल बादशाहाकडून दक्षिणेतील सहा सुभ्यातून चौथाई व सरदेशमुखीची सनद मराठयांना मिळवून दिली. या सनदामुळे मराठा साम्राजविस्तारास चालना मिळाली. शिवाय मराठा सरदारांना कार्य करण्यास नवीन क्षेत्र उपलब्ध झाले. त्यातून काही नविन सरदारांचा उदय झाला. त्यात काही मराठा सरदार बलिष्ठ बनले व स्वतंत्र वागू लागले. परिणामी शाहु महाराज व मराठा सरदार यांच्यातील दुरावा वाढत गेला. या काळातच छत्रपतीचे महत्व कमी होवून पेशव्यांचे महत्व वाढले. काही सरदारांना पेशव्यांचे वर्चस्व मान्य नव्हते. परिणामी पेशवा व सरदार यांच्यात अधिकार क्षेत्रासाठी वाद निर्माण होवून संघर्ष निर्माण झालेत. विशेषत: दाभाडे व पेशवा बाजीराव यांच्यातील मतभेद विकोपाला जाऊन संघर्ष निर्माण झाला. चिमाजी आप्पांच्या गुजरात मधील मोकासा वरुन समस्या निर्माण होवून त्रिंबकराव दाभाडे यांनी शाहू महाराजांचे शासन उलथून पाडण्याचे कारस्थान केले. त्यातून दाभाडे व पेशवा बाजीराव यांच्यात संघर्ष निर्माण झाला. त्या संघर्षाच्या आढावा घेण्यापुर्वी गुजरात मधील दाभाडे घराण्यांचा पुर्व इतिहासावर प्रकाश टाकणे आवश्यक आहे.*

### ४.१ दाभाडे घराणे

*पेशवाईच्या काळात मराठा साम्राज्याच्या विस्तार करण्यासाठी काही मराठा सरदारांनी महत्वपुर्ण योगदान दिले. त्यात मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, रघूजी भोसले, पिलाजी*

गायकवाड, इत्यादीचा समावेश होता. अशा मराठा सरदारांपैकी एक सरदार म्हणजे खंडेराव दाभाडे होय. खंडेराव दाभाडें यांचे पुर्वज पुण्यापासुन ६०-७० मैलावर असलेल्या तळेगाव येथे राहत. त्यांच्या वंशातील येसजी नांवाचा पाटील शिवाजी महाराजांजवळ सेवेत होता.[१] कालांतराने छत्रपती राजाराम महाराज यांनी येसजी बिन बजाजी यास तळेगाव इनाम करुन दिला.[२] येसजी बिन बजाजी यांचा पुत्र खंडेराव दाभाडे.[३] त्यांनी राजाराम महाराज संकटात असतांना राजाराम महाराजाला मदत केली. परिणामी राजाराम महाराज यांनी खंडेरावास सेनाधुरंधर हे पद दिले.[४] शिवाय खानदेश व गुजरात प्रांताची जबाबदारी त्यांच्यावर सोपविली. कालांतराने १९ ऑक्टोंबर १६९८ रोजी खंडेराव दाभाडे यास प्रांत जुन्नर सरकार यातील ७९५ गावांचे सरपाटीलकी दिली. म्हणजे जुन्नरपासुन तर नीरथडीपर्यंतच्या प्रदेशाचे वतन वंशपरंपरेने इनाम करुन दिले.[५] यानंतरच्या काळात खंडेराव यांनी मराठा सत्तेच्या प्रसारासाठी खुप प्रयत्न केले.

मराठा स्वातंत्र युध्द काळात महाराणी ताराबाईच्या कारकिर्दीत धनाजी जाधव यांनी नर्मदेच्या उत्तरेला ज्या स्वाऱ्या केल्यात त्यात खंडेराव दाभाडे यांचा सहभाग होता. तसेच इ. स. १७१५ च्या एप्रिल महिन्यात खंडेराव दाभाडे व कान्होजी भोसले यांनी तिस हजार सैन्यासह नर्मदा ओलांडून माळव्यात प्रवेश केला.[७] यावेळी त्यांनी उज्जैन जवळची गावे लुटून देपाळपुरचा विध्वंस केला.[८]

खंडेराव दाभाडे यांचे खरे क्षेत्र खानदेश, बागलाण व गुजरात प्रांत होते. छत्रपती शाहु यांनी खंडेराव दाभाडे यांना जेव्हा बागलाण प्रांत हस्तगत करण्याचा आदेश दिला. तेव्हा खंडेराव यांनी ती कामगीरी योग्यरित्या पार पाडली. त्यानंतर दाभाडे यांनी अनेक स्वाऱ्याकरुन बागलाणमधुन चौथाई वसूल केली. त्यामूळे सुरत ते बुरहानपुर प्रांतात त्यांचे वर्चस्व प्रस्थापित झाले होते. मराठयांचे हे वर्चस्व मोगल सुभेदार सय्यद हुसेन अली यास सहन होत नव्हते. परिणामी त्यांने आपला दिवान हुकूमसिंग व चंद्रसेन जाधव यास खंडेराव यांचा बंदोबस्त करण्यासाठी पाठविले. मात्र २४ एप्रिल १७१७ रोजी खंडेराव दाभाडे व निबांळकर यांनी त्यांना पराभूत केले.[९] त्यानंतरच्या काळात खंडेराव दाभाडे यांनी सुरत अठावीशी पर्यंत आपले वर्चस्व प्रस्थापीत केले.[१०]

खंडेराव दाभाडे यांच्या गुजरात मध्यील पराक्रमामुळे छत्रपती शाहु यांनी ११ जानेवारी १७१७ रोजी खंडेराव यास आपला सेनापती नियुक्त केले. शिवाय गुजरात काठीयावाड मध्ये खंडणी वसुलीचे अधिकारी दिले.[११] त्यानंतर खंडेराव दाभाडे महाराष्ट्राच्या सिमा भागात राहून गुजरात, वऱ्हाड व खानदेश या तीन प्रदेशाना मधूनमधून शह देत असे.[११] असा पराक्रमी मराठा सरदार शेवटच्या पाचसहा वर्ष पोटसुळाच्या आजाराने अस्वस्थ होते. तेव्हां त्यांचे तिघे पुत्रे व मातोश्री प्रत्येक जन कारभारी होऊ लागले. याकाळात बाजीराव पेशवा यांचे वर्चस्व शाहूच्या दरबारात वाढू लागले. पेशव्यांचे दरबारातील वर्चस्व इतर सरदारांप्रमाणे खंडेराव यानांही मान्य नव्हते. त्यातुन बाजीरावास सहकार्य न करण्यांचे धोरण दाभाडे यांनी ठेवले. परिणामी अनेक वेळा शाहू महाराजांना त्याची कानउघाडणी करावा लागली. खंडेराव दाभाडे पेशव्याना सहकार्य करत नाही असे दिसताच छत्रपती शाहु यांनी दाभाडे यांना साताऱ्यास बोलाविले. मात्र खंडेराव यावेळी स्वत: विवंचनेत होता.[१२] परीणामी त्याने शाहु महाराजांना निरोप पाठविला की, "बोलणे करण्यास मानस पाठविलो. आपले विचारविरहीत आमचे विचार नाही. तुम्ही प्रसंगी असले म्हणजे आम्ही आहो: परस्परे एकमेकांचे न्युन न दाखविणे यातच लौकीक आहे."[१३]

अशा आशयाचे पत्र पाठवून खंडेराव दाभाडे साताऱ्यास आले नाही. त्यानंतर २७ सप्टेंबर १७२९ रोजी खंडेरावचा मत्यू झाला.[१४] खंडेराव हे मुतखडयाच्या आजाराने मृत्यू पावले.[१५] खंडेराव यांच्या मृत्यू नंतर थोरला पुत्र त्रिंबकराव याला सेनापती पदाची वस्त्रे दिली.[१६] मात्र खंडेराव दाभाडे यांच्या मृत्यूनंतर त्रिंबकराव दाभाडे व पेशवा बाजीराव यांच्यात मतभेदास सुरुवात झाली. कारण त्रिबकरराव दाभाडे व गायकवाड यांनी पेशव्याला सहकार्य करण्या ऐवजी विरोध करण्यास सुरुवात केली. त्यामुळे एकमेकांविषयी मने कलुषित होत गेली.[१७] त्यातुन पेशवा व दाभाडे यांच्यात शत्रुत्व येऊन त्यातुन डभईचा संघर्ष निर्माण झाला. त्या संघर्षाचा आढावा घेण्यापुर्वी मोगलांचे गुजरात विषयक धोरण्याचा आढावा घेणे आवश्यक ठरते.

## ४.२ मोगलांचे गुजरातविषायक धोरण :

भारताच्या समृध्द प्रदेशात म्रजरात प्रदेशाचा समावेश होता. त्यामुळे मोगल बादशाहानी त्याप्रदेशाकडे लक्ष केंद्रित केले. मोगल बादशहा अकबर यांनी गुजरात प्रांत जिंकला. त्यानंतर गुजरात प्रांताचा सुभेदार म्हणून तोडरमल यांची नेमणूक केली. यांनतरच्या काळात गुजरात प्रदेशाकडे मोगल सम्राटाने विशेष लक्ष दिले. त्यानंतर मोगल बादशाहीच्या अस्तापर्यंत गुजरात सुभेदारीची मालीका सुरु होती. इ. स. १७०८ मध्ये गाजीउद्दीन हा गुजरातचा सुभेदार होता. मात्र इ. स. १७११ मध्ये गाजीउद्दीन मृत्यू पावला असता गुजरातच्या सुभेदारपदी मोगल बादशाहानी अमानतखानाची नेमणूक केली. याच दरम्यान मराठयांनी गुजरात प्रांतावर आक्रमण केले. परंतू मोगली सैन्यांनी त्यांचा अंकलेश्वर येथे पराभव केला.[१८]

याकाळात गुजरात प्रांतावर खंडेराव दाभाडे व पिलाजी गायकवाड यांनी आक्रमणे करुन महानदीच्या तटापर्यंत जाऊन चौथाईची खंडणी लागु केली.[१९] त्यांनी सुरत आठविशिपर्यंत आपले वर्चस्व निर्माण केले होते. गुजरातच्या काही भागातून खंडणी लागु करुन ती त्यांनी वसुलीही केली.[२०] गायकवाड व दाभाडे यांच्या स्वाऱ्यांमुळे मोगल बादशहा अस्वस्थ झाला. परिणामी मराठयांचा बंदोबस्त करण्यासाठी बादशहाने सरबुलंदखान यांची नेमणूक गुजरात प्रदेशाच्या सुभेदारपदी केली. यावेळी मोगल बादशाहा यांनी सरबुलंदखान यास काबुलहून बदलून मुद्दाम गुजरात मध्ये आणले.[२१] सरबुलंदखान हुशार व थोर घराण्यांतला असुन मोगल बादशाहा फरुखशियरचा मामा होता.[२२] बादशाहाने त्यांची सन १७१३ मध्ये अयोध्याचा सुभेदार म्हणून नेमणूक केली होती. कालांतराने इ. स. १७१६ मध्ये त्यांची बदली बिहारच्या सुभ्यावर करण्यांत आली.[२३] मात्र दिल्ली दरबारात सय्यद बंधूंचे वर्चस्व निर्माण झाल्यामुळे मोगल बादशाहा संकटात सापडला. तेव्हां सरबुलंदखान यास बादशाहानी दिल्लीला बोलावून घेतले. मात्र दिल्लीला आलेला सरबुलंदखान सय्यद बंधूना विरोध करु शकला नाही. उलट परिणाम असा झाला की सरबुलंदखान यांची संपत्ती खल्लास झाली. त्यानंतर इ.स.१७१९ मध्ये मोगल सम्राटाने सरबुलंदखान यास काबुलच्या सुभ्यावर पाठविले.[२४] परंतू दक्षिणेस निजाम उल-मल्क बादशाहाच्या विरोधी कारवाया करत असल्याचे दिसताच निजामकडून गुजरात प्रांताचा कारभार काढला व सरबुलंदखानाची गुजरात प्रांताच्या सुभेदार म्हणून नेमणूक

केली.[२५] सरबुलंदखान यांची नेमणूक मार्च १७२५ मध्ये झाली असली तरी गुजरात मध्ये येण्यास त्यास डिसेंबर महिना उजाडला.[२५अ] त्यानंतर इ.स.१७२५ ते १७३० या कालावधीत सरबुलंदखान मोगलांच्या वतीने गुजरात प्रातांचा सुभेदार होता.[२६]

### ४.२.१ मोगल व मराठा संघर्ष :

इ. स. १७२५ मध्ये सरबुलंदखानाची नेमणूक गुजरात प्रांतावर झाली असली तरी त्यास गुजरात मध्ये येण्यास विलंब लागणार होता. परीणामी त्यांने आपल्या वतीने सुजायतखान यास आपला दुय्यम अधिकारी नेमुन गुजरात प्रांताचा कारभार सांगीतला. सरबुलंदखान सुभेदार बनल्यानंतरही निजाम-उल-मुल्क यांने आपला मामा हमीदखान यास गुजरात न सोडण्याचा कानमंत्र दिला.[२७] यावेळी छत्रपती शाहु महाराजांच्या वतीने मराठा सरदार कंठाजी कदमबांडे माळव्यात मुलूखगिरी करीत होता. निजामाचा मामा हमीदखान यास कंठाजी कदमबांडेची मदत होती. अशा स्थितीत हमीदखान यांनी अहमदाबनजीक सुजायतखानावर हल्ला चढविला असता सुजायतखान मारला गेला.[२८] तेव्हां रुस्तमअली या सुजायतखानाच्या भावाने मोहिमेची जबाबदारी स्वत:कडे घेतली. हमीदखानाचा सुड घेण्यांयाठी रुस्तमअली यांने मराठा सरदार पिलाजी गायकवाड यांची मदत घेतली. त्या मोबदल्यात त्यास, एक लाख रुपये रोख, एक हती व गुजरातची चौथाई देऊ केली.[२९] रुस्तमअली यांने पिलाजी गायकवाड या मराठा सरदाराची मदत घेतल्यामुळे कंठाजी कदमबांडे व पिलाजी गायकवाड हे दोन मराठा सरदार समोरासमोर उभे ठाकले. त्यातुन इ.स. १७२५ च्या फेब्रुवारी महिन्यात संघर्ष होवून पिलाजी गायकवाडला विजय मिळाला. परंतू याचवेळी ७० हजार सैन्यासह उदाजी पवार व सोमवंशी हमीदखानाच्या मदतीला गुजरात मध्ये आले.[३०] गुजरात मध्ये आल्या आल्या त्यांनी पिलाजी गायकवाड व कंठाजी कदमबांडे यांना शाहू महाराजांच्या विचारांची आठवण करुन दिली. परिणामी मराठा व रुस्तमअली यांच्यात संघर्ष सूरु झाला. जवळ जवळ १५ दिवस आदास, करमसद, नापाडा इत्यादी ठिकाणी त्यांच्यात चकमकी झाल्या. त्यातच २१ फेब्रुवारी १७२५ रोजी झालेल्या संघर्षात रुस्तमअली मारला गेला.[३१]

मोगल सरदारांच्या अशा आपसी मतभेदाचा फायदा घेऊन गुजरात वर आपले वर्चस्व निर्माण करावे असे पिलाजी गायकवाड व कंठाजी कदमबांडे यांना वाटत होते. नव्हे तर तसा विचार त्यांचा होता. म्हणून ते कधी मोगलांविरुध्द तर कधी आपसात लढत राहीले. परीणामी इ. स. १७२४ मध्ये पिलाजी गायकवाड व कंठाजी कदमबांडे यांच्यात खंबायत येथे युध्द झाले. त्या युध्दात पिलाजी गायकवाड पराभूत झाला व मातर या गावी निघुन गेला.[३२]

### ४.२.२ सरबुलंदखान- मराठा संघर्ष :-

मराठा सरदारानी आपल्या पराक्रमाने गुजरात मध्ये आपले वर्चस्व निर्माण केले. तेव्हा पिलाजी गायकवाड व कंठाजी कदमबांडे या दोघांच्या मदती शिवाय गुजरात प्रांतावर आपले वर्चस्व निर्माण होणार नाही हे ओळखुन हमीदखानाने या दोन सरदारांना चौथाईची वाटणी करुन दिली. त्यानुसार पिलाजी गायकवाड यास महानदीच्या दक्षिणेतील बडोदा, बाडनेर, भडोच व सुरत येथील दंडवसुलीचा हक्क दिला. तर महानदीच्या उत्तरेकडील प्रांताच्या चौथाईचा हक्क कदमबांडे यास दिला.[३३] शिवाय यावेळी उदाजी पवार, सोमवंशी यांना सुध, तळ, निकडवाड, झालोद व पटोलीया या परगण्याची चौथाई मिळाली.[३४]

अशा प्रकारे गुजरात प्रातांची वाटणी झाल्यामुळे पेशव्याचे हितसंबंध गुजरात मध्ये गुंतले गेले. मात्र पेशव्यांचे गुजरात मधील वर्चस्व त्रिंबकराव दाभाडे व पिलाजी गायकवाड यांना आवडले नाही. त्यामुळे पेशवा व दाभाडे यांच्यात मतभेदास सुरुवात झाली. तसेच हमीदखानाच्या सहाय्याने मराठयांनी गुजरात प्रांतावर वर्चस्व निर्माण केल्यामुळे दिल्लीचा मोगल बादशाहा अस्वस्थ झाला. शिवाय याचवेळी आपल्या अधिकाऱ्याचा पराभव झाल्याने मार्च १७२५ मध्ये सरबुलंदखान गुजरातकडे ससैन्य निघाला. यावेळी पैशाची व फौजेची भरपुर मदत मोगल बादशाहाने सरबुदंखानास दिली. ५,००,०००/- रुपये रोख दिले व ५०,०००/- रुपये मागाहून पाठविण्यांचे कबुल केले. शिवाय सय्यद बंधूच्या कूटूंबातले बरेचसे व्यक्ती व त्यांचे सहकारी जे कैदेत होते त्यांना मुक्त करुन सरबुलंदखानाच्या मदतीस दिले.[३५] सरबुलंदखान गुजरात मध्ये येत आहे असे दिसतात हमीदखानाला स्वत:च्या संरक्षणाची काळजी वाटू लागली. त्यामुळे हमीदखानाने माघार घेण्यांस

सुरुवात केली. भितीपोटी त्याने डिसें. १७२५ मध्ये अहमदाबाद सरबुलदंखानाच्या हवाली केले.[३६] परंतू इतरत्र कुठे कुठे हमीदखानाने सरबुलंदखानाला विरोध केला. अशाप्रकारे सरबुलंदखानाचे अहमदाबादवर वर्चस्व प्रस्थापित झाले. त्यावेळी मराठे कपडवंज येथे एकत्र आले होते. तेव्हा मराठयांच्या बंदोबस्तासाठी खानाने मोठा तोफखाना रवाना केला. परीणामी मराठा व सरबुलंदखान यांच्या सैन्यात संघर्ष निर्माण झाला. त्या संघर्षात मराठे सोजीत्रा व कपडवंज येथे पराभुत झाले व मराठे मागे सरकत सरकत छोटा उदेपुर येथे आले.[३७] परीणामी गायकवाड व कदमबांडे संकटात सापडले. अशासंकट समयी छत्रपती शाहु महाराजांच्या वतीने अंताजी भास्कर नावाचा नवीन सरदार प्रचंड सैन्यासह त्यांच्या मदतीस आला.[३८] तेव्हा कंठाजी कदमबांडे यांनी त्यांच्या मदतीने वडनगरावर आक्रमण करुन ते धुळीस मिळविले.[३९] परंतू वडनगराच्या नगर शेटाने चार लाख खंडणी भरुन आपला तात्पुरता बचाव केला.[४०] असे असले तरी मराठयांनी सरबुलंदरखानाचा पिच्छा सोडला नाही. कंठाजी कदमबांडे व पिलाजी गायकवाड यांनी तर गुजरात वर हल्ला करण्यांची धमकी दिली. यावेळी सरबुदलंदखानची स्थिती कमकुवत असल्यामुळे त्यांने बाजीराव पेशव्यांच्या प्रतिनिधी सोबत एप्रिल १७२६ मध्ये तडजोड केली. त्यानुसार सरबुदलंदखान यांनी पेशवा बाजीरावाला कर वसुलीचा अधिकार देवू केले.[४१] मात्र गुजराथ प्रांताची चौथाई व सरदेशमुखी चे अधिकार शाहु महाराजांने गुजरातमधील आपल्या सरदाराना देवून गुजरात मध्ये शांतता प्रस्थापित करावी अशी अट घातली.[४२] मात्र या अटीमुळेच गुजरात प्रदेशात मोकसावरुन गोंधळाची स्थिती निर्माण होवून पेशवा व सेनापती यांच्यात वैमनस्य निर्माण झाले.

पेशवा बाजीराव यांच्या सैन्याच्या माऱ्यामुळे त्रस्त झालेल्या सरबुलंदखानाने हमीदखाना प्रमाणेच मराठयांना चौथाई हक्क देण्यांचे मान्य केले. कंठाजीला महीनदीच्या उत्तरेकडचा व पिलाजी यास महीनदीच्या दक्षिणे कडील प्रांत दिला होता. यावेळी सरबुलंदखानाने तोच हक्क छत्रपती व पेशव्यांनाही दिला.[४४] असे असले तरी त्यानंतरच्या काळात मराठे व सरबुलंदखान यांच्यात संघर्ष सुरु राहीला. पिलाजी गायकवाड यांनी खंबायत व सुरत या शहरांवर आक्रमण करुन ती दोन्ही शहरे लुटली. सरबुलंदखान हा मराठयांच्या अशा स्वाऱ्यांमुळे त्रस्त झाला होता. त्यामुळे मराठयांना चौथाईचे हक्क देण्याचे मान्य केले. सरबुदंखानाने मान्य केलेल्या चौथाई व सरदेशमुखीचे वर्णन

करणारे एक पत्र शाहु महाराजांनी दि.२३/४/१७२६ रोजी कंठाजी कदमबांडे व गायकवाड यास लिहीले. 'तुम्ही प्रांत मजकुराचा चौथाईच आकार होईल त्यापैकी बाबती वजा करुन राहीला. ऐवज मोकासाबब निम्मे चिमनाजी बल्लाळ यांजकडे व निम्मे त्रिंबकराव दाभाडे याचकडे पाठवावे. तरी तुम्ही त्याचप्रमाणे उपसर्ग न करणे.'[४५] या संदर्भात पेशवे दप्तरात एक पत्र आहे, त्यातील मजकुर पुढील प्रमाणे,

'वींनती उपरी महुणबारे फरेच XX

री सेनाखासखेलीकडे आहे म्हणून ची

ठी  पाठवीली त्यास नीमे त्रींबकराऊ

सेनाखासखेल नीमे चीमाजी बलाल याकडे आहे,

तरी सनदेत नीमे करुन देणे रां भास्कर बावाची चीठी पाठवीले आहे.

दोघाकडे बार नीमे नीमे करुन  सनदेत भरुन

देवाजी नवीच दुईलावावीशी नाही हे विंनती.[४५अ]

शाहू महाराजांनी गुजरात प्रांताची मोकाशाची वाटणी चिमाजी आप्पा व दाभाडे या दोघात केली. परंतू त्यामुळेच गुजरात मध्ये संघर्षमय स्थिती निर्माण झाली.

अशाप्रकारे आज्ञा पत्रे शाहु महाराजांने पाठविल्याने चिमाजी आप्पाचे समाधान झाले. याउलट सेनापती त्रिंबकराव दाभाडे असंतुष्ट झाला. संपुर्ण गुजरात प्रांत छत्रपतीच्या आज्ञेप्रमाणे खंडेराव दाभाडे यांच्या काळापासुन त्यांच्या कडे चालत आला होता. त्रिंबकराव त्याच हक्काने गुजरात प्रांताचा कारभार पाहत होता. त्यामुळे गुजरात प्रातांत चिमाजी आप्पा काय किंवा पेशवा बाजीराव काय कुणाचीच भागीदारी त्यास नको होती.[४६] हा विचारच पेशवा व दाभाडे यांच्यातील संघर्षास कारणीभूत ठरला.

## ४.३ चिमाजी आप्पाची गुजरात मोहीम.

सरबुलंद खाने मराठयांना काही सवलती दिल्या असल्या तरी पावसाळा संपल्यानंतर दसऱ्याच्या मुहूर्तावर पुन्हा मराठा सरदारांची आक्रमणे सुरु झालीत. कदमबांडे मिळालेल्या प्रदेशातुन

चौथाई वसुल करण्यासाठी कडो विजापुरवर तर पिलाजी गायकवाड दक्षिण गुजरातेस त्यांच्या प्रदेशात चौथई वसुली करण्यासाठी गेला. याचकाळात पेशवा बाजीरावाने उदाजी पवार ला आपला हक्क बजावण्यासाठी गुजरात मध्ये पाठविले.[४७] त्यामुळे गुजरातमध्ये गोंधळाची स्थिती निर्माण झ ाली. बाजीराव पेशव्याने उदाजी पवार यास गुजरातमध्ये पाठविल्याने पिलाजी गायकवाड व कंठाजी कदमबांडे असंतुष्ट झाले. परिणामी पिलाजी गायकवाड व उदाजी पवार यांच्यात मतभेद निर्माण होऊन त्याच्यात डभई येथे संघर्ष झाला. त्यात पिलाजी गायकवाड पराभुत झाला असता कंठाजी कदमबांडे लोनावडाहुन गायकवाड यांच्या मदतीस धावून आला.[४८] गायकवाड व कदमबांडे यांच्या संयुक्त सैन्याने उदाजी पवाराचा पराभव केला. परीणामी पराभूत झालेल्या उदाजी पवार यास गुजरातमधुन माघार घ्यावी लागली.[४९] ही वार्ता पेशवा बाजीरावास समजताच तो संतप्त झाला. वास्तविक यावेळी छत्रपतीवर नाराज व्हावे अशी बाजीरावाची अजिबात इच्छा नव्हती. मात्र अचानकपणे ३१ जुलै १७२७ रोजी उत्साहाच्या भरात छत्रपती शाहू यांनी गुजरातेमधील चिमाजी आप्पांच्या नावे दिलेला निम्मा मोकासा काढून संपुर्ण गुजरातचा मोकासा दाभाडे यास परत दिला.[५०] शाहु महाराजांनी हा निणर्य का घेतला ते स्पष्ट होत नाही. परंतू दाभाडे यांचे सरदार पुन: पुन: उच्छाद मांडू लागल्यामुळे छत्रपतीने हा निर्णय घेतला असावा. मात्र त्यांच्या या धोरणामुळे पेशवा बाजीराव व चिमाजी आप्पा अल्पकाळ दुखावले गेले.[५१]

वास्तविक पाहता यानंतर दाभाडे यांनी संतूष्ट व्हावयास पाहीजे होते. कारण ३१ जुलै १७२७ रोजी त्रिंबकराव दाभाडे व पेशवा बाजीराव, चिमाजी आप्पा यांच्यातील मतभेद मिटविण्यासाठी छत्रपतीने गुजरातचा चिमाजी आप्पाचा अर्धा मोकासा काढून संपुर्ण गुजरात प्रांत दाभडयांना दिला. तरी त्यांने पेशव्याच्या प्रदेशावर आक्रमण केले. एवढेच नाही तर माळव्यात जाऊन लुट केली.[५२] पेशवा यांच्या प्रभावाखालील प्रदेशात दाभाडे यांनी हस्तक्षेप करुन खंडण्या वसुल केल्या.[५३] छत्रपती शाहु महाराज यांना ही बातमी समजली तेव्हा त्यांनी त्रिंबकराव दाभाडे यांना दम भरणारे पत्र पाठविले. 'तुम्हास माळवे प्रांती जाऊन धामधुम करुन पैका घ्यावयास, मुलुख खराब करावयास गरज काय? या उपर तुम्ही पैका घेतला आहे, तो बाजीराव पंडीत याचकडे फिरावून देणे. या उपर माळवे प्रांती उपसर्ग न देणे, फिरोन बोभाटा होऊ न देणे.'[५४] छत्रपतीचे असे आदेश

असताना सुध्दा सेनापती खंडेराव दाभाडे यांचा पुत्र त्रिंबकराव पेशव्यांची सत्ता न मानता फटकून वागत असे.[५५] तेव्हां चिमाजी आप्पा संतापला व त्यांनी त्याचा वचपा काढण्याचे ठरविले.[५६]

बाजीराव पेशवा यावेळी माळवा व बुंदेलखंडाच्या मोहिमेवर होते. त्यांने चिमाजी आप्पास गुजरात मोहीमेवर पाठविण्याचा निणर्य घेतला. या मोहीमेचा बाजीरावाचां उदेश स्पष्ट होता. उत्तर गुजरातचा प्रदेश जिंकूण घेणे व आपला अधिकार निर्विवाद प्रस्थापित करणे. कारण दाभाडे यांना सरबुलंदखान काही आपटेना व चिमाजी आप्पा गुजरात मध्ये आलेला खपेना. तेव्हां पेशवा बाजीरावाने मराठयांचे हित संबंध धोक्यात येत असतांना काय उघडया डोळयांनी पहावे.[५८] परिणामी मराठयांचे हितसंबंध टिकवून ठेवण्यासाठी डिसेंबर १७२९ मध्ये चिमाजी आप्पास गुजरात मोहिमेवर पाठविले. २३ डिसेंबर १७२९ रोजी चिमाजी आप्पांने नर्मदा नदी ओलांडली.[५६अ] त्यानंतर १ जानेवारी १७३० रोजी चिमाजी आप्पांने पावागड वर हल्ला चढविला व ६ जानेवारी १७३० रोजी चिमाजी आप्पा यांनी पावगड जिंकूणही घेतले.[५९] पावागड हे कंठाजी कदमबांडे यांचे केन्द्र होते. यानंतर बासवाडा, झालोद, दाहोद यामार्गाने चिमाजी मोठया आवेशाने सरबुलंदखानास शह देण्यासाठी गेला. यावेळी चाहोद, चंपानेर इत्यादी स्थळे चिमाजी आप्पाने कब्जात घेतली.[६०] एका मागोमाग प्रदेश लुटीत खंडण्या वसुल करीत चिमाजी पेटलादपर्यंत पोहोचला व तेथे पेशवा बाजीरावाचा अंमल बसविला.[६१] त्याने पेटलाद व नाडीयाद जिल्हात प्रवेश करून लुटालूट केली तसेच कर वसूली केली..[६२] यावेळी चिमाजी आप्पा अहमदाबाद शहरावर चालुन गेला असता सरबुलंदखान कच्छच्या बाजुला होता. चिमाजी आप्पाने ही संघी साधून घोळका शहर जिंकले व ते नगर उध्वस्तही केले.[६३] यावेळी अतिशय कमी कालावधित आप्पांनी फार मोठया प्रांतावर वर्चस्व प्रस्थापित केले होते.

चिमाजी आप्पा गुजरात मध्ये शहरे जिंकत असताना त्यांने सरबुलंदखान यास धमकी दिली. 'चौथाई कबुल करा अन्यथा अहमदाबादेवर हला चढवितो.' बाजीराव पेशवा यांनेही खानास निरोप पाठविला की, 'चौथाई सरदेशमुखी हक द्याल तरच आमची फौज माघार घेईल.[६४] यावेळी ढोलका येथे असतांनाच चिमाजी आप्पाने गुजरातचा सुभेदार सरबुलंदखानास आपल्या मागणीचे निवेदन पाठविले. यावेळी सरबुंलंदखानाची स्थिती अतिशय नाजुक होती. कारण त्यांच्या बद्दल मोगल सम्राटाला सहानुभूतीही राहीली नव्हती. शिवाय दिल्लीहून मदत मिळण्याची शक्यता दिसत नव्हती.

तसेच गुजरातमध्ये सरबुलंदखानाची बदली होणार व सरबुलंदखान ऐवजी अभयसिंह यास सुभेदारी मिळणार अशा अफवा पसरल्या होत्या. अशा स्थितीत सरबुलंदखानाने मराठयांशी तडजोड करण्याचे ठरविले. प्रारंभी त्रिंबकराव दाभाडे, पिलाजी गायकवाड, कंठाजी कदमबांडे यांच्याशी संपर्क साधून त्यांना चौथाई देण्याचे कबुल करुन तहाची बोलणी केली. मात्र त्यांनी खानास प्रतिसाद दिला नाही. तेव्हा चिमाजी आप्पाशी सरबुलंदखानाने बोलणी सुरु केली. पण चिमाजी आप्पा व सरबुलंदखान यांच्यात तडजोड होत नव्हती. यावेळी चिमाजी आप्पाने बाजीरावास पत्र लिहिले. त्यात चिमाजी आप्पाने आपली भूमीका स्पष्ट केली आहे. 'सरबुलंदखान आम्हांस सर्व गुजरात प्रांताची चौथाई व सरदेशमुखी देण्यास कबुल असेल तरच आम्ही त्याच्या मुलूखाचे सैन्य ठेवून रक्षण करु.[६५] अशा स्थितीत सरबुंदेलखानाने मराठयांशी सलोखा प्रस्थापित करण्यासाठी हमीदखानाने मराठयांशी पुर्वी केलेल्या तह रद्द करुन गुजरात मध्ये पेशव्यांना झुकते माप देण्याची तयारी दर्शविली. परंतू त्यामुळे कंठाजी कदमबांडे व गायकवाड संतप्त होऊन मराठयांमध्ये यादवी निर्माण होण्याचा धोका निर्माण झाला.[६६] अशावेळी ८ जुलै १७३० रोजी चिमाजी आप्पा व सरबुलंदखान यांच्यात तह झाला.[६७]

तहाच्या अटी :-

गुजरात प्रांतातील एकंदर परिस्थिती पाहून सरबुलंदखान याने चिमाजी आप्पासोबत २३ मार्च १७३० रोजी एक तह केला.[६८] या तहाची सनद पेशव्याचा वकील शामराव यांच्या मार्फत पाठविली. तहाच्या अटी खालील प्रमाणे होत्या.

१ ) सुरत शहर खेरीज करून सर्व गुजरात प्रांताच्या चौथाई, सरदेशमुखीचे हक्क छत्रपती शाहू महाराजास दिले.

२) अहमदाबाद शहराच्या उत्पन्नांवर पाच टक्के कर मराठयांनी घ्यावा.

३) २५०० सैनिक मराठ्याने मोगलांच्या मुलुखात ठेऊन प्रदेशाचे बंदोबस्त करावे.

( ही जबाबदारी चिमाजी आप्पाने पेशव्यांच्या वतीने स्विकारली होती.)

हा तह म्हणजे बाजीराव व चिमाजी आप्पा यांचा मोठा विजय होता. या तहामुळे संपुर्ण गुजरात प्रांतावर बाजीरावाचा अधिकार प्रस्थापित झाला. परंतू त्यामुळे दाभाडे व पेशवा यांच्यात शत्रूत्व निर्माण झाले. या विषयी प्रा. पुराणिक म्हणतात. 'दाभाडयाच्या पराक्रमा मुळे संतुष्ट होवुन

शाहुने चिमाजीचा अर्ध माकोसा रद्द करुन सारीच्या सारी गुजरात दाभाडयाला दिल्याबरोबर संतापलेल्या बाजीरावाने आणि चिमाजीनेही सरबुलंदखानाला जेर करुन पुन्हा निम्मीच काय, पण सारी गुजरात आपल्या नावावर करुन घेतली. यात व्यापक हितापेक्षाही, गुजरातच्या चौथाईचा लाभ व त्याहीपेक्षा दाभाड्यावर कुरघोडी करण्याची ईर्ष्या बाजीरावाच्या मनात बसली आणी पुढे जो दाभाडे व बाजीराव यांच्यात संघर्ष झाला. त्यास हा गुजरातचा माकोसाच कारणीभुत ठरला.'[६९]

चिमाजी आप्पा व सरबुलंदखान यांच्यात झालेल्या तहामुळे पेशव्याचे गुजरात प्रांतात महत्व वाढले. याचे सर्व श्रेय चिमाजी आप्पानां जाते. या विजयाचे महत्व स्पष्ट करताना इतिहासकार बिरादार लिहीतात, 'हा चिमाजी आप्पाचा अमझेराच्या युध्दातील (इ.स.नोव्हे.१७२८) उल्लेखनीय विजयानंतरचा मिळवलेला प्रमुख तह मानल्या जातो.[७०] सरबुलंदखान पेशवा तहाच्या कलमामध्ये चौथच्या मोबदल्यात पेशव्याने गुजरात मध्ये शांतता सुव्यवस्था राखण्यासाठी मोगल सुभेदारास फौजेसह मदत करावा असे एक कलम होते. त्याचा गर्भितार्थ दाभाडयाच्या हस्तकांचा बंदोबस्त करण्यास मदत करणे असाच होता.[७१]

### ४.४ निजाम - दाभाडे कारस्थान.

चिमाजी आप्पा व सरबुलंदखान याच्याजी तहामुळे पेशवा बाजीराव यांचे गुजरातमध्दे वर्चस्व प्रस्थापित झाले. त्यामुळेच दाभाडे व बाजीराव पेशवा यांच्यात शत्रुंत्व निर्माण झाले. दाभाडे व बाजीराव पेशवा यांच्यात मतभेद सुरु असतांना सेनापतीच्या हातुन एक घोडचुक झाली. परिणामी दाभाडे शाहुच्या दरबारी सहानुभुती गमावून बसला. त्रिंबकरावने छत्रपती शाहुकडून कदाचित आपणास न्याय मिळणार नाही म्हणून निजामाशी गुप्तपणे संधान बांधुन कारस्थान रचले.[७२]

१) निजामाच्या सहाय्याने पेशवा बाजीरावाचा निकाल लावावयाचा.

२) साताऱ्याच्या छत्रपतीपदी छत्रपती शाहुऐवजी संभाजीस बसवावयाचे

३) स्वत:कडे सेनापतीपद ठेवून कंठाजीस सरलष्करपद व इतरांना बक्षिसे द्यावीत.

अशा प्रकारची बोलणी दाभाडे यांनी निजामाशी चालु केली.[७३] निजाम हा दाभाडे यांच्या या कटात सहजपणे सामील झाला. कारण पालखेड येथे निजामाचा बाजीरावाने पराभव

केला होता.त्यामूळे निजाम बाजीरावावर संतप्त झालेला होता. त्याला बाजीरावाला पराभुत करण्याची संधीच हवी होती. त्रिंबकरावाच्या मदतीने बाजीरावाचा बंदोबस्त केला तर दक्षिणेतील सहा सुभ्यावरील पेशव्याचे हक्क संपेल व दक्षिणेवर आपले वर्चस्व प्रस्थापित होईल. या विचाराने त्रिंबकराव दाभाडे यास निजामाने मदतीचे आश्वासन दिले.[७४] दुसरे कारण हे होते की.बाजीरावच्या माळवा व गुजरातच्या मागन्या निजामाला अवास्तव वाटत होत्या. आणि म्हणून दाभाडे यांना मदत केल्यास बाजीरावाचा नामोहरण होईल व आपले वर्चस्व निमार्ण होईल.[७४अ] यावेळी दाभाडे व निजाम यांनी बाजीरावाचा पराक्रमी सरदार उदाजी पवार यासही आपल्याकडे वळविले. पेशवा बाजीराव याने आपणास कामगीराचा योग्य मोबदला दिला नाही. तसेच गुजरात मधील उत्पन्नाचा योग्य वाटा दिला नाही. म्हणून उदाजी पवार नाराज होता. त्यामुळे तो निजाम व दाभाडे यांच्या कारस्थानात सहभागी झाला.[७५] दाभाडे यांच्या बरोबर पिलाजी गायकवाड हा फुटला. त्यानी कंठाजी कदमबांडे व उदाजी पवार यांना आपल्याकडे वळवून बाजीरावा विरुध्द उठविले.[७६] यावेळी प्रथमत: पेशवाच्या बंदोबस्त करुन नंतर दाभाडे यांचा सहज बंदोबस्त करता येईल असा निजामाचा बेत होता. निजामाचा धुर्तपणा दाभाडे यांच्या लक्षात आले नाही.[७७] यावेळी निजामाची भुमीका स्पष्ट होती की, 'गनिमाईत राहुन राजियास मोडून मग संभाजीस आणावे'.[७८] अशाप्रकारचा राजद्रोही निजामाचा डाव होता.[७९] तसेच चौथाई, सरदेशमुखीच्या हक्कावर मराठे प्रबळ होऊन देश काबीज करीत चालले व मराठेशाही बुडविण्याचा औरंगजेबाचा हेतू बाजुस राहुन उत्तरोत्तर मराठेच बादशाही बुडवू लागले. याचा निजामास विषाद वाटे. म्हणून चंद्रसेन जाधव, कोल्हापुरकर संभाजी व प्रतिनिधी यांना जसे त्याने फितविले तसे यावेळी दाभाडयास फितविले.[८०]

त्रिंबकराव यांच्या मातोश्री उमाबाई हया लढवया होत्या. बाजीरावाच्या सततच्या विजयामुळे शाहु महाराजाचे मन बाजीरावाकडेच वळले होते. सेनापती दाभाडे यांना सातारा दरबारात कवडीची किंमत नव्हती. अशावेळी आपण गप्प बसतो तर दाभाडे गुजरात मधुन हद्दपार होतील. म्हणून उमादेवीनेही निजामाशी बोलणी सुरु केली.[८१] तसेच उमाबाई दाभाडे देखील सेनापती पद संभाजी कडून मिळविण्याच्या प्रयत्नात आहे अशी बातमी बाजीराव पेशवा यांना समजली.[८२]

**शाहु महाराज यांचा दाभाडे प्रकरण समोपचाराने सोडविण्यांचा प्रयत्न..**

शाहुने हा प्रश्न समोपचाराने सोडविण्यांचा प्रयत्न केला. छत्रपती शाहु महाराजांना दाभाडे यांच्या कट कारस्थानाची माहिती समजल्यानंतर त्याने दाभाडे यास समजविण्या साठी पत्र पाठविले. हे पत्र दाभाडे यांना समजाविण्या बरोबरच दाभाडे यांची कानउघाडणी करणारेही पत्र होते. छत्रपती दाभाडे यांना लिहीतीत, 'तुम्ही साहेबांचे एकनिष्ठ कार्याचे हिंदू सेवक, यास्तव साहेब तुम्हांवरी बहुत सदयचिते कृपा करीत असत. हल्ली चित्तास विपर्यास आणून, दुसऱ्याचा आश्रा करुन, राज्याचा अपाय करावा, आपले एकनिष्ठतेस बोल लावून घ्यावा, यात फायदा काय! हे तुम्हा लोकांस उत्तम नव्हे.जे विश्वासघातकी स्वामीद्रोही जाले, त्याचा परिणाम कळतच आहे.साहेबाचे राज्यास कल्याण आणि स्वहित जन बरे म्हणे ऐसा मनसबा करणे.दिवसे दिवस तुमचे उर्जित होऊन साहेब संतोषी होत तो विचार करणे. पर राज्य साधे, साहेबांचा दाब बसे, ठाणी व जागो साध्य, होत,दृष्टांस नतीजापावे, ऐसा यत्न-उपाय करणे. तुम्ही साहेबांचे विश्वासू सेवक, इतबारी आदा आपला थोरपणास उचित ते स्वामी कार्य करुन साहेबांस संतोषवाल, हा भरंवसाच आहे, आमच्या स्वराज्यात रयतेस उपद्रव लागों न देणे. कोणी दृष्ट शत्रु लबाडी करतील, त्यास शासन करणे.[८२अ] छत्रपती शाहू महाराजांच्या या पत्रात दाभाडे हे एकनिष्ठ सेवक असल्याचे सांगत असतानाच दृष्ट निजामाशी मिळून राज्याविरूध्द कार्य न करण्याचा सल्ला दिला असे दिसते. मात्र त्रिंबकराव यांनी शाहूच्या सल्याकडे दूर्लक्ष केले. असे असताना सुध्दा छत्रपतीनी दाभाडेयांना संतूष्ट करण्यासाठी प्रयत्न चालविलेला दिसतो.

याच दरम्यांन गुजरात तंटाचे मुळ कारण गुजरात निम्मा मोकासा शाहु महाराजाने चिमाजीस दिला होता. तो असून दाभाडयास संतुष्ट करण्यांसाठी १५ डिसें. १७३० रोजी चिमाजी आप्पास दिलेला मोकासा काढून तो दाभाडे यास परत दिला. सोबतच 'तुम्ही प्रांत मजबुरी दाखलगीरी न करणे' असी ताकीद ही दिली. मात्र त्रिंबकरावाचे त्याने समाधान झाले नाही. त्याने उलट शाहू महाराजांकडे उत्तर पाठविले की, 'आम्ही आमच्या भुमीचा एक इंच ही देणार नाही. आमच्याने जी सेवा देता येईल ती देवू.[८४] त्रिंबकराव यांनी उघडपणे शाहू महाराज यांच्या विरूध्द भूमिका घेतली. दाभाडे यांची ही भूमिकाचा पेशवा व दाभाडे यांच्यातील संघर्षास काही प्रमाणात कारणीभूत ठरली.

## ४.५ दाभाडे प्रक्ररणात चिमाजी आप्पाची भुमीका.

गुजरात प्रशनावरुन दिवसेंदिवस बाजीराव व दाभाडे यांच्यात मतभेद वाढत गेले. यासंबंधी बिरादार म्हणतात, "चौथाई सरदेशमुखीच्या उत्पन्नाचा ठराविक भाग छत्रपती व पेशवा, प्रतिनिधी व पंत सचिव यांना सरदाराकडून पाठविला जात असे. त्या संबंधीचा काटेकोर हिशोब नंतरच्या काळात राहिला नाही. त्यामुळे आर्थीक अडचणी वाढतच गेल्यात मोकासा, बाबती, सरदेशमुखी वसुली सबंधी सोईपेक्षा गोंधळ व अव्यवस्था वाढविणारी ठरली."[८४अ]

याकाळात निजामाचा उच्छेद वाढत चालला होता तेव्हा चिमाजी अप्पा व बाजीराव सावधचिताने संकट निवारण्यास तयार झाले. परंतू शाहु महाराजांनी सामोपचाराने प्रश्न सोडविण्याचा सल्ला दिला. त्यांनी माणूस पाठवून दाभड्याची माहीती आणण्याचा विचार केला. तर माहिती मिळाली दाभाडे आहे तसेच आहे.[८५] छत्रपती शाहुने गुजरात दाभाड्याच्या हवाली करुन प्रश्न सोडवावा असे बाजीरावास सुचविले. तेव्हा पेशवा बाजीरावाने याविषयी चिमाजी आप्पाचा अभिप्राय विचारला. १२ नोंव्हेबर १७३० रोजी चिमाजी आप्पाने आपले उत्तर बाजीरावास कळविले.[८६] 'राजश्रीचा चिमाजीस गुजरातेच्या सनदा अथवा सहीचे पत्र करुन देऊन दाभडयांचा आपण कजिया लावला यैसा आर्थ आहे. यैसीयास सनदा अगर सहीची पत्रे दिल्ह आणि काही पैका मान्य करा यैसे म्हणू लागले, तर पैका मान्य करावा किंवा सनदा अगर साठीची पत्रे घ्यावी की, न घ्यावी याचा विचार लिहुन पाठवणे. [८७] म्हणून लिहले. ऐसीयास हंगाम वसुलाचा गेला, अगदी वसुल मुलकातील पिलाजीने घेतला. या करिता पैका मान्य करणे तो विचारे करुन थोडा बहुत करावा. वरवड वरवड दाभाडयानी कजिया केल्यानंतर आम्ही सांभाळतो., त्याची फिकीर आहे, यैसे नाही. परंतू ते निजामास जाऊन भेटले तर परिछिन्न त्याचा हुद्दा दूर करावा येवडी गोष्ट मात्र राजश्रीशी खरी करुन ठेवून सनदा करुन देतील त्या मान्य कराव्या.[८७] दाभाड्यांनी कब्जा केला तर आम्ही सांभाळतो, त्याची फिकीर बिलकुल नाही. पण जे जर निजामास जाऊन भेटले तर त्याचा हुद्दा परिच्छिन्न दूर करावा एवढी गोष्ट महाराजांपाशी ठरवून मग दाभाड्यांना गुजरातच्या सनदा द्यावा.[८८] माञा दिवसेंदिवस दाभाडे याचे वर्तन बाजीराव विरोधी बनत चालले होते. तेव्हा चिमाजी आप्पाने भुमिका घेतली. 'सिकेकटार सेनापती आपले हाती घेऊ लागले तर गुजरातचा मामला

दिल्याखेरीज होत नाही. फौजा रवाना करुन मुलुख पाळता घालावा म्हणजे डोळे उघडतील.'[८८अ] अर्थात दाभाडे यांच्या विषयी आप्पाने खंबीर भुमिका घेतली होती. त्यास काही प्रमाणात शाहू महाराज यांनी आप्पाचा जो मोकासा काढला होता तो कारणीभूत होता.

### ४.६ निजाम - मंहमदखान बंगष भेट.

दाभाडे यांच्यासोबत संगनमत करुन निजामाने बाजीराव यांची सत्ता उलथून पाडण्यांचे कारस्थान रचले होते. तो कट यशस्वी करण्यासाठी त्यानंतर निजामाने तयारी चालविली. बुंदेलखंडात बाजीरावाकडून पराभुत झालेल्या महंमदखान बंगष यावेळी माळव्याच्या सुभेदारपदी होता. त्यास निजामाने निरोप दिला की, 'पिलाजी गायकवाड व उदाजी पवार यांचे बाजीरावाशी वाकडे आले असुन ते मुसलमानांशी संगनमत करण्यास तयार आहेत. आपण सर्व एक झालो म्हणजे यश येण्यास विलंब लागणार नाही. आम्ही लवकरच नर्मदेवर येऊन तुम्हांस भेटतो.'[८९] डिसेंबर १७३० मध्ये मंहम्मद बंगष उज्जेनजवळ आला.[९०] तेव्हा निजामाच्या त्यांच्याशी संवाद साधण्याचा प्रयत्न होताच. तेव्हा निजाम लवकरच मंहम्मदखान बंगष यांच्या भेटीसाठी नर्मदेवर गेला. निजाम व बंगष यांची अकबरपुर येथे भेट झाली. बाजीरावा विरुध्द कसे लढावे याविषयी ते गंभीर चर्चा करतात. यावेळी १७ मार्च १७३१ ते १८ मार्च १७३१ ते दोघेही सोबत होते.[९१] त्यांच्यात यावेळी सविस्तर चर्चा झली. पेशव्या विरुध्द सेनापतीला मदत करण्याची निजामानी केलेली सुचना बंगष याने ताबडतोब मान्य केली.[९२] भेटी अंती निजाम दाभाडयांच्या सहाय्यास सुरतकडे निघाला तर बंगष परत उज्जैनकडे निघाला.[९३]

### ४.७ दाभाडे यांची युध्दाची तयारी .

सेनापती गुजरातच्या मुलखगिरीची व पेशव्यास माळव्याच्या मुलखगिरीची अशी वाटणी केली असता, बाजीरावाने सेनापतीशी बोलणे लावले की, 'गुजरातेतील महाल निम्मे तुम्ही आम्हांकडे द्यावे व माळव्यातील महाल आम्ही सर करु त्यातील निम्मे तुम्ही घ्यावे.'[९४] बाजीरावाच्या या मागणीस दाभाडेनी विरोध केला. दाभाडे यांनी बाजीरावास उत्तर पाठविले की, 'महाराजांनी तुम्हास

माळव्याची मोहीम व आम्हांस गुजरातची सांगितली. तुमचा कारभार तुम्ही करावा आमचा आम्ही करावा.[९५] यावेळी बाजीरावाचा प्रस्ताव दाभाडे यांनी साफ नाकारला.

सरबुलंदखान यांच्यां वरील विजयानंतर ८ जुलै १७३० रोजी चिमाजी आप्पा छ. शाहु यांना भेटले. तेव्हा दोघात भरपुर चर्चा झली. चर्चे अंती त्यांच्या लक्षात आले की, 'दाभाडे यांच्या हक्कावर गदा आली आहे याची पण खंत त्यांना त्यावेळी जाणवली. तेंव्हा त्यांनी कराची अंमलबजावनी करताना त्रिंबकराव यांना थोडी सुट दिली. चौथाई मोकासाच्या आणि सरदेशमुखीचा थोडा हिस्सा आणि वसुलीचा हक्क त्यांना दिला.[९६] मात्र तरीही दाभाडे संतुष्ट न होता पेशव्यांच्या प्रदेशावर हल्ले करु लागले त्यामुळे दाभाडे-पेशवा संघर्ष घडुन आला. याविषयी कृ. वा. पुरंदरे म्हणतात, "आपल्यावर सेनापतीने मात केलेली पाहुन पेशवा चिडला व परीणामांचा विचार न करता रणचंडीची आराधना करु लागला."[९७]

वास्तविक दाभाडे- बाजीराव यांच्यातील मतभेदास कर्नाटक मोहीमेत सुरुवात झाली. कर्नाटक मोहीमेत दाभाडे व पेशवे एकत्र होते त्यानंतर त्याच्यांत स्पर्धा निर्माण झाली. त्यातुन वैरनिर्माण झाले. यासंदर्भात कृ. वा. पुरंदरे म्हणतात- " पेशवे सेनापती हे एकत्र उद्योगच यांच्यातील वितुष्टात विशषेत: कारणीभुत ठरले. कारण त्यामुळे त्यांचे हितसंबध एकाच क्षेत्रास आले व सानिध्यामुळे भांडयाला भांडे लागुन त्यातुन व्देषाच्या ठिणग्या पडल्या व त्याचे पुढे डभईवर डोंब उठला."[९८]

चिमाजी आप्पा यांनी यावेळी घेतलेल्या आक्रमक भूमिकेची बातमी दाभाडे यास समजली. परिणामी त्याने बाजीरावाच्या हद्दीत उपद्रव देणे सुरु केले. शिवाय मराठयांचा शत्रू निजामाशी संधान बांधून पेशव्याला शह देण्याची तयारी सुरु केली.[९९] बाजीरावा पेशव्यांशी सामोपचाराची बोलणी संपली. तेव्हा दाभाडे यांनी छत्रपती शाहुच्या पक्षातील व बाजीराव पेशवाकडील माणसे फोडण्याचा उद्योग सुरु केला. यावेळी त्याने असे वर्तमान जाहीर केले की, "आमच्या राजाचे राज्य या ब्राम्हणाने (बाजीरावाने) घेतले असल्यामुळे सर्व मराठा सरदारांनी आमच्या निशाणाखाली जमावे."[१००] यावेळी अतिशय सावधगीरीने निजामही कारस्थान रचित होता. जे जे पेशवा बाजीरावाचे विरोधक होते

त्यांना आपल्या पक्षात ओढण्याचे धारेण त्यांने अंगिकारले. त्रिंबकराव दाभाडे व पिलाजी गायकवाड यांनी कंठाजी कदमबांडे व त्याचा बंधु रघूजी यांना आपल्याकडे अनुकूल केले.[१०१]

८ ऑक्टोंबर १७३० रोजी त्रिंबकराव दाभाडे तळेगावहुन निघाला. यावेळी त्याच्याजवळ १० हजार सैन्य होते. इंदुरी येथे मुक्काम करुन अश्विन शुध्द प्रतिपदेला त्याने खंडेराव दाभाडे यांचे वर्षश्राध्द केले.[१०२] त्यानंतर त्रिंबकराव दाभाडे नारायणगांव मार्गे गुजरात कडे रवाना झाला. संगमनेर येथे दाभाडे आला असता त्यास निजामाचा सरदार तुरुकताजखान भेटला. तेथून त्रिंबकराव गिरणा नदीवर आला. त्यानंतर चाळीसगावाजवळ त्रिंबकराव व निजामाची भेट झाली. यावेळी निजामाने सिन्नरचा देशमुख कुंवरबहादूर यास दाभडे यांच्या मदतीला दिले.[१०३] २६ मार्च १७३१ रोजी नर्मदापार करुन त्रिंबकराव कर्नाळ येथे आला.[१०४]

## ४.८ चिमाजी आप्पाची डभई मोहीम

दाभाडे यांनी जसे बाजीराव व छत्रपती शाहुचे माणसे फोडण्याचा प्रयत्न केला तसाच प्रयत्न पेशवा बाजीराव यांनी केला. आपाजी कवडे, भावसिंग ठोके मुदानेकर, दलपतराव ठोके आभोनेकर, बजाजी आटोळे, सिन्नरचा देशमुख कुंवर बहादूर इत्यादी दाभाडे याच्या पदरी असलेली मंडळी बाजीरावाने युक्तीने फोडली आणि त्याच्या मार्फत निजामाच्या व दाभाडे यांच्या प्रदेशात केवळ प्रलय उडवून दिला.[१०५] सरदेसाई यावर भाष्य करताना म्हणतात, "भेदनीतीचा प्रभाव निजामाने मराठी दरबारात चालवला, तेच हत्यार बाजीरावाने निजामशाहीत जास्त परिणामाने वापरुन दाखविले."[१०६] मात्र माळव्यातील निजामाच्या गतीरोधाविषयीची माहीती देण्यासाठी व त्यावर लक्ष देण्यासाठी बाजीरावाने मल्हारराव होळकर याची नेमणूक केली होती. होळकराने ही जबाबदारी अतिशय चोख बजाविली. होळकरानी निजाम बरोबर बंगष यांनाही त्रस्त केले.[१०७]

सरबुलंदखानाशी तह झाल्यानंतर चिमाजी आप्पा उंब्रज येथे जाऊन ८ जुलै १७३० रोजी शाहु महाराजास भेटला.[१०८] त्यावेळी सरबुलंदखानाने चौथाई व सरदेशममुखी मिळाल्याचा वृत्तांत दिला तेव्हा शाहु महाराज यांना आनंद झाला.[१०९] या भेटीत चिमाजी आप्पा व बाजीराव यांच्यात भावी राजकारणाची प्रदिर्घ चर्चा झाली.[११०] पेशवा बाजीरावही चिमाजी आप्पासोबत होता. जवळजवळ

महिना पंधरा दिवस शाहुची व त्यांची चर्चा होऊन पुढील योजना ठरली.[१११] ही मोहीम आप्पाच्या मोकासा वरून निर्माण झालेल्या पेचप्रंसग सोडविण्याच्या उदेशाने आयोजीत करण्यात आली असावी. पुराणीक या संदर्भात लिहीतात, "पेशवा बाजीराव व चिमाजी आप्पा यांचे बंधुप्रेम जगाप्रसिध्दच आहे. असे असले तरी त्यांचे राजकीय व प्रापंचिक हितसंबंध अगदी स्वतंत्र होते. बाजीरावाला माळवा होता तर चिमाजी आप्पाला गुजरातचा निमा मोकासा दिला होता. परिणामी गुजरात मधील घडामोडीकडे त्याच्या हितसंबधाच्या दृष्टीने लक्ष ठेवणे भागच होते. शिवाय चिमाजी आप्पाचे सामर्थ्य बाजीरावाच्या फाद्याचे असल्यामुळे, चिमाजी आप्पाच्या गुजरातमधील हितसंबंधाकडे दुर्लक्ष करणे परवडणारे नव्हते."[११२]

शाहू महाराजांच्या भेटीनंतर अतिशय गुप्तरीतीने चिमाजी आप्पा व बाजीराव यांनी पावसाळयात गुजरात मोहीमेची तयारी केली.[११३] यावेळी गुजरात मोहीमे विषयी छत्रपती शाहु महाराजाचा आदेश होता की, 'तुम्ही त्यामागे जाऊन सेनापती यास बुध्दिवाद करोन सांगोन येता बरोबर घेऊन यावे. येथे उभयताचा तह करुन देऊन एकविचारे चालेल असे करता येईल. निघताना शाहु महाराजाने बाजीरावास हुकुम दिला होता, यावयाचा प्रसंग न करीता, त्याच प्रांते राहवयासचा विचारच सोडला तरी राज्यभरास विरुध्द वर्तणारास येथायुक्त रीतीने वर्तावे उचितच आहे. तुम्ही अख्तियारीत आहांत."[११४]

माहीमेची तयारी पुर्ण झाल्यावर १० ऑक्टोंबर १७३० रोजी दसऱ्यास संगमावर डेरे देऊन चिमाजी व पेशवा बाजीराव स्वारीस निघाले.[११५] आतापर्यत चिमाजी आप्पा व बाजीराव यांनी माळवा व बंदेलखंडातील अनेक मातब्बर सरदाराना खडे चारले होते ते दाभाडेसमोर हार पत्करणारे नव्हते. संभाजीला छत्रपती बनविण्याचा निजाम व दाभाडे याची योजना हाणून पडण्याचा दोघाबंधूनी निश्चय केला.[११६] चिमाजी आप्पाने गुजरात प्रांताची हालचाल इतक्या जलद गतीने केली की मंत्री पुरदंरे यांना भेटून त्या प्रकरणाची चर्चा करणेही शक्य झाले नाही.[११७] नारोराम हा शाहुच्या दरबारात अधिकारी पदावर असुन पेशवे घराण्यावर प्रेम करणारा होता. तो पेशव्यास लिहतो, 'तुमची आमची भेटी होऊन विचारे होईल ते करावे असा प्रसंग होता. परंतू तिकडील विचारांमुळे तुम्हास जाणे प्रास्थ जहाले."[११८] १० ऑक्टोबर १७३० रोजी पेशवा बाजीराव चिमाजी अप्पांसह गुजरात

मोहीमेस निघाले.[११९] यावेळी त्यास समजले की दाभाडे, कंठाजी कदमबांडे, पिलाजी गायकवाड, उदाजी पवार हे एकत्र येऊन चालुन येणार व निजामाचे सैन्य येताच आक्रमण करणार.[१२०] परंतू चिमाजी आप्पा व बाजीराव यांनी विरोधकांच्या हालचालीवर बारीक नजर ठेवली होती. गुजरातमधील दाभाडे यांच्या सैन्याची माहीती व वर्तन याविषयी सर्व माहिती दाभाडयाचा विश्वासू माणूस नारो गंगाधर मुजुमदार बाजीरावास देत होता.[१२१] त्या आधारावर बाजीराव व आप्पाच्या हालचाली सुरु होत्या.

### ४.८.१ चिमाजी आप्पा व अभयसिंग भेट :-

चिमाजी आप्पा व बाजीराव शाहुच्या आज्ञेने १० ऑक्टोंबर १७३० रोजी पुण्याहून गुजरात प्रांताकडे निघाले. यावेळी चिमाजी आप्पा खानदेशात निजामाच्या हालचालीवर नजर ठेऊन होता.[१२२] यापुर्वी चिमाजी आप्पास हे कळले की, निजाम नर्मदेकडे दाभाडे व गायकवाडच्या मदतीस जात आहे. परंतू निजाम यावेळी महम्मदखान बंगषला भेटण्यासाठी नमर्दकडे निघाला होता. म्हणून निजामाला अडविण्यासाठी चिमाजी अप्पा मोठया जलद गतीने महिच्या उत्तरेस मोमदाबाद येथे पोहचला.[१२३]

या दरम्यान चिमाजी आप्पाने अभयसिंगाची भेट घेतली. तसेच राजपुतांचे सैन्य व तोफखाना यांची मदत मिळविली. यावेळेपासुन चिमाजी अप्पा व बाजीराव पेशवे एकत्रच होते.[१२४] याभेटीत अभयसिंगाने १३ लाख रुपये वार्षीक खंडणी देण्याचे मान्य करुन ६ लाख रुपये त्वरीत दिले.[१२५] या शिवाय इतर रक्कम गुजरात प्रदेशात शांतता प्रस्थापित झाल्यावर देण्याचे मान्य केले.

### ४.८.२ डभईची लढाई.

मराठा फौज घेवून पेशवा बाजीराव जेव्हा बडोदाजवळ पोहचले तेव्हा त्यांना समजले की दाभाडे आणि गायकवाड डभई आणि भिलपुर येथे मैदानात लढाईसाठी सज्ज आहेत. यावेळी दाभाडे यांच्याकडे चाळीस हजार सैन्य होते. तर बाजीरावाजवळ जेमतेम २५००० हजार फौज होती. बाजीराव यांनी सावली येथून वारंवार निरोप पाठवून दाभाडेला साताराला शाहुकडे जाऊन आपले

मतभेद शांततेच्य मार्गांनी सोडविण्याचा सल्ला दिला. मात्र काही केल्या दाभाडे ऐकत नाही असे दिसताच १ एप्रिल १७३१ रोजी पेशव्याने अतिशय तीव्रपणे सेनापतीच्या छावणीवर आक्रमण केले.[१२६] दाभाडे हतीवर बसुन जातीने युध्दास तयार झाला. [१२७] तीन प्रहर पर्यंत लढाई चालली. हत्तीवरुन त्रिंबकराव बाणांचा पाऊस पाडत होता. त्यामुळे त्यांच्या हाताची साले गेली तरीही लढत होत. दोन्ही बाजूंकडील नामवंत सैन्य रणात पडत होते. त्यातच त्रिंबकरावच्या हत्तीचा माहुत मारला गेला. त्यावेळी त्रिंबकराव हती चालवित तिरंदाजी करु लागला. बाजीरावाने जातीने रणात घोडा घालून धारकरी यांचबरोबर तरवार केली. नामांकित लोक निवड करुन त्रिंबकरावाच्या हत्तीपर्यंत त्याने जातीने चालुन घेतले. त्र्यंबकरावचे लोक थोडे राहीले. लोक पळू लागले होते. दिवस मावळू लागला होता. त्र्यंबकरावाचे अचाट रणपांडित्य पाहुन स्वत: जातीचा रणपंडीत असलेल्या बाजीरावाने त्र्यंबकरावाला आग्रहाची विनंती केली. 'अशी लढाई शत्रुंशी करुन महाराजांस संतुष्ट करावे. आम्ही लढाई तहकूब करतो आणि भेटीस येतो.[१२८] मात्र दाभाडें यांनी ते ऐकले नाही. यावेळी बाजीरवाने या सैन्याला सांगीतले की, 'काणी सेनापतीस जाया करु नये.[१२९] बाजीरावाने समजाविल्या नंतरही तो लढत राहीला आणि अचानक एक गोळी त्र्यंबकरावाच्या कानपटीत बसुन तो जागीच मारला गेला.[१३०] ती गोळी भावसिंग याने मारली.

भावसिंग हा त्र्यंबकरावाचा आप्ता, बहुत दिवस त्याने त्र्यंबकरावाचे अन्न भक्षण केले होते, तो आता पक्षांतर करुन बाजीरावाकडे आला होता.[१३१] यापुर्वी तो निजामाकडे नोकरीला होता आणि त्याच्या पक्षात विराजमान झाला होता.[१३२] सेनापती गोळी मारणाऱ्या बारगीराला सेनापतीच्या बारगीराने ताबडतोब ठार मारले. त्र्यंबकराव मेला मात्र, कानठळया बसवणारा कडकडात आणि विजेचा लोळ जमिनीवर कोसळावा, त्याचप्रमाणे येवढा वेळ नागाऱ्यांच्या, नौबतीच्या, तलवारींच्या, घोड्यांच्या आणि माणसांच्या संमिश्र ध्वनींच्या कल्लोळाने निनाद्लेल्या डंभोईच्या त्या रणभूमीवर स्मशान शांतता पसरली. बाजीरावाने लढाई तहकूब केली आणि 'लुट पाठलाग करु नये, हती घोडे पाडाव झाला असेल ते सोडून द्यावे, मातबर मजला करुन निघुन जावे'.[१३३] अशी ताकीद करुन तो तळावर परतला.

कारण त्यांना कदाचीत निजाम आपला पाठलाग करेल याची धास्ती होती. निजामाला चुकविण्यांसाठी बाजीराव डभईहून निघाले. त्यानंतर ते अंकलेश्ववरावर दाखल झाले. तेथून पुढे जात असताना सुरतेच्या बाजुला निजामाच्या सैन्यासोबत बाजीरावाच्या सैन्याची धावती चकमक झाली. त्यात पेशवे निसटले व लांब लांब मजला मारीत ते सातारा येथे पोहचले. त्यानंतर २९ मे ते ९ डिसेंबर पर्यंत बाजीरावाचा मुक्काम साता-यास होता.[१३४] या युध्दातील आप्पांच्या सहभाग संदर्भात स्पष्ट माहीती मिळत नाही. एका पत्रात डभई लढाईत कार्याबदल पूढील प्रमाणे वर्णन केलेले आहे, "चिमाजी आप्पाला सन्मानाचा झगा दिला जावा."[१३५]

सेनापती दाभाडे यांच्याशी चिमाजी व बाजीराव संघर्ष झाला. त्या संघर्षाचे वर्णन खालील पत्रात आहे. २ एप्रिल १७३० रोजी बाजीराव पेशवे स्वामीस लिहीतो. 'येथील वर्तमान तरि त्रिंबकराव दाभाडे व उदाजी पवार, आनंदराव पवार व कंठाजी, रघुजी कदम व पिलाजी गायकवाड व चिमाजी पंत दादा असे तीस पस्तीस हजार फौजेनिशी आम्हासी युध्दास आले. छ. ४ सावाली युध्द जाहले. त्रिंबकराव दाभाडे व जावजी दाभाडे व मालोजी पवार व पिलाजी गायकवाडाचा पुत्र ऐसे चौघे ठार जाहले. उदाजी पवार व चिमाजीपंत पाडाव जाहाले. आनंदराव व पिलाजी गायकवाड व कुवर बहादूर जखमी होऊन पळून गेले. निरंतर स्वामीचें चिंतन करित असो. सदैव पत्री परामर्ष केला पाहीजे. आपणा कडील नारायणजी ढमढेरे ठार पडले व आणखीही कित्येक लोक पडले व जखमी जाहाले.'[१३६]

डभई लढाईत त्रिंबकराव मारला गेला ही वार्ता उमाबाईला समजली तेव्हा उमाबाईला दूख: झाले. मात्र शाहू महाराजांनी पेशवा बाजीराव व उमाबाई यांच्यात समेट घडवून आणला. चिमाजी आप्पा व बाजीराव यांना आपल्या पुत्राप्रमाणे लेखण्याची महाराजांची विंनती उमाबाईनी मान्य केली. त्यामुळे त्यांच्यात पत्रव्यवहारही होवू लागला. कालांतरानी पेशवा स्वत: उमाबाईच्या भेटीला तळेगावाला गेले. त्यावेळी बाजीराव तळेगावाला काही दिवस मुक्कामी राहीले.[१३७] मात्र पेशवा व उमाबाइर यांच्यात सलोखा झाला असला तरी पेशवा व इतर सरदार यांच्यात झालेल्या संघर्षामुळे मराठा सत्तेची हानी झाली. गुजरात संबंधी भाष्य करताना दीक्षीत लिहीतात."छत्रपतीच्या आज्ञेवर गुजरातेत मराठे कारभार करीत राहते तर संबंध गुजरात त्याच्या हाती येण्याचा योग होता. पण

आत्यांतिक निष्ठा आणि अत्यंमिक बेईमानी या गुणांचे दिवे पाजळून मराठयांनी ही संधी गमावली."[१३८]

**सारांश.**

गुजरात प्रांतात चौथाई, सरदेशमुखी, मोकासा अशाप्रकारच्या वसुली वरून मराठा सरदारांमध्ये अनेक वर्ष अंतर्गत संघर्ष सुरु राहीला. त्यातच पेशव्यांच्या वतीने उदाजी पवार व चिमाजी आप्पा हयांना काही अधिकार दिल्यानंतर दाभाडे असंतुष्ट झाला. कारण गुजरात आपणास शाहू महाराजांनी आपल्या वडीलाच्या काळापासुन दिला असल्यामुळे त्यात बाजीरावानी हस्तक्षेप करावा हे पसंत पडले नाही. परीणामी त्यांनी बाजीराव व शाहू महाराज यांच्या विरूध्द कट कारस्थान रचले. त्यामुळे पेशवा बाजीराव व दाभाडे यांच्यात मतभेद निर्माण होवुन डभईचा संघर्ष घडून आला. त्या संघर्षात त्रिंबकराव दाभाडे मारला गेला. ही घटना मराठा राज्यविस्तारास हानीकारक ठरली. कारण डभई लढाईत मराठयांचा एक पराकमी सरदार अंतर्गत संघर्षात मारला गेला.

यानंतरच्या काळात छत्रपती शाहू यांचे महत्व कमी झाले. मराठा राज्यात पेशव्यांना अवाजवी महत्व प्राप्त झाले. त्यामुळे बाजीराव यांच्या बरोबरच आप्पा यांच्या स्वभावातही थोडा फरक पडला. नम्र स्वभावी असलेले चिमाजी आप्पांविषयी पण शाहू महाराजांच्या दरबारी तक्रारी येवू लागल्या.

## संदर्भ :


०१. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पुर्वोक्त, पृ. १०१

०२. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. १११

०३. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पुर्वोक्त, पृ. १०१

०४. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-२. पुर्वोक्त, पृ. १८३

०५. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध), पुर्वोक्त, पृ. २३

०६. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ. ६२

०८. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. २३

०९. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. २४

१०. सरदेसाई गो.स. (संपा.), पेशवे दप्तरातील निवडक कागदपत्रे, गर्व्हमेंट सेंट्रल प्रेस मुंबई, १९३२, खंड-३०, ले. ०३, पृ.०२

११. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. ११२

१२. गर्गे. स. मा. (संपा.), सरदेसाई गो. स.,मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ. ३६९

१३. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तरातील निवडक कागदपत्रे, खंड-३०, ले. पृ.५६

१४. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ.१२३

१५. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ.३६९

१६. प्रा. पुराणिक श.श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. २९

१७. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.२१

१८. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३७०

२०. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-३०, ले.०३, पृ.०२

२१. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३७१

२२. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ३१

२३. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३७१

२४. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३७१

२५. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३७१

२५अ.२. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ३१

२६. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-३०, ले.३०७, पृ.२३९

२७. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा), मराठयांचा इतिहास, खंड-२. पुर्वोक्त, पृ.४०

२८. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ३०-३१

२९. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ३१

३०. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-३०, ले.३१२, पृ. २८६

३१. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ३१

३२. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा), मराठयांचा इतिहास, खंड-२. पुर्वोक्त, पृ.४०

३३. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ३१

३४. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ३१

३५. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ. ३७३

३६. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ. ३७३

३७. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३७३

३८. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. ११४

३९. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३७३

४०. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा), मराठयांचा इतिहास, खंड-२. पुर्वोक्त, पृ.३९

४१. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, पुर्वोक्त, पृ. १३८

४२. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, पुर्वोक्त, पृ. १४०

४३. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१५, ले. ३०७, पृ. २४०

४४. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.३२

४४अ. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.३२

४५. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ. ३७४

४५अ. स. नि. का. रूमाल नंबर, ०१, पुडका नंबर ०४, पत्र क्र. ४२७

४६. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.३३

४७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.३२-३३

४८. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३७६

४९. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.३३

५०. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ५२

५१. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.३३

५२. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ३८

५३. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ३८

५४. स.नि.का. दप्तर १, पुडके ३, पत्र कृ. ३६६

५५. प्रा. सु. ह. जोशी, डॉ. म.रा. कुळकर्णी, डॉ. रघुनाथ शेळके, प्रा. शिल्पा कुलकर्णी, (संपा.), इतिहास माहीती कोश, पुर्वोक्त, पृ. २४५

५६. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ.११५

५७. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ.११६

५८. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ.११६

५८अ. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, पुर्वोक्त, पृ. १३९

५९. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-३०, ले.३१७, पृ.२९७

५९अ. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, पुर्वोक्त, पृ. १७७

६०. गर्गे. स. मा. (संपा.), सरदेसाई गो. स.,मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३७७

६१. गर्गे. स. मा. (संपा.), सरदेसाई गो. स.,मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३७७

६२. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, पुर्वोक्त, पृ. ११७

६३. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ३४

६४. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३७७

६५. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, पुर्वोक्त, पृ. १७७

६६. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ६६

६७. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, पुर्वोक्त, पृ. १४०

६८. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, पुर्वोक्त, पृ. १४०

६९. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ३६

७०. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, पुर्वोक्त, पृ. १४०

७१. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ३५

७२. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा), मराठयांचा इतिहास, खंड-२. पुर्वोक्त, पृ. ४०

७३. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा), मराठयांचा इतिहास, खंड-२. पुर्वोक्त, पृ. ४०

७४. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ११७

७५. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, पुर्वोक्त, पृ. १४२

७६. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. ११७

७७. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ११७

७८. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ४५

७९. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ४५

८०. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पूर्वोक्त, पृ.१०१

८१. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. ११७

८२. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१७, ले.१२

८३. सरदेसाई गो. स.(संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१०, ले.६४, पृ.५९

८४. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ.१२५

८५. गर्गे. स. मा. (संपा.), सरदेसाई गो. स.,मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३८०

८६. सरदेसाई गो. स.(संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१०, ले.६७, पृ.५९

८७. पूरंदरे कृ. वा., चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ. २८

८८. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३८०-३८१

८८अ. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ. ३७०

८९. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१०, ले.६७, पृ.५९

९०. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. ११७

९१. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ५९

९२. गर्गे. स. मा. (संपा.), सरदेसाई गो. स.,मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३८३

९३. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ३५

९४. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा), मराठयांचा इतिहास, खंड-२. पुर्वोक्त, पृ.३९

९५. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.३५

९६. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ४२

९७. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. १२९

९८. पूरंदरे कृ. वा., चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ. ३६

९९. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ.१२५

१००. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. ११८

१०१. गर्गे. स. मा. (संपा.), सरदेसाई गो. स.,मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३८४

१०२. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ४८.

१०३. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ४८

१०५. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ४६

१०६. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३७९

१०७. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३८४

१०८. . डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. १२१

१०९. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. १२७

११०.प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ४२

१११. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३८५

११२. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. ३७

११३. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ. ३८५

११४. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. १२७

११५. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ.१२६

११६. गर्गे. स. मा. (संपा.), सरदेसाई गो. स.,मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३८३

११७. पूरंदरे कृ. वा., चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ. ४२

११८. पूरंदरे कृ. वा., चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ. ४३

११९. गर्गे. स. मा. (संपा.), सरदेसाई गो. स.,मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३८५-३८६

१२०. गर्गे. स. मा. (संपा.), सरदेसाई गो. स.,मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३८६

१२१. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-३०, ले.४२ पृ.३३-३४

१२२. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (पुवार्ध), पुर्वोक्त, पृ. ४९

१२३. . गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३. पुर्वोक्त, पृ.३८२

१२४. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१३, ले.२७

१२५. Commissariat M.S., History of Gujarat, The mughal period : 1573 to 1758 Voll-2, Orient Longmans, Bombay,1957, page no, 438

१२६. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. १२९

१२७. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. १२८

१२८. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. ११९

१२९. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. १२८

१३०. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. ११९

१३१. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, पुर्वोक्त, पृ. १४२

१३२. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.५१

१३३. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. १२९

१३४. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. १२९

१३५. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ६३

१३६. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतीहासीक पत्रबोध, पुर्वोक्त, पृ. २८-२९

१३७. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. १२८

१३८. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ६५

## प्रकरण : ५   चिमाजी आप्पा - सिद्दी संघर्ष

५.१ सिद्दी सत्तेचा उदय.

५.२ सिद्दी - मराठा संघर्षाची कारणे.

५.३ स्वामी  व सिदीसात संघर्ष.

५.३.१ सावनुरच्या हत्तीवरुन निर्माण झालेला पेच.

५.३.२ ब्रह्मेन्द्र स्वामीचे धाडवशीला प्रयाण.

५.४ बाजीराव पेशवा - सिद्दी संघर्ष.

५.५   चिमाजी आप्पाची कोकण मोहीम.

५.५.१ रेवासचा संघर्ष  ( कामारले चरई)

५.५.२ सिद्दी - मराठा तह

५.५.३ आप्पावर  अभिनंदनाचा वर्षाव.

५.५.४ आप्पांचा सन्मान

५.५.५ चिमाजी आप्पांच्या सिद्दीवरील विजयाचे महत्व :

## प्रकरण : ५ चिमाजी आप्पा - सिद्दी संघर्ष.

### ५.१ सिद्दी सत्तेचा उदय :-

मराठयांच्या राज्याच्या शेजारील पश्चिमेकडील प्रदेश कोकण या नावाने ओळखला जात असे. कोकणासप्रदिर्घ समुद्र किनारा लाभाला आहे. या अरबी समुद्रातुनच परकीय प्रवासी, व्यापारी व धर्म प्रसारक भारतात आले. या परकीयांनी व्यापारा बरोबर भारतात राज्यकर्त्याकडून सवलती मिळवून आपल्या वखारी स्थापन केल्या.[१] पश्चिम किनाऱ्यावर सतराव्या शतकापासुन पोर्तूगीज, सिद्दी आणि इंग्रज या प्रबळ पाश्चिमात्य सत्ता होत्या.[२] वसईपासुन सावंतवाडी पर्यंतची किनारपट्टी निरनिराळ्या सत्तांनी ताब्यात घेतल्या होत्या. त्यापैकी वसई, ठाणे, चेऊल आणि गोवा येथे पोर्तुगीज, मुंबईस इंग्रज, जंजिरा येथे सिद्दी, अलिबागेत आंग्रे आणि सावंतवाडीस सावंत याची सत्ता होती.[३] त्यापैकी सिद्दी यांनी जंजीरा येथे सत्ता स्थापन केली होती. सिद्दी हे हबशी वंशाचे मुसलमान होते.[४] सिद्दी आफ्रीका खंडातील ॲबिसिनिया देशातील रहवासी होते.[५] मराठा सत्ता उदयाला येण्यापुर्वीच निजामशाहाचा वजीर मलिक अंबर यांच्या जंजीरा येथे सिद्दीने सत्ता स्थापन केली[६] जंजीरा किल्लाचे महत्व स्पष्ट करताना, म. श्री. दिक्षीत लिहीतात, "जंजीरा हा अभेद्द जलदुर्ग सिध्दीची राजधानी होती. हा लंबवर्तुळाकर दुर्गाधीराज कुलाबा जिल्हात दंडराजपुरी खाडीच्या मुखाशी किनाऱ्यापासुन सुमारे मैलभर अंतरावर अरबी समुद्रात खडा आहे. किनाऱ्यावर मुरुड, राजापुरी, दंडा हिथानी आणि पश्चिमेस खाडीच्या मुखाशी भर समुद्रात जंजीरा हा टापु युध्दभूमीचा मध्यबिंदू होता."[७] असा मजबुत किल्ला सिद्दीच्या ताब्यात होता.

त्यानंतरच्या काळात सिद्दीने उंदेरी बेट जिंकुन तेथे आपला आरमारी स्थळ स्थापन केला. त्यांच्या दक्षिण बाजुस गोवा, आणि उत्तरेस पोर्तुगिजांने दिव-दमनचा भाग सिद्दीने ताब्यात घेतला होता. अलीबाग, कुलाबा, खंदेरी, विजयदुर्ग अशी काही महत्वाची आंग्रेच्या ताब्यातील ठाणी सोडली तर कोकणच्या मधल्या साऱ्या किनाऱ्यावरील भुमीवर जंजीऱ्याच्या सिद्दीने अंमल चालविला होता.[७अ] थोडक्यात सिध्दी हे निजामशाहीच्या काळात हिंदुस्थानत आले व जंजीऱ्याचे अधिपती होवून बसले. याकुत खान हा सिद्दी यांचा किताब होता.[८] सिद्दी शासकांनी शेजारच्या प्रदेशातील राजकीय अस्थिरतेचा फायदा घेऊन उत्तरोत्तर काळात आपली सत्ता वाढविली. दक्षिणेत जेव्हा मराठा-मोघल संघर्ष निर्माण

झाला, त्याचा फायदा घेवून सिद्दीने जंजीऱ्याच्या आसपासच्या प्रदेशावर आपले वर्चस्व प्रस्थापीत केले.[९] सालासेट, वसई व सभोवतालचे प्रदेश सिद्दीने जिंकून घेतली. मराठयांविरुध्द बादशाहा औरंगजेबास युध्दात सिद्दीने मदत केल्यामुळे त्यांनी सिद्दीस रत्नागिरी, दाभोळ, महाड व रायगड हे प्रदेश व किल्ले दिले.[१०] मोगली सत्तेच्या सहयाने अंजलवेल, उंदेरी, गोवळकोट, मंडनगड, मुरुड श्रीवर्धनादी भाग सिद्दीनी गिळंकृत केला होता.[११] त्याकाळी मराठयांचा सरदार कान्होजी आंग्रे यांनी इतर परकीयांना थोपवून धरले नसते तर सहयाद्रीच्या पश्चिमेकडील सारी किनारपट्टी या परकीय शत्रुंनी केव्हाच गिळंकृत केली असती.[१२]

सिद्दी हे पश्चिम किनाऱ्यावर फार मोठया प्रदेशावर वर्चस्व प्रस्थपित करुन बसले होते. ते अलीबाग जवळच्या थळ, रेवास, चौल इत्यादी ठाण्यंना वारंवार उपद्रव देत तसेच आंग्र्याच्या सागरी सत्तेला आव्हान देत असत.[१३] तसेच सिद्दी मराठयांविरुध्द इंग्रज व पोर्तूगीजांना मदत करित.[१४] परिणामी छ. शिवाजी यांना सिद्दीच्या उपद्रवाची दखल घ्यावी लागली.[१५] सिद्दी आणि युरोपीय व्यापारी हे दर्यावर्दी असल्याने किनारपट्टीवर असलेल्या आपल्या कोकण राज्याला त्यांच्या पासून धोका आहे याची जाणीव शिवाजीला झाली. तेव्हा शिवाजी राजाने आरमाराकडे लक्ष पुरविले. आदिलशाहा व पोर्तूगिज या सत्तशी तोंड द्यावयाचे असेल तर सागरी आघाडीवर आपण कमी पडता कामा नये. तसेच आपली ताकद अज्जमावण्यासाठी शिवाजी महाराज यांने सन १७६४ साली दक्षिण कोकणातील 'बसरुर' या बंदरावर स्वत:च्या नेतृत्वाखाली आरमारी चढाई करण्यांचा प्रयत्न केला होता.[१६] मात्र त्यांना यश मिळाले नाही. शिवाजी महाराजाप्रमाणे संभाजी राजे यांनी सिद्दींकडे लक्ष दिले. मात्र छ. शिवाजी व संभाजी राजे यांच्या पश्चात धाक न उरल्यामुळे सिद्दी सरदारानी आक्रमक धोरण अंगिकारले. त्यानंतरच्या काळात हळूहळू मोगली सत्ता झुगारुन ते जवळजवळ स्वतंत्र बनले.[१७]

### ५.२ सिद्दी - मराठा संघर्षाची कारणे

पेशवा बाजीराव यांच्या कारकिर्दीत सिद्दी-मराठा यांच्यातील संघर्षाला गती मिळाली. त्याची कारणे खालील प्रमाणे होती.

१. सिद्दीने बळकावलेला प्रदेश शिवाजीने स्थापन केलेल्या स्वराज्याचा भाग होता. रायगडाच्या किल्ल्यावर शिवाजीचा राज्याभिषेक झाला होता. शिवाय रायगड शिवाजी महाराजांची राजधानी होती. स्वधर्म-रक्षक, स्वराज्यनिर्मीती यानात्याने शिवाजी महाराजांविषयी जनतेत आदर होता. अशा गडावर सिद्दींचे वर्चस्व असावे याची मराठयांना मनातुन अतिशय चीड येत होती. रायगड व स्वराज्याचे सर्व प्रदेश पुन: आपल्य राज्यात सामिल करणे हे मराठयांना आपले परम कर्तव्यच वाटत होते.

२. मराठयांच्या प्रदेशावर इस्लामी वर्चस्व होते सिद्दी शासक हे धार्मीक पक्षपात करीत असत. राजकीय स्वार्थासाठी मराठयांच्या प्रदेशावर आक्रमण करीत, जाळपोळ, लुटालुट तसेच धर्मीक छळही करीत असत. पेशवा बाजीराव यांच्या कारकिर्दीतही मराठयांच्या प्रदेशायांवर आक्रमणे करुन लुटालुट केली. आंग्रेच्या प्रदेश्यांवरही सिद्दी हल्ल्े करीत. सिद्दीच्या या आक्रमणा विरुध्द मोहीम काढून सिद्दीचा बंदोबस्त करावा अशी आंग्रे यांनी छत्रपती शाहु यांच्याकडे मदतीची विनवणी केली.

३. सिध्दी हे मराठयांचे हाडवैरी होते. सिद्दीने मराठयांच्या शत्रुना अनंकेळा मदत केल्यामुळे मराठा सिद्दी यांच्यातील मतभेद वाढत गेले. पोर्तुगिज व निजाम यांना सिद्दी मराठयांविरुध्द मदत करीत असत.

४. पेशवा बाळाजी विश्वनाथ यांनी इ.स.१७१९ मध्ये दिल्लीच्या मोगल बादशाहा कडून दक्षिणेतील सहासुभ्याची चौथाई व सरदेशमुखीची सनद आणली. त्यामुळे मराठयांना सिद्दीना शासन करण्याचा कायदेशिर हक्कच मिळाला असे मराठयांना वाटत होते. कारण त्यासनदेनुसार दक्षिणेतील सहा सुभ्यानमध्ये शांतता व सुव्यवस्था राखण्याची जबाबदारी मराठयांने घेतली होती. परिणामी दक्षिणेत अशांता निर्माण करणाऱ्या सिद्दीना शासन करण्याचा कायदेशिर हक असल्याचा मराठे समजत होते.

५. सिद्दी हे अतिशय धर्मवेडे होते आपल्या वर्चस्वा खालील प्रदेशात हिंदू जनतेवर अत्याचार करीत. परिणामी मराठा व सिद्दी यांच्यात शत्रुत्व वाढत गेले.

६. मराठा-सिद्दी यांच्यातील शत्रुत्वाचे महत्वाचे कारण जंजीरा हा किल्ला होता. कारण मराठयांची जंजीरा जिंकुण घेण्यांची अनेक वर्षापासुन महत्वाकांक्षा होती.

सिद्दी यांच्यातील संघर्षाचे तत्कालीन कारण म्हणजे याकुत ऊर्फ सिदिसातचे हिंदूच्या मंदिरा वरील आक्रमणे होय. सिदिसात हिंदूच्या मंदीरांवर आक्रमण करीत असे तसेच लुटही करीत असे. त्यामुळे हिंदू

जनता त्रस्त झाली होती. स्वत: ब्रर्म्हेन्द्रस्वामी त्रस्त झाले होत. परिणामी स्वामींनी मराठयांना सिद्दीविरुध्द संघर्ष करण्यांस प्रवृत्त केले.[१७ अ]

### ५.३ स्वामी व सिदीसात संघर्ष

सिदीसात अत्यंत पराक्रमी, कावेबाज, धारेणी, हरहुन्नरी, आणि अष्टपैलू होता. त्याला माणसाची चांगली पारख होती. तो हिंदूद्वेष्टा असला तरी स्वार्थीसाठी तो आपला धर्म बाजुला ठेवून आपले कार्य पार पाडीत असे. त्यांच्या सैन्यात मराठा व प्रभुच जास्त होते. कोकण भागातील ब्राम्हणाची त्याला उत्तम माहीती होती आणि मराठी भाषेवर त्याचे प्रभुत्व होते. तो मराठी भाषा इतकी शुध्द लिहीत असे की केवळ भाषेवरुन तरी लिहीणारा जातीने मुसलमान आहे हे मुळीच ओळखु येत नसे.[१८] अशा सिद्दीचा बंदोबस्त मराठयांनी करावा असा सतत स्वामीने तगादा लाविला होता. परंतू स्वत: छत्रपती शाहु त्यावेळी अडचणीत होते. कारण शाहुने निजामाचे शासन उखडून फेकण्याचे प्रयत्न चालविला होता. शिवाय पेशवा बाजीराव व चिमाजी आप्पा हे दोघेही उत्तरेतील माळवा बंदेलखंड मोहीमेवर होते. त्या पुढच्यावर्षी चिमाजी आप्पा व बाजीरव यांना त्रिंबकराव दाभाडे यांचा बंदोबस्त करण्यासाठी गुजरात मोहीमेवर जावे लागले. त्यामुळे शाहु महाराजांचे डावे व उजवे हात बांधले गेले होते. वास्तवीक सारा कुलाबा जिल्हा आणि विशेष म्हणजे छत्रपतीची राजधानी रायगड सुध्दा सिद्दीच्या वर्चस्वाखाली असावा याची शाहु महाराजाला खंत वाटत होती.[१९]

जंजीऱ्याचा अधिकारी सिदी कासम सन १७०७ मध्ये मृत्यू पावला. तेव्हापासुन सन १७३१ पर्यंत सिद्दी रसुल याकुबतखान जंजीरा येथे कारभार करित होता. त्यास ब्रह्मेन्द्र स्वामीची शक्ती माहीत असल्यामुळे याकुतखानाने स्वामीच्या परशुराम देवळाच्या खर्चासाठी आंबडस व पेंडे हे दोन गावे इनाम दिली होती.[२०] शाहु महाराच्या कारकिर्दीतील सर्वात प्रसिध्द स्वामीनी हबशाच्या मदतीने परशुरामाच्या देवालयाचे बांधकाम सुरु केले.[२१]

### ५.३.१ सावनुरच्या हत्तीवरुन निर्माण झालेला पेच :

दाभोळ खाडीच्या मुखावरील दक्षिण बाजुंचे अंजनवेल सिद्दीच्या वर्चस्वाखाली होते. तेथे उपद्रवी सिदिसात हा अधिकारी होता.[२२] बकापूर सावनुरच्या नबाबाने सिदीसातला हत्ती बक्षिस दिला होता. तो सावनुरहुन अंजनवेलला आणने कठीन होते. अशावेळी सिद्दीसातने ब्रह्मेन्द्र स्वामीस सावनुरच्या नाबबाने दिलेला हत्ती घेऊन येण्यास सांगीतले. 'आपली आज्ञा सर्व राज्यात मान्य आहे, यास्तव वरघाट अप्पा जोशी पाठवून पंतप्रधान व पंत प्रतिनिधी यांची दस्तक आणून दयावी.'[२३] सिदीसातची मागणी ब्रह्मेन्द्र स्वामीने मान्य केली. ब्रह्मेन्द्र स्वामीचा स्वभाव घमेंडी होता. प्रत्येकांवर छाप टाकण्याची त्यांना सवय होती. तसेच आपला मोठेपणा दाखविण्याच्या त्याचा सतत प्रयत्न असे.[२४] 'आम्हास भिक्षार्थ सावनुर प्रांत जाणेच आहे. तुमचे काय हत्ती असतील ते आमचे समागम येतील. कोणाच्या दस्तकाचे प्रयोजन नाही.'[२५] स्वामी गर्विष्ठ होते त्यामुळे त्याने सिदिसातचा सल्ला न एकता विना दस्तक हत्ती आणण्याचे कबुल केले. त्यानंतर स्वामी भिक्षादेहीसाठी निघाले. बरोबर दादा गुरचा, कर्नेकरी, अंताजी नारायण कारकुन व खंडोजी साळवी निशानवाला असा परिवार व सिदिसात कडील दहा पठान होते.[२६] घेतलेल्या कामात आड कोणी येण्याचे धाडस करणार नाही असे अहंमपणा अंगी असलेल्या स्वामीला वाटत होते. म्हणून सावनुरचा नबाबकडून हत्ती घेऊन इ. स. १७२६ च्या हिवाळयात ब्रह्मेन्द्र स्वामी भिक्षामागुन कर्नाटकातून परत निघाले.[२७] इ. स.१७२७ च्या प्रारंभी स्वामी कोकणात आले. माखजनच्या मेटपर्यंत हस्तकावाचुन हत्ती सुरक्षित आला.[२८] परंतू संमेश्वराच्या पुढे माखजनच्या चौकीत आंग्रे व सिद्दी या दोघांच्या चौक्या होत्या. तेथे दोहोकडून तंटा निर्माण झाला.[२९] त्याप्रसंगी हा हत्ती सिद्दीचा असुन त्याला दस्तक नाही असे समजताच आंग्रेच्या चौकीदाराने हत्ती पकडला. जवळच असलेल्या सिद्दीच्या चौकीदारास ही वार्ता लागताच ते हत्तीचा ताबा घेण्यांस निघाले. परिणामी आंग्रे व सिध्दी यांच्या सैन्यात चकमक झाली. त्यावेळी सिद्दीच्या सैन्याने माघार घेतली. तेव्हां जयगडच्या किल्ल्यातील सैन्याने तो हत्ती जयगडावर नेला.[३०] यावेळी स्वामी स्नान गंगेसाठी मागेच राहीले असता त्यांच्या पश्चात असा गोंधळ झाला. स्वामीला घडलेल्या प्रसंगाची बातमी समजताच त्याने जयगडाच्या हवालदारास निरोप पाठवून हत्ती परत करण्यांस सांगीतले. त्यापुर्वीच सिद्दीच्या सैन्याने ही वार्ता सिदिसातास कळविली होती. तेव्हा सिदिसातने प्रतिक्रिया दिली की, 'गोसावी हयांनी हत्ती समागमे आणून माखाजनच्या चौकीवर कजीयाचे

निमित्य करुन हत्ती आंग्रेयांचे लोकांचे स्वाधीन केला.'[३१] ही बातमी गोवळकोटास सिदिसातला समजताच ब्रह्मेन्द्र स्वामीने मुद्दाम आंग्रेच्या हवाली हत्ती केला अशी भलतीच कल्पना करुन तो हत्ती परत आणण्या ऐवजी सिदिसातने ब्रह्मेन्द्र स्वामी चे परशुरामाचे गाव व देवालय लुटून फस्त केले.[३२] शिवाय देवालयाची व ब्राम्हणांची संपत्ती लुटून नेली.[३३] सोबत स्वामीचे जे तीन इमानी नौकर चिमणाजीपंत, बापुजीपंत, लाखोमोजी जे धैर्याने तेथे राहीले त्यांना संपत्तीसाठी अतिशय त्रास दिला व मरेपर्यंत मार दिला.[३४]

जंजिराचा प्रमुख याकुतखानास सिदिसाताने केलेल्या अत्याचाराची बातमी समजली त्याने सिदिसातचा निषेध करून पत्र पाठविले व स्वामीची लुटलेली वस्तु स्वामीकडे परत पाठविण्यांचे सांगीतले. त्यामूळे सिदिसातने वस्तु परत केली. परंतु जो विनाश सिदिसातने केला होता तो परत होण्यासारखा नव्हता.[३५] आंग्रे यांनी हत्ती नेला व सिदिसाताने देवालयाचा विध्वंस केला त्यामुळे ब्रह्मेन्द्र स्वामी हताश झाला. बिगर परवाना हत्ती आणला म्हणून कान्होजी रागावणार व तो गमावला म्हणून सिदिसात हाक मारणार अशा विवंचनेत स्वामी पडला. अशास्थितीत ब्रह्मेन्द्र स्वामीला एक उपाय सुचला आणि तो म्हणजे कान्होजी आंग्रे मार्फत सिदिसातास धडा शिकविण्याचा.[३६] म्हणून ब्रह्मेन्द्र स्वामीने कान्होजी आंग्रे यास पत्र लिहीले, 'तुमचे लोकांनी आमचे समागमे हत्ती होता तो नेला सबब सिदिसात शामल यांने परशुरामी मंदीरावर स्वारी पाठवून देव- ब्राम्हणांचा उच्छेद करुन आसवानी जप्त करुन, बंद धरुन नेला. कारकुनास मारहाण करीत आहे. पत्रदर्शन जयगडकरी यांस पत्र पाठवून हत्ती सौन देवानी न सोडल्यास तुचे कल्याण होणार नाही.'[३७] ब्रह्मेन्द्र स्वामीने पाठविलेल्या निरोपाचा आदर करुन कान्होजीने हत्ती सोडून देण्यांचा हुकुम आपल्या माणसास दिला. ब्रह्मेन्द्र स्वामी सावनुरच्या नबाबाचा हत्ती घेऊन गोवळकोट येथे आला. तेथे सिदिसाताला बोलावून हत्ती त्याच्या स्वाधीन केला. यावेळी सिदिसात ब्रह्मेन्द्र स्वामीस शरण गेला व त्याच्या कडून झालेल्या चुकी बद्दल माफी मांगीतली.[३८] मात्र यावेळी ब्रह्मेन्द्र स्वामी अतिशय संतापलेले होते त्यांनी सिदीसातास शाप दिला. "देव-ब्राम्हणाचा तूं उच्छेद केलास अंत:पूर तुझाही उच्छेद लवकरच होईल."[३९] दरम्यान ब्रह्मेन्द्र स्वामीने सिदी याकुब यास पत्र पाठवून आपली तक्रार नोंदविली असता सिदी याकुबखानने सिदिसात यास पत्र पाठविले. त्यात सिदी याकुब लिहितो, "मुल्ला गोफकीर लोक यांचे बहुत प्रकारे आम्ही चालवीत आलो पुढेही ज्यादा चालविणे आवश्यक असता, त्याचे दरगीयास स्वारी पाठवून तसनस करून चीजवस्तू नेली याचे कारण

काय ? उपरी दखल पत्र यांची परशुरामाहून चीजवस्तू, जराबाजरा सुतळीचा तोडा आदि करून, झाडून माघारी देऊन हुजूर पाठविणे.दिक्क्ककत करून तसगत केल्याशिवाय तुझा बळजा होणार नाही."[४०]

ब्रह्मेन्द्र स्वामीने सिदिसातास शाप दिला असला तरी सिदिसात कट्टर मुसलमान असल्यामुळे त्यास शापाचे काय, मात्र स्वामीने सिदी याकुबला सांगून मंदिरातून लुटून नेलेली सारी चीज वस्तु सिदिसातास परत करावयास लाविली.[४१]

### ५.३.२ ब्रह्मेन्द्र स्वामीचे धाडवशीला प्रयाण.

सिदिसातचा हत्ती त्यांना मिळाला असला तरी स्वामीचे मन शांत झाले नव्हते. सिदिसाताने देवालयाचा व गावाचा जो विध्वंस केला होता त्याचा सूड स्वामीला घ्यावचा होता. यासाठी ब्रह्मेन्द्र स्वामीने कान्होजीस पत्र पाठवून सिदिसातला धडा शिकविण्याचे सांगितले. मात्र कान्होजी आंग्रे याची आर्थिक स्थिती अतिशय हलाखीची होती. तेव्हां कान्होजीने साताऱ्यास छत्रपतीची भेट घेऊन सिदिसाताचा बंदोबस्त करण्याविषयी सल्ला दिला.[४२] यावेळी निजामाशी लढतालढता शाहू ही कर्जात बुडाला असल्यामूळे कान्होजीस सिदिसाताचा प्रश्न शांततेने सोडविण्याचा सल्ला महाराजांनी दिला. मात्र कान्होजीने ब्रह्मेन्द्र स्वामीसाठी नवीन जबाबदारी न स्विकारल्यामुळे स्वामी नाराज झाले. तेव्हां स्वामीने कोकण सोडून वरघाटी जाण्याचा हट्ट धरिला असता कान्होजीने ब्रह्मेन्द्र स्वामीस कोकण सोडून न जाण्याची शपथ घातली.[४३] त्यामूळे ब्रह्मेन्द्र स्वामीने काही दिवस वरघाटी जाण्याचा विचार तहकूब केला.[४४] मात्र परशुरामाचे देऊळ उध्वस्त केल्यानंतरही वर्षभर सिदिसातच्या अत्याचाराने ब्रह्मेन्द्र स्वामीशी घसघस करीतच होता. स्वामी कान्होजीस पत्र लिहून- लिहून थकला होता. मात्र कान्होजी कडून काही प्रतिसाद मिळत नसल्यामुळे ब्रह्मेन्द्र स्वामीने बाजीराव पेशवा यास पत्र लिहिले. "येशास त्याचे भेटीस आम्हास जाणे नाही अनसदार करील. गांव तो धास्तीने ओस पडत चालला ! ब्राम्हण दहावीस आहेत ते जाऊ म्हणतात. मुल्लास गांवाची खोटी दस्त दिली. आम्हां देखत वेठबिगार गांवची नेतो. हे आम्ही कैसे सोसावे? याजकरित आम्ही श्रीस्थळी राहावे ऐसे नाही ! टाकावे तर एक प्रकार दिसतो. यास काय करावे ? राहावे की वर्ते निघून यावे ते लिहीले पाहीजे. तुम्ही सांगाल त्याप्रमाणे वर्तणूक करू.'[४५]

ब्रह्मेन्द्र स्वामीचे मन सिदिसाताच्या अत्याचारी धोरणामुळे कोकणात लागत नसल्यामूळे कोकणच्या बाहेर जाण्याचा निर्णय स्वामीने घेतला. तेव्हा ब्रह्मेन्द्र स्वामी कोल्हापुर मार्गे धाडवशीचा रस्ता धरिला. यावेळपर्यंत कान्होजी आंग्रे यांना कळून चुकले होते की स्वामी काही तरी बहणा करुन वरघाटी जाणर. तेव्हा त्याने ब्रह्मेन्द्र स्वामीस घातलेली शपथ मोकळी केली.[४६] स्वामी धाडवशीला आले व तेथेच स्वामीने छत्रपती शाहु यांची भेट घेतली. भेटीत स्वामीने कोकणातील सविस्तर वृत्तांत छत्रपतीना सांगीतला व सिदिसातचा सूड घ्यावा असेही सांगीतले.[४७] परिणामी सिद्दी विरुध्द छत्रपती शाहुने अनेक सरदारांना पत्रे पाठवून कोणास आज्ञा व ताकीद दिली की, सिदीचा बंदोबस्त करावा. कारण स्वामीने शाहुकडे तगादा लाविला होता की अंजनवेल व गोवळकोट ही परशुराम क्षेत्राजवळील स्थळे मराठयांनी काबीज करावीत.[४८]

### ५.४ बाजीराव पेशवा - सिद्दी संघर्ष.

कोकण ही बाजीराव पेशवा यांची जन्मभुमी होती. परंतू उत्तरेकडील मोहिमांत गुंतून राहिल्याने बाजीरावाचे कोकणकडे दुर्लक्ष झाले होते.[४९] सन १७३२ मध्ये पावसाळा संपत आल्यानंतर सिद्दी विरुध्द कोकणात मोहीम चालविण्याचे दिवस येऊन धडकले. शाहु महाराजांना तर सिद्दीला पराभूत करण्याची उत्कंटा लागुन राहीली होती. आंग्रे किंवा प्रतिनिधी हे कार्य पार पाडू शकणार नाही असे दिसत होते. तेव्हा शाहु महाराजांशी सल्ला मसलत करुन तातडीने पेशवा बाजीराव व प्रतिनिधी फत्तेसिंग भोसले सैन्य घेऊन शत्रुंवर अचानक हल्ला चढविण्यासाठी अत्यंत जवळच्या भोर हया डोंगराळ प्रदेशातुन एप्रिल अखेरीस निघाले.[५०] म्हणजे २७ एप्रिल १७३३ रोजी जंजीराच्या मोहीमेवर निघाले.[५१] कोकणात उतरल्यानंतर बाजीरावाने मोहीमेची सर्व सुत्रे आपल्या हाती घेतली.[५२] जलद गतीने प्रयाण करुन मे १७३३ रोजी वैशाखी अमावस्येस बाजीराव राजापुरीस येऊन धडकला.[५३] यावेळी रायगड, मंडनगड, विजयगड, गोवळकोट, अंजनवेल, उंदेरी व जंजीरा अशी मोठमोठी बिकट स्थळे सिद्दीच्या ताब्यात होती. बाजीरावाने त्यासर्व स्थळावर एकदम हल्ला करण्याचे ठरविले होते. त्यासाठी उंदेरीवर व मंडनगड यावर बकाजी नाईक यास पाठविले. अंजनवेलची कामगिरी प्रतिनिधी व आनंदराव सोमवंशी यांच्याकडे सोपविली.[५४] बाजीराव अतिशय जलद गतीने प्रस्थाण करुन भोरमार्गे दोनच दिवसात पाली येथे आले

आणि आठवडा भरातच राजपुरी, खोकरी इत्यादी सिद्दीची ठाणी जिंकूण घेतली.[५५] यावेळी पेशवा बाजीरावाने ठरलेल्या योजननुसार सिद्दीच्या प्रदेशावर हल्ले सुरु केले. मे १७३३ मध्ये बाजीरावाने मंडणगड विजित केला. याचवेळी अष्टमी, अश्राधार, आंतोणे, नागठाणे, तळे, घोन्साले व निजामपूर इत्यादी महालातही मराठयांचा अंमल प्रस्थापित झाला. ८ जुन १७३३ रोजी श्रीपतराव प्रतिनिधीने रायगड किल्ला जिंकुण घेतला.[५६] ६ जुलै १७३३ रोजी बकाजी नाईक यांने आपल्या सैन्यासह विजयगडवर हल्ला केला. आणि ता किल्ला आपल्या ताब्यात घेतला. यावेळी बकाजी नाईक अंजनवेलकडे जाताना त्यास समजले की, सिदी सातच्या मनात पुन्हा परशुराम देवालयाची विटंबना करावयाची आहे, म्हणून बकाजी गोवळकोटकडे चालून गेला. सिदीसातने १२ ते १५ हजार सैन्यासह मराठा फौजेवर हन्ल्ल्ला चढविला. सिदीचे सैन्य फार असल्यामुळे मराठयाना हार पत्करायची वेळ आली होती, पण बकाजी नाईकाने सैन्य गोळा करुन सिदीसाताला वेढले आणि त्यासह त्याचे सैन्य पळवुन लावले.[५७] अशाप्रकारे मराठयांनी सिद्दीची अनेक ठाणी जिंकलीत. ऑगस्ट १७३३ मध्ये जंजीरा व अंजनवेल हया खेरीज बहुतेक सर्व ठाणी बाजीरावाच्या ताब्यात आली.[५८] यावेळी बाजीराव व प्रतिनिधी हे दोघेही सिद्दीचा जंजीरा घेण्यांसाठी स्वत: ठाण मांडून बसले. इ. स. १७३३ च्या फेब्रुवारी मध्ये जंजीराचा सिद्दी रसुल याकुतखान मृत्यू पावला होता. यावेळी सिद्दींमध्ये दुफळी निर्माण झाली होती. त्यामूळे पेशव्याचे काम सोपे झाले. सिद्दी संबुल, सिदी संबल आफलानी यांनी मराठयांशी लढण्याची तयारी केली होती.[५९]

जंजीरा संघर्षात सिद्दी रहीण यांच्याशी बाजीरावाचा संघर्ष झाला. त्यात राहीण ठार झाला. बाजीरावाने यावेळी मोर्चे लावून जंजीऱ्यावर तोफांचा मारा सुरु केला.[६०] तर समुद्रातून मानाजी आंग्रेनी बरीच मारागिरी केली. सिद्दीस इंग्रजांकडून व सुरतच्या सिद्दी मसूद कडून मदत मिळत होती. परंतू ही बाहेरील मदत बंद झाल्याबरोबर सिद्दी अंबर, सिद्दी संबुल इत्यादी पळून गेले. परिणामी जंजीरा बाजीरावाच्या ताब्यात आला.[६१] सिद्दीच्या भानगडी वाढत चालल्यामुळे शाहू महाराजांनी बाजीरावास सिद्दीसी समेटाचा तह करण्याचे सुचविले.[६२] त्यानंतर जंजीरा जिंकूण मराठयांनी सिद्दी अब्दुल रहमान यास किल्ल्याच्या तख्तार बसविले. तेव्हा पेशवा बाजीराव व अब्दुल रहमान सिद्दी यांच्यात अलीबाग नजीक नावंदरे येथे तह झाला.[६३]

*नांवदरे तहाच्या अटी*

*१) अब्दुल रहमान यास साडेपाच महालाचा वसुल मराठयांनी दयावे.*

*२) रायगड, तळे, घोसाळे अवचितगड आणि बिरवाडी हे किल्ले मराठयानी घ्यावे.*

*सिद्दी विरुध्दची मोहीम यशस्वी करुन पेशवा बाजीराव डिसेंबर १७३३ मध्ये सातार्‍यास परत आला.[६४] तेव्हां शाहू महाराजांना फार आनंद झला कारण शाहू महाराजांचा बालपणीच्या सहा-सात वर्षाचा काळ ज्यागडावर गेला, त्या गडावर साडेतिनशे वर्षानंतर हिंदूच्या पहिल्या राजाचा राज्यभिषेक झाला तो गड (रायगड) पुन्हा स्वराज्याला आला होता. म्हणून बाजीरावचा छत्रपतीने मोठा सन्मान केला.[६५]*

*त्यानंतरच्या काळात छ. शाहुच्या आदेशानुसार संभाजी आंग्रे यांनी सिद्दी विरोधी लढा सुरुच ठेवला. जंजीर्‍यांची मोहीम तशीच चालु होती. अंजलवेल व गोवळकोट काबीज केल्याशिवाय युध्द बंद करणे शाहु महाराज पसंद नव्हते. १४ जानेवारी १७३४ रोजी शाहु महाराज सावंतास लिहितात. "अंजनवेळीस सह देऊन स्थळ हस्तगत करावे, असी संभाजी आंग्रे यास आज्ञा केली आहे. त्याज कडील प्रांतास उपसर्ग न लावणे. ते तुम्हास उपसर्ग लावणार नाहीत."[६६]*

*मात्र त्यानंतरच्या काळात सिदिसात व त्याच्या सरदाराने मराठयांच्या प्रदेशायांवर हल्ल् सुरु केले. सिदिसात व सिद्दी मसुद याने एकदम मराठयांच्या बाणकोटवर हल्ला चढवून काबीज केला. हे सैन्य असेच पुढे महाडावर चालुन गेले. त्यांनी महाड विजीत करुन मराठयांच्या रायगडाला वेढा दिला. अशास्थितीत छत्रपती शाहुने सैन्याची जमवाजमव करुन उदाजी पवार, सरलष्कर, हिंदूराव घोरपडे यांच्या फौजा कोकणात पाठविल्या.[६७] सिद्दीने बाणकोट विजीत केल्यानंतर तेथील मराठयांनी जीव वाचविण्यासाठी सुवर्णदुर्गचा आश्रय घेतला. मात्र १७३४ च्या जानेवारीत सिद्दीने पाचाड हस्तगत केले. त्यावेळी चिमाजी आप्पांनीही रायगडच्या आसपास तळ देऊन सावध राहण्याचा हूकूममराठयांना पाठविला. त्यावेळी मराठा सैन्य पोलादपुरला ५ जानेवारी १७३४ ला जमले.[६८] १० जानेवारी १७३४ रोजी मराठा सैन्याने सिदीच्या सैन्याला गाठले यावेळी झालेल्या लढाईत सिद्दीचा पराभव झाला. सिद्दीचा प्रमुख सरदार सिद्दी अंबर अफवानी मारला गेला.[६९]*

सिद्दीच्या सैन्याचा रायगडला पराभव केल्यानंतर मराठी सैन्य सिद्दीने व्यापलेल्या महादवर चालुन गेले. काही सैन्य अंजनवेल व गोवळकोटवर चालून गेले. त्याचवेळी छत्रपती शाहू यांनी संभाजी आंग्रे यास वरील दोन्ही ठीकाणच्या वेढयास मदत करण्यास सांगीतले. त्यानंतर सिद्दी बाणकोटला गेल्यावर मराठयांनी २४ जानेवारी १७३४ रोजी महाड जिंकूण घेतले.[७०]

चिपळूणच्या परशुराम मंदीराला सिद्दीसाताचा फार उपद्रव होता. तेव्हा बाजीरावाने सिद्दीला कडक शब्दात ताकीद दिली, अन नुसते चिपळूणचे मंदीरच नाही, तर कोकणातल्या कोणत्याही मंदीराकडे वा मराठयांच्या बाईकडे वाकडया नजरने नुसते बघितले तरी पेशव्याच्या फौजा पुन्हा कोणकणात उतरतील. अशी सख्त ताकीद दिली.[७१] कालांतराने सिद्दीविरूध्द चिमाजी आप्पाने स्वारी काढून सिदीसाताचा बिमोड केला.

### ५.५ चिमाजी आप्पाची कोकण मोहीम -

ब्रह्मेन्द्र स्वामीने सिद्दी विरूध्द मोहीम काढून त्यांच्या बंदोबस्त करावा असा तगादा लाविवला असता पेशवा बाजीराव दिल्लीच्या मोहीमेची तयारीत होता. तरीही जातजाता बाजीरावाने स्वामीस सांगीतले की, 'सिद्दीसातची घटका भरु द्या, मी नाही तर निदान माझा भाऊ चिमाजी आप्पा त्याचे निर्दालन करील.'[७२] सन १७३५ चा पावसाला संपल्याबरोबर जंजिरा मोहिमेचे तिसरे पर्व सुरु झाले. यावेळी मस्के सिद्दीशी लढून त्रस्त झाला परिणामी त्याने रणमैदान सोडल्याने सिदिसात आक्रमक बनला. त्याची झळ संभाजी आंग्रेला बसल्यामुळे त्याने पेशव्याचे वैर विसरुन प्रतिकाराची तयारी सुरु केली. सिद्दीना यावेळी इंग्रज व पोर्तुगीजांची मदत मिळत असल्यामुळे त्यांचे बळ वाढलेले होते. परिणामी मराठयांना माघार घेण्यांची वेळ आली. नोंव्हेबरच्या दुसऱ्या आठवडयात सिद्दीने अंजलवेलहून जोरदार आक्रमण केले. जाळपोळ, लुटालुट करीत त्याने मराठयांना जेरीस आणिले. संभाजी आंग्रे त्यामुळे त्रस्त झाला. त्याला कुलाब्याची काळजी असल्यामुळे त्याने सिद्दीशी बोलणी सुरू केली. डिसेंबर महिन्याच्या प्रारंभी सिद्दी उत्तरेकडे वळून केळशी, मंडणगड विजीत करुन ५ डिसेंबर १७३५ रोजी बाजी भीवरावाच्या ताब्यातील बाणकोट जिंकूण घेतो.[७३]

यावेळी बाजीराव पेशवा उत्तरेच्या मोहीमेवर तर आप्पाचा मुक्काम पुण्यास होता. त्यांना छत्रपती शाहु यांने आज्ञापत्र पाठविले. त्यामुळे २० मार्च १७३६ मध्ये चिमाजी सातारा येथे आला.[७४] याचवेळी पिलाजी जाधव यास गोवळकोटला पाठविण्यासाठी शाहू महाराजाने चिमाजीस सातारा येथे बोलाविले होते.[७५] सिदिसातने जो धुमाकूळ मांडला होता त्याचा उच्छेद करण्यासाठीच जणू ते वेळेवर येऊन दाखल झाले.[७६]

सन १७३६ सिदिसात यांने रेवासच्या इलाख्यावर आक्रमण केले त्यांनतर कुलाब्यावर वर्चस्व प्रस्थापित होणार असे दिसताच मानाजी आंग्रे यांनी छत्रपती शाहु, बाजीराव पेशवा व चिमाजी आप्पा यांच्या कडे मदत मागीतली. त्यामुळे शाहु महाराजाने चिमाजी आप्पा व पिलाजी जाधव यास मानाजीच्या मदतीसाठी कुलाब्यास जाण्याचा आदेश दिला.[७७] तेव्हा चिमाजी अप्पाने पिलाजीस गोवळकोटास रवाना केले.[७८] ७ एप्रिल १७३६ रोजी पिलाजीच्या नेतृत्वाखाली मराठयांचे निवडक सैन्य पायदळ व घोडदल साताऱ्याहुन गोवळकोटकडे कुच करते. पिलाजीच्या टाकोटक दौडत निघतो आणि महाडमार्गे मुंसडी मारुन सिद्दीच्या हातुन सलामीलाच बाणकोट सोडवितो.[७९] चिमाजी आप्पाने कुलाब्याकडे कुच केले. यावेळी सिदीसात रेवास जवळ होता. पेशव्याची मुख्यफौज उत्तरेत होती म्हणून सिदिसात जरा गाफील होता.[८०] मात्र दोनच दिवसात चिमाजी आप्पा कुलाब्यास पोहचला.[८१] त्यानंतर १८ एप्रिलला चिमाजी आप्पा रेवास जवळील चरई कामारले येथे येऊन पोहचला.[८२]

### ५.५.१ रेवासचा संघर्ष ( कामारले चरई)

सिदीसात च्या आक्रमणाला आळा घालण्यासाठी छ.शाहुने चिमाजी आप्पास मुद्दाम कोकणात पाठविले. सिदीसात त्यांचे सहकारी आरमार व फौजा घेऊन नागोठ्याच्या खाडीच्या तोंडाशी रेवास बंदर आहे. तेथून सागर गडावर येऊ लागले. रेवास पासुन आंग्रे यांचा बालेकिल्ला अलिबाग फक्त तेरा मैल राहीला.[८३] मात्र सिदिसातने यावेळी एक घोडचूक केली. अति आत्मविश्वासाने संभाजी आंग्रेच्या मदतीसाठी म्हणून मानाजीचे नाक कापण्यासाठी उत्तरेकडे कुलाब्याच्या मुलूखात शिरला. यावेळी रेवासच्या बेसावध ठाण्यावर हल्ला करुन आणि कापाकापी करुन त्याने ते ठाणे जिंकले.[८४] ही वार्ता मानाजीने साताऱ्यास तातडीने कळविले. अलिबागला आंग्रे याचे ठाणे होते. त्यांचे सामर्थ बेताचेच

असल्यामुळे आपण त्याविरुध्द सहज जिंकू असे सिदिसातला वाटत होते.[८५] मात्र सिद्दी कुलाबा जिंकूण घेण्यास याश आले तर सेभाजी आंग्रे कुलाब्यास येईल आणि त्यानंतर होण्या-या परीणामांचे गांभीर्य बाजीराव व चिमाजी आप्पा या दोघ्यांच्या लक्षात आले. म्हणून सिद्दीला रोखण्याचे त्यांनी ठरविले. २५०० पायदळ व ८०० घोडदळ बरोबर घेऊन चिमाजी आप्पा १३ एप्रील रोजी कोकणात जाण्यासाठी सातारा सोडले.[८६]

चिमाजी आप्पा आणखी फौज घेऊन कोकणात उतरला. याची सिद्दीला वार्तापण नव्हती.[८७] मराठयानी सिद्दीला अशा ठिकाणी गाठले की, त्याला काढूनही नवी मदत बाहेरुन मिळने शक्य झाले नाही, तसेच पळुन जाणेही शक्य नव्हते.[८८] यावेळी त्याचा समाज झाला की आपल्याला रोखणारी फौज मानाजीची पराभूत झालेली एक तुकडी आहे. त्यामुळे सिदिसातच्या पायदळ तुकडीने संख्येने तिप्पट असलेल्या मराठी घोडदळावर हल्ला चढविला. दोन्ही सैन्यात १९ एप्रिल १७३६ रोजी चरई नजीक कामारले तर्फे श्रीगाव येथे गाठ पडून घनघोर संघर्ष झाला.[८९] यावेळी सिद्दीपाशी इन्फंट्रीची एक लहान तुकडी होती. मराठयांचे घोडेस्वार शत्रूच्या इन्फंट्री आग होकण्या-या सैन्यावर निधडया छातीने चालून गेले. सुरवातीला घोडा किंचाळला आणि पुढे झेप घेण्यास कचरु लागला, पण एकदम चालुन जाण्याचे आदेश आल्यावर घोडेस्वार आगेकुच करीत आगीला सामोरे गेले. एवढयात मानाजी आंग्रे यांची फौज येऊन मिळाली. आणि चिमाजी आप्पाचा दृढनिश्चय बळावला. त्यामुळे परीस्थिती बदलली. मराठी घोडे किंचाळत आगीच्या दिशेने धावू लागले, ते शत्रूंवर चालुन गेले.[८९अ] सिदीसात यावेळी राज्य घेईल नाहीतर मरुन जाईन अशा निकराने सिदिसात लढला. मात्र यावेळी मानाजी आंग्रे, नानाजीराव सुर्वे व चिमाजी आप्पा यांनी सिदिसातचा सर्व बाजुने कोंडमारा केला. 'शरण ये तर जीवदान देतो.'[९०] अशी स्वता:चा बचाव करण्याची आप्पाने त्याला संधी दिली. मात्र सिदिसात शरण न येता जीवावर उव्दार होऊन अगदी त्वेषाने शत्रुची फळी फोडण्यास पुडे सरकला. तेवड्यात उंदेरीचा किल्लेदार सिद्दी याकुत ठार झाल्याची वार्ता सिदीसातला समजली तेव्हा 'अरेरे माझा उजवा हात तुटला.'[९१] असे खेदाने म्हणून जीवाची अशा सोडून सिदीसात एकदम मानाजी आंगरे यांच्यावर तुटून पडला. त्याने मानाजीवर नेम धरुन गोळी मारली असता ती मानाजी आंगरे यांच्या उरात घूसली. परिणामी मानाजी घायाळ होऊन खाली पडला. तेवढ्यात नानाजीराव सुर्वे पुढे घुसला व सिदिसाताशी भिडला. दोघात भयंकर हातघाईची

लडाई झाली. एकमेकांच्या वारांनी दोघांच्याही शरिराची चाळणी झाली होती. रक्तांच्या धारा वाहु लागल्या. अखेर नानाजीराव सुर्वे यांनी सिदीसातास ठार केले..[११अ]

यावेळी झालेल्या संघर्षात सिदीचे अनेक सरदार मारले गेले. उंदेरीचा किल्लेदार सिद्दी याकुब, संभाजी घाडगे, कोंडनाईक व बाळाजी शेणवी ऐसे ठार पडले.[१२] मराठ्यांकडील ५०० माणसे कामास आले.[१३] या संबंधीत नोंद तत्कालीन एका पत्रात पुढीलप्रमाणे आहे. "सिदीसात खास, उंदेरीचा सिदि याकुब, कृष्णाजी व सुभानजी घाडगे, कोंडदेव नाईक व बाळाजी शेणवी ऐसे ठार पडले. महाराजेप्रतापे, नानांचे व प्रंतप्रधानचे आर्शीर्वादे चिमाजी आप्पास थोर यश आले.[१४]

## ५.५.२ सिद्दी - मराठा तह

चिमाजी आप्पाच्या हया विजयामुळे जंजिऱ्याचे सिद्दी अतिशय भयभीत झाले. त्याने मराठयांकडे अतिशय नम्रपणे शांततेची विनवणी केली. सिद्दी विरुध्द मिळविलेला निर्णायक विजय ठरला. कारण त्यामुळे प्रमुख सिद्दी सरदार रहमान याने मराठयांबरोबर तहाची बोलणी सुरु केली. परिणामी मराठा व सिद्दी यांच्यात २५ सप्टेंबर १७३६ रोजी तह झाला.[१५]

**तहाच्या अटी.**

१) अंजनवेल व गोवळकोट हे किल्ल् सिद्दीकडे राहतील.

२) सिद्दीच्या त्याबत असलेल्या एकुण ११ महालापैकी साडेपाच महाल मराठयांच्या

वर्चस्वाखाली तर उर्वरीत साडेपाच महाल सिद्दीच्या ताब्यात ठेवण्यात आले.[१६] चिमाजी आप्पाच्या या कोकण मोहिमेचे फलीत म्हणजे जंजिरा, पद्मदूर्ग आणि उंदेरी या किल्याशिवाय सिद्दीचा सारा मुलुख चिमाजीने शाहु महाराजांच्या नावे करुन घेतला.[१७] सिदिसाताला ठार केल्यानंतर रेवास यूध्दाची माहीती देणारे पत्र चिमाजी आप्पाने पेशवा बाजीरावास लिहीले. ती तपशीलवार वार्ता फार महत्वाची आहे. 'सिदिसात आरमारासहित रेवसात येउुन उतरला. हल्ला करुन गडी घेतली. साठ माणूस गडीत होते ते मारले गेले. तेव्हा मानाजी आंगरे कुल जमावासह वर्तमान युध्दात गेले. युध्द सख्त जाहला. ते समयी याचकडील चांगली मानसे पडली. सिकस्त खालली. शामल शोक जाहाला. त्याउपरी एकदोन युध्दे सख्तच जाहाली. पन्नास चैापन्न माणंसे मानाजी आंगारे यांचे पडले. शामलाचीच शेखी होऊन मुलुक

लुटीत जाळीत पुढे चालला. राजरी संभाजी आंगरे सरखेल याचेही अनुमोदन त्यास."[९८] चिमाजी आप्पाच्या या संघर्षाचे वर्णन करणारे अनेक पत्र आहेत, 'सदरहू वर्तमानाचे पत्रे मानाजी आंगारे यांचे सातारीयास आले तेच समयी कूच करुन, दरकूच हशमाचा जमावासहवर्तमान साववे मजली पोयेनाडदास आलो. दुसरे दिवशी १८ जिल्हेजी सिदिसात निवड माणूस व तमाम सरदार घेऊन दिड हजारानसी चरईकामारले येथे चालून गेलो. युध्द सख्त जाहाले. सिदिसात जातीने मर्द. आगीचे सामान व तोफखाना हरभात व तरतुद उत्तम. लडाई बहुत उत्तम केली. आम्हाकडील घोडेमाणूस बहूत जाया जाहाले. परंतु स्वामीचे आशीर्वाद सिदिसात जीवे मारिला. सिदियाकडील दवकोड नाईक व सुभानजी घाटगा फाइन व बालाजी सेणवी हेहि मारले. बारा तेरासे माणसे कापून टाकिले. परंतु कृष्णाजी घाटगा मारला म्हणून पूर्वी लिहिले आहे. परंतु कृष्णाजी उघडाबोडका पलुन गेला. वरकड सरदार जमातदार मारले गेले. लोकही पलाले ते उघडेबोडके खाडीत उड्या टाकून पाहून तराडीयावर चढले तितके गेले. शामलास मोठी जरब पोहचली."[९९]

### ३.५.३ आप्पावर अभिनंदनाचा वर्षाव.

चिमाजी आप्पाने सिदीसातचा पराभव करताच चिमाजी आप्पांवर अभिनंदनाचा वर्षाव झाला. छ. शाहु, फत्तेसिंग भोसले, ब्रह्मेन्द्र स्वामी, जिवाजी खंडेराव चिटणीस इत्यादिनी आप्पाचे अभिनंदन केले. आप्पाने अत्याचारी सिदीसातला ठार केल्याची बातमी ब्रह्मेन्द्र स्वामीला समजली असता त्यांचा आनंद गगनाला भिडला होता. त्यांनी चिमाजी आप्पाची मुक्तकंठाने स्तुती केली, "हणमंतासारिखे येश तुम्हास आले. पुढेही श्री. अहद रामेश्वर तहद दिल्ली येश देईल. तुम्ही वर्तमान लिहले व चिरंजीव बाजीरावची पत्र आली. हे संतोषांचे अर्त्मान ऐकोन, जैसी हनुमंताचे गळा रघुविरे रत्नाची माळ घातली तैशी पत्रे पाठविली. तुम्ही रामरुप जाहाले. जरी दहा कोटी फौज घेऊन कोकणात जाते तरी ऐसे यश कोकणचे न येते. ऐसे पुर्त आपले ठायी समजणे. रावणासारखा दैत्य मारिला."[१००]

चिमाजी आप्पाने सिद्दीवर मिळविलेल्या विजयाची वार्ता फत्तेसिंग भोसले यास समजल्यानंतर चिमाजी आप्पाचे अभिनंदन करणारे पत्र त्यांनी लिहिले.[१०१] "सिदिसातासी युध्द प्रसंग जाला ते समई युध्द तुंबळ होऊन.हप्सियाचे माणूस कापुन काढिले व सदिसात खासा ठार जाला, यैसे वर्तमान लि

त्यावरुन रा स्वामी बहुतसे खुशाल जाले. तुम्ही महाकृते केले! सिदिसात म्हणजे केवल हपालीयांचा मुख्यहोता तो तुमच्या हाते पराभवात पावला, थेर से येस तुम्ही जोडीले. राजश्री, बाजीराव प्रधान तिकडे गेले. मागे तुम्ही बरी शिकस्त करुन हापसी गुडविला. हापशियाचा मुलकंदच उपटून टाकीला! चहुकडे लौकक विशेषात्कारे जोडीला. तुमची निष्ठा राज्यश्रीच्या पायासी एकनिष्ठेने सेवा करावी यैसेची आहे. तदनुसार मोठेसे येश पदरी पडिले. सामान्य गोष्टी झाली नाही." [१०२]

चिमाजी आप्पाच्या सिदीसातवरील विजयामुळे सर्वत्र आनंदी-आनंद झाला. यासंदर्भात सदाशिव दीक्षीत पटवर्धन चिमाजी आप्पास लिहीतात, "भारती युध्धासमान युध्ध होऊन महान शत्रु मारिला असे. पुर्वी जाले नसेल अशी युक्ती ईस्वरे तुम्हास अनुकूल केली. याउपरी उत्तरोत्तर आपले कल्याण आहे. आपल्या युध्धाचे वर्तमान सर्वानी आईकल्या उपरी जो आनंद उत्साह जाला आहे, तो दिवसेदिवस अधिकोत्तर होतो." [१०३]

### ५.५.४ आप्पांचा सन्मान

ब्रहमेद्रस्वामीला ही वार्ता समजताच त्यांनी आनंद साजरा केला. त्यांच्या परमप्रिय चिपळूणच्या भगवान परशुरामांच मंदीर विटाळून, उध्वस्त करणाऱ्या अत्याचारी सीद्दीसातलाला आज बाजीरावांच्या 'लक्ष्मणांने' आप्पानी मारले होते.[१०४] कोकणातील प्रजेला महिषा सुरासारख्या छळणाऱ्या सिद्दसातला आप्पांनी मारले ही वार्ता बाजीरावाला समजताच त्यानाही अतिशय आनंद झाला.[१०५] चिमाजी आप्पाने सिदिसातावर मात केली ही वार्ता जेव्हा शाहु महाराजाना समजली त्यावेळी शाहु महाराज शिकारीस होते. वार्ता ऐकून शाहु महाराजांना अतिशय आनंद झाला. त्या आनंदात पत्र घेऊन आलेल्या शाखरोजी कुटास त्यांनी सोन्यांचे कडे दिले.[१०६] घरी येऊन तोफा मारल्या, नौबत बाजविली, खुशाली केली.[१०७] सिदीसातावरील विजयाने आनंदीत झालेल्या छ. शाहुने चिमाजी आप्पाचा विशेष सन्मान केला. शिवाय बहुमुल्य आभूषणे आप्पास दिली. त्यात हिरेजडीत तलवारही होती.[१०८] छत्रपती शाहुने चिमाजी आप्पांचा सन्मान तर केलाच शिवाय राजश्री मानाजी आंग्रे यास "वस्त्रे मंदील दुपट्टा व झगा व या खेरीज तिवट कलसपाटी बांधावयाचे पदक तरवार कटार येणे प्रमाणे पाठविली."[१०९]

गोवळकोट वेडा घालुन बसलेल्या पिलाजी जाधव यांने चिमाजी आप्पांनी केलेला पराक्रम ऐंकून त्यांना धन्यवाद दिले. जिवाजी खंडेराव आणि इतर मराठे सरदार मल्हार दादोजी बर्वे, द्वारकाजी पाटणकर आदीनी चिमाजी आप्पांकडे आपल्या हार्दीक शुभेच्या पाठवून दिल्या.[११०]

परशुराम मंदिराचा विनाशक, अत्याचारी, हिंदूवेष्टा सिदिसात मारला गेला. त्यामुळे संपुर्ण महाराष्ट्रात आनंदाची लाट उसळ्ली. परीणामी चिमाजी आप्पाचे कौतुक झाले. प्रा. बिरादार यांनी चिमाजी आप्पांच्या विजयाबद्दल खालील मत व्यक्त केले आहे. 'रेवासच्या विजयामुळे एक कुशल व पराक्रमी सेनापती म्हणून ओळखला गेला. हिंदूधर्म स्थळांचा विध्वंश करणारा व हिंदू प्रजेचा धार्मीक छळ करण्याऱ्या सिदिसात यांचा नि:पात केल्यामुळे संपुर्ण महाराष्ट्रातील जनतेला अतिशय आनंद झाल्यामुळे चिमाजी आप्पाबद्दल आदर निर्माण झाला. राजकीय क्षेत्रात त्यांची प्रतिष्ठा वाढली.''[१११]

**५.५.५ चिमाजी आप्पांच्या सिद्दीवरील विजयाचे महत्व :**

पेशवा बाजीराव यांनी १७३३ पासुन हाती घेतली मात्र त्यांना सिदीचा कायमचा बंदोबस्त करणे शक्य झाले नाही. मात्र चिमाजी आप्पांने मात्र चरई कामरले येथे सिदीचा पाडाव करून सद्दीचा बंदोबस्त केला. आप्पाचा या विजयाचे महत्प स्पष्ट करताना प्रा. पुराणिक लिहीतात, "अशाप्रकारे १७३३ मध्ये बाजीरावाने हाती घेतलली जंजि-याची मोहीम, 'न्युन ते पुरते। अधािक ते सरते। ' करून तीन बर्षानी चिमाजी आप्पाने शेवटास नेली, चिमाजी अप्पा हा बाजीरावाच्या ध्वजाची काठी होती, असे 'तुलसी रामायणा' त म्हटले आहे. लक्ष्मणासारखे असलेल्या या भावात चिमाजी अप्पा हाबाजीरावाच्या ध्वजाची काठी होऊन राहीला, आणि त्या काठीवर बाजीरावाच्या यशाचा ध्वज डौलाने फडफडत राहीला, ही गोष्ट चिमाजी अप्पाय अत्यंत भूषणास्पद आहे यात शंका नाही.'[११२]

चिमाजी आप्पाच्या सिद्दीवरील विजयानंतर सर्व आंनद साजरा झाला. कारण या विजयामुळे अत्याचारी सिदीसात मारला गेला. स्वामीला याच्या अतिआंनद झाला. त्या आंनदात त्याने पेशवा व आप्पा यांना राम-लक्ष्मणाची उपमा दिली. आणि रावणा सारखा

१. सिद्दीची शक्ती अतिशय दुर्बल बनली.

२. मराठयांनी मिळविलेल्या विजयामुळे त्यास मराठयाबरोबर स्पर्धा करण्यांचे धोरण सोडून द्यावे लागले.

३. सिद्दी मराठयांचे अधीन बनले. कोकणातील एका मराठयांच्या स्पर्धाकास नमविण्यांस मराठयांना यश आले.

४. कोकण प्रदेशाविषयी विशेष आकर्षण असलेल्या बहुतेक प्रदेशावर आपली सत्ता स्थापन करणे शक्य झाले.

५. चिमाजी आप्पाच्या प्रतिष्ठेत भर पडली.

६. चिमाजीच्या सिद्दीवरील विजयामुळे सिद्दीचा बराचसा प्रदेश मराठयांच्या वर्चस्वाखाली आला.

७. यातहामुळे जंजीऱ्याचा सिद्दी हा जवळजवळ मराठयांचा मांडलीक झाला. त्याच्या अकारामहालावर उभय पक्षांचा कारभार सुरु झाला.

८. महसुलाचे उत्पनन सिद्दी आणि मराठे यांच्यात वाटले जाणार होते. जंजीर दुर्ग आणि नजीकच्या नांदगांव, मुरुउ, श्रीवर्धन, दिवा, म्हसले, अर्धा गोवल या भागात सिद्याचा प्रत्यक्ष. तर तळे, घोसाळे, निजामपुर, बिरवाडी, गोरगाव, अर्ध गोवल या भागात मराठयांचा कारभार अशी दुहेरी व्यवस्था ठरली.

**संदर्भ :**


१. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), पुर्वोक्त, पृ. १८२-१८३

२. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ.२९

३. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. २०६

४. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, पुर्वोक्त, पृ. १३९

५. प्रा. सु. ह. जोशी, डॉ. कुळकर्णी, डॉ. शेळके, प्रा. कुलकर्णी, (संपा.), इतिहास माहीती कोश, पूर्वोक्त,पृ.४७१

६. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, पुर्वोक्त, पृ. १३७

७. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ७०

८. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. २०६

९. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), पुर्वोक्त, पृ. १८३

१०. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), पुर्वोक्त, पृ. १८३

११. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ६७

१२. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), पुर्वोक्त, पृ. १८३

१३. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ६७

१४. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, पुर्वोक्त, पृ. १३७

१५. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), पुर्वोक्त, पृ. १८३

१६. कुलकर्णी अ. रा. (संपा), आज्ञापत्र, पुर्वोक्त, पृ. ६८

१७. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ६७

१७अ. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), पुर्वोक्त, पृ. १८३

१८. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ६६

१९. कुलकर्णी अ.रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ.२९

२०. . गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ४०४

२१. प्रा. सु. ह. जोशी, डॉ. कुळकर्णी, डॉ. शेळके, प्रा. कुलकर्णी, (संपा.), इतिहास माहीती कोश, पूर्वोक्त,पृ. ३३८
२२. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ४०४
२३. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ६६
३४. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. २०६
२५. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ६७
२६. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ६७
२७. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. २०७
२८. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ६७
२९. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ६७
३०. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. २०७
३१. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ६७
३२. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ४०५
३३. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ४०५
३४. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ६७
३५. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. २०८
३६. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. २०८
३७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ६८
३८. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ६८
३९. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ४०५
४०. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ७१
४१. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ४०५
४२. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ७०
४३. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ७०

४४. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ४०५

४५. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ७२

४६. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ४०५

४७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ७६

४८. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ४२०

४९. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ.२८

५० प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ७७-७८

५१. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ७०

५२. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान,पुर्वोक्त, पृ.१७९

५३. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ४०९

५४. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. २१३

५५. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ७१

५६. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. २१४

५७. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. १८०-१८१

५८. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. २१५

५९. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. २१३

६०. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-३३, ले.१३१

६१. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. २१५

६२. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. १८४

६३. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ४२०

६४. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ४२० व

६५. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. १२५

६६. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ४२०

६७. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा), मराठयांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.४४

६८. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. १८४

६९. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा), मराठयांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.४४

७०. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. १८४

७१. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. १२५

७२. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ८१

७३. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ८१

७४. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-२२, ले.१७२

७५. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.६०

७६. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ८१

७७. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा), मराठयांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.४५

७८. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.६१

७९. दीक्षित म .श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ८२

८०. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा), मराठयांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.४५

८१. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ८२

८२. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, पुर्वोक्त, पृ. १८२

८३. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा), मराठयांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.४४

८४. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ८२

८५. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा), मराठयांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.४४-४५

८६. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.१९२

८७. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा), मराठयांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.४५

८८. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.१९२

८९. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.६२

८९अ. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.१९२

९०. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.६२

९१अ.प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ९९

९१. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ८२

९२. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ४२२

९३. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ४२१

९४. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ४२२

९५. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), पुर्वोक्त, पृ. १८८

९६. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.६३

९७. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. १३६

९८. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ८३

९९. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ८३

१००. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ.१००

१०१. ९४. गर्गे. स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड-३, पुर्वोक्त, पृ. ४२२

१०२. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-३३, ले.३९७, पृ. ३३५-३३६

१०३. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-३३, ले.३९८, पृ.३३६

१०४. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. १३६

१०५. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. १३६

१०६. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-३३, ले.४०२, पृ. ३४०

१०७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. ९९-१००

१०८. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, पुर्वोक्त, पृ. १४२

१०९. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-३३, ले.४०२, पृ. ३४०

११०.डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.१९२

१११. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), पुर्वोक्त, पृ. १८८

११२. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ. १०१

## प्रकरण : ६ चिमाजी आप्पाची वसई मोहीम.

६.१ पोर्तूगिज सत्तेचा उदय.

६.२ वसई प्रांताची पार्श्वभुमी.

६.३ पोर्तूगीजांचे हिंदू जनतेवरील अत्याचार.

६.४ मराठयांचे सहायक नाईक घराणे.

६.५ पोर्तूगीजांविरुध्द मराठयांची प्रारंभिक आक्रमणे.

६.६ चिमाजी आप्पाची १७३७ ची (साष्टी-ठाणे) मोहीम.

६.६.१ चिमाजी आप्पाचा ठाण्यावर ताबा.

६.६.२ वसई जिंकण्याचा प्रयत्न.

६.७ चिमाजी आप्पाची वसई मोहीम.

६.७.१ माहीम वर ताबा.

६.७.२ चिचणी हस्तगत.

६.७.३ तारापुरची लढाई.

६.७.४ वसईचा किल्ला.

६.७.५ वसईच्या सभोतालच्या ठाण्यांची प्राप्ती.

६.७.६ इंग्रजांचे दुप्पटी धोरण.

६.७.७ वसईचा संग्राम.

६.७.८ वसई फत्ते.

६.७.८ वसईचा तह ( ५ मे १७३९)

६.७.९ चिमाजी आप्पाचे अभिनंदन आणि कौतूक.

६.७.१० वसई तहाचे महत्वः

## प्रकरण : ६ चिमाजी आप्पाची वसई मोहीम.

बाजीराव पहिला यांनी पेशवाईची सूत्रे हाती घेतल्यानंतर आक्रमक राजनितीचा अवलंब केला. दक्षिणेत गुंतून राहण्यापेक्षा उत्तरेतील प्रदेशावर आक्रमण करण्याचे धोरण पेशव्याने स्विकारले. त्यांच्या उत्तरेतील माळवा व गुजरात मोहिमांमध्ये चिमाजी आप्पाने महत्वाची कामगिरी बजाविली. त्यातही चिमाजी आप्पाने माळवा प्रांतावर स्वारी करून मातब्बर मोगली सुभेदार गिरिधर बहादूर व दया बहादूर यांना अमझेऱ्याच्या लढाईत ठार केले. त्यामुळे संपुर्ण भारतभर चिमाजी आप्पा ला प्रतिष्ठा मिळाली. त्यानंतर गुजरात प्रदेशात चिमाजी आप्पाने स्वारी केली. त्यातुन दाभाडे यांच्याशी झालेल्या संघर्षात चिमाजी आप्पाने महत्वाची भुमिका बजावली. माळवा, गुजरात प्रदेशातील कामगिरीपेक्षाही चिमाजी आप्पाची यशस्वी मोहीम ठरली ती वसई मोहीम. या मोहीमेमध्ये चिमाजी आप्पांच्या अंगी असलेले युध्दनेतृत्व, युध्दनिती, धाडस, तत्परता, मुत्सद्देगिरी इत्यादी कौशल्य दिसुन आले.

### ६.१ पोर्तूगिज सत्तेचा उदय.

पोर्तूगिजांने जुलै १४९७ मध्ये १६० नाविकांची तीन जहाजे वास्को दी गामा यास देऊन इस्ट इंडीया बेटाच्या शोधास पाठविले. दक्षिण आफ्रीकेच्या दक्षिण टोकावर असलेल्या केप-ऑफ-गंड हेपला वळसा घालुन वास्को-द-गामा २३ मे १४९८ ला कालीकत बंदरात पोहचला. इ. स. १५३४ गुजरातच्या सुलतान यांच्या कडून वसई प्रांत पोर्तूगिजांनी हस्तगत केला. त्यानंतर पोर्तूगिज गव्हर्नरने सन १५५९ मध्ये दमनचा किल्ला विजीत केला. इ. स. १५८० च्या सुमारास दमण, दिव, वसई, चौल, मुंबई बेट इत्यादी उत्तर कोकणातील प्रदेशावर पोर्तूगीजाची सत्ता प्रस्थापित झाली.[१] प्रारंभी व्यापारासाठी आलेल्या पोर्तुगीजांनी नंतर राजकीय महत्वाकांक्षेचा पाया कोकणात घातला.[२] युरोपीयन लोकाचा प्रथम प्रवेश पश्चिम किनाऱ्यावरील मलबारास झाला. सोळाव्या शतकात पोर्तूगिजांनी बहुतेक मलबार किनारा विजीत करून तेथे आपले राज्य स्थापन केले.[३] मलबारची राज्य व्यवस्था व तेथील लोकांच्या चालिरिती शिवाय तो प्रांत अगदी वेगळा होता. परिणामी परकीय सत्ता

तेथे स्थापन होण्यास वेळ लागला नाही.[४] गोव्यापासून दमण पर्यतच्या ६५० किलो मिटरचा समुद्र किना-यावरील प्रदेश यावेळी त्यांच्या अधिपत्याखाली होता. या प्रशात अनेक महत्वाच्या ठिकाणी त्यांनी तटबंदी उभारुन संरक्षणाची मजबूत व्यवस्था केली होती.[४अ] गोवा हे पोर्तूगिजाचे सत्तेचे केंद्र बनले. पोर्तुगिजांनी गोवा येथे मुख्य आरमाराचा तळ बनवून तेथूनच पूर्वेकडे अथवा पश्चिमेकडे आवश्यकतेनुसार कूमक पाठवित.[५]

**६.२ वसई प्रांताची पार्श्वभुमी :-**

कोकणचा विस्तार उत्तरेकडील दमण गंगेच्या खोऱ्यापासुन ते दक्षिणेकडील तेरेखोल खाडीपर्यंत आहे. कोकणपट्टीची दक्षिणोत्तर लांबी ७०० कि. मी. व रुंदी ५० ते ६० कि. मी. आहे. सहयाद्रीच्या पश्चिमेस असून या प्रदेशाची रुंदी दक्षिणेकडे अंशत: कमीकमी होत जाते. उलट उत्तरेकडे उल्हास नदीच्या खोऱ्यात रुंदी अधिक म्हणजे १०० कि. मी. पर्यंत आढळते. या सर्व पटीचा आकार गायीच्या कानासारखा (गोकर्ण) वाटतो. त्यावरुन त्याला गोकर्ण/ गोकण्ण/ कोकण असे नाव प्राप्त झाले.[६] सहयाद्री पर्वत आणि अरबी समुद्र यांच्यातील अरुंद पटीला कोकण म्हणतात.[७] कोकणाचे उत्तर कोकण भाग म्हणजे ठाणे व कुलाबा जिल्हा, दक्षिण कोकणात रत्नागीरी जिल्हा, सावंतवाडी संस्थान, गोमांतक, उत्तरकानडा, दक्षिण कानडा, मलबार कोचीन व त्रावणकोर हे प्रांत अनुक्रमाणे येतात.[८] तसेच पश्चिमेस समुद्र किनाऱ्यावर मुख्यबंदरे पूढीलप्रमाणे आहेत. दमण, डहाणू, तारापुर, माहीम, वसई, ठाणे, मुंबई, अलिबाग, जंजिरा, इत्यादि.[९]

'वसई' हा शब्द मुळ संस्कृत असुन 'वास' म्हणजे राहणे या शब्दापासुन तयार झाला आहे. शित्तहर यादवांच्या काळात वसई हे महत्वाचे बंदर होते. पूढे १५ व्या शतकात ते आणखी भरभराटीस आले.[१०] पश्चिम किनाऱ्यावरील चौल (रेवदंडा) बंदर ते दीव दमण मुलूखही पोर्तूगीजांकडेच होता. यास 'नार्थ प्रदेश' म्हणत आणि या प्रदेशात 'वसई जागा बाका बुलंद' होती.[११] वसई हे मुंबई च्या पासुन उत्तरेस ४८ कि. मी. अंतरावर ठाणे जिल्हयात असलेले तालुक्याचे ठिकाण आहे. वसई हे नदीच्या भरती येणाऱ्या रुंद मुखाजवळ वसलेले आहे. वसई हे नैसर्गीक बेट असून जलमार्गास उपयुक्त आहे. वसई बंदरापेक्षा पवित्र स्थान म्हणूनच महत्वाचे होते.[१२] वसई तालुका व

त्याचे पुढे माहीम, केळवे, मनोर, अशीरगड, पुढे शिरगांव, तारापुर व चिचणी इत्यादी बंदरे आहेत. त्यानंतर डहाणू, उंबरगाव, व दमणही ठिकाणे आहेत. वसईच्या उत्तरेशी आगाशी गावाशेजारी आरनाळा किल्ला आहे. तर वसईच्या पुर्व भागात कामणदुर्ग व त्याच्या जवळ राजावल गोरवखे, आचाळे, चिंचोटी, टकमक, मांडवी या गांवाचा उल्लेख कित्येक ठिकाणी येतो. वसई जवळील खाडीवर दक्षिण दिशेला घोडबंदर हे ठिकाण आहे.[१३] हल्लीच्या मुंबई बेटात पुर्वी अनेक लहान लहान बेटे होती.[१४] मुंबई बेट वसईच्या टापुत मोडत असे.[१५] ठाणे जिल्हातील एक तालुका, साष्टी नांवाने इतिहास प्रसिध्द होते. सहासष्ट गावे मिळवून साष्टी निर्माण झाले.[१६] साष्टी बेट मुंबईच्या उत्तरेस असुन साष्टी भागात ठाणे हे महत्वाचे ठिकाण होते.[१७] ठाणे हे मुंबई शहरास लागुन असलेले जिल्हाचे ठिकाण आहे. ठाणे हे बंदर कल्याण नंतरच्या काळात उदयास आले. ठाणे येथे मोठी मोठी खाडी व समुद्र किनारा असूनही प्राचिन काळी बंदर म्हणून ते उदयास आले नाही. जो पर्यंत कल्याण बंदरास विशेष महत्व लाभले नाही.[१८] मुंबईपासुन १२४ कि. मी. उत्तरेस ठाणे जिल्हयातील डहाणू हे तालुक्याचे ठिकाण आहे.[१९] डहाणू हे गुजरातला जवळ असल्यामुळे व्यापारा बरोबरच ते उद्योगाचेही केंद्र बनले होते.[२०] याशिवाय ठाणे जिल्हयातील डहाणू तालुक्यात चिंचाणी हे गाव आहे. मुंबई पासुन ११० किलोमिटर वर असलेले चिंचाणी या उपनगरात प्रामुख्याने कोळीवाडा, भंडारवाडा व वाणीवाडा यांचा समावेश होता.[२१] ठाण्याच्याबाजुने वसईच्या खाडीचा एक फाटा जातो तीच कल्याणची खाडी.[२२] कल्याण हे शहर उल्हासनदीच्या किनाऱ्यापासुन १० ते २० फुट उंचीवर असून विशेष महत्वाची गोष्ट म्हणजे येथील नदीचा प्रवाह भरती ओहोटीच्या गतीशी निगडीत आहे.[२३] कल्याणची खाडी भिवंडीकडे जाते. भिवंडीच्या पलीकडे कांबे, मुंबईच्या पुर्वेस करंजे आहे. करंजेच्या उत्तरेस धारापुरी त्यानंतर तुरंबे हे बेट लागते.[२४] तुरंबेच्या पूर्वेस पनवेल खाडी आहे. पनवेल खाडीच्या मुखाशी बेलापुर किल्ला आहे. साष्टीचा दक्षिण टोक म्हणजे बांद्रा. ब्राद्राच्या पुर्वेस मर ठाणे आहे. अंधेरी पासुन वसई पर्यंत पश्चिम किनाऱ्यास लागुन वर्सोवा, मालाड, धारावी, ही महत्वाची ठाणी आहेत. तर बोरिवलीच्या पश्चिमेस वसईच्या तोडाशी सुमारे एक मैल लांब चिंचोळे बेट असुन त्यात धारावी हे तटबंदीचे स्थळ होते.[२५]

### ६.३ पोर्तूगीजांचे हिंदू जनतेवरील अत्याचार :-

कोकण प्रांतात त्याकाळी सिद्दी, पोर्तुगीज, आंग्रे व इंग्रज इत्यादी अनेक सत्ताचे हितसंबध गुंतलेले होते. त्या सर्वांना आपल्या वर्चस्वाखाली आणने व आपली सत्ता वाढविणे हे छत्रपती शाहु व पेशवा बाजीरावाचे आद्य कर्तव्य होते.[२७] पोतुगीज ही पश्चिमेतील प्रबळ सत्ता. मुंबई कडील साष्टीचा प्रांत म्हणजे पोर्तूगीजांचा चराऊ रान बनले होते. आदिलशाहीशी संघर्ष करुन सतराव्या शतकाच्या प्रारंभी पोर्तूगीजांनी गोव्यात आपली राजसत्ता प्रस्थापीत केली होती. त्यानंतर स्थानिक लोकांचा पाठींबा मिळावा म्हणून पोर्तूगीजांनी ख्रिश्चन धर्माचा जोरदार पुरस्कार केला.[२८] कारण पोर्तूगिज हे कट्टर रोमन कॅथॅलीक ख्रिश्चन असून ते धर्मवेडे होते.[२९] धर्मवेडया पोर्तुगिजांना हिंदूचे धार्मीक रितीरिवाज हे सैतानी वृत्तीचे द्योतक आहे असे वाटत असल्याने त्यांनी आपल्या मुलूखात हे रिती रीवाज जाहीरपणे साजरे करण्यास बंदी घातली.[३०]

पोर्तूगिज हिंदू जनतेवर अन्याय, अत्याचार करीत असत. हिंदूना जबरदस्ती ख्रिश्चन बनविण्यासाठी त्यांनी अनेक कायदे बनविले. त्यानंतर त्याची अंमलबजावनी साष्टी प्रांतात सुरु केली. त्यामूळे त्याप्रांतातील हिंदूची स्थिती अतीशय दयनीय होती.[३१] विशेष म्हणजे पोर्तुगिजांने औरंगजेबाच्या अत्याचाराला लाजवेल असा भयंकर अत्याचार हिंदू प्रजेवर चालविला होता.[३२] हिंदू जनतेवर व स्त्रियांवर पोर्तुगीजांनी किती अत्याचार चालविले होते त्याविषयी ना. के. बेहरे लिहितात, "तरुण मुलींनां पाद्री व त्याच्या लावणीने शेफारलेले बाटे भर रस्त्यातुन ओढून नेऊन आपल्या घरात घालु लागले.ख्रिस्ती लोक निर्माण करण्याचे कारखाने ठिकठिकाणी खोलण्यांत आले. किनाऱ्यावरील हिंदूवर छापे घालुन त्यांना पकडून, जहाजांत बसवून दुरदुरच्या देशात गुलाम म्हणून विक्रीकरिता किंवा फुकट खाण्याकरिता पाठविण्यांत येऊ लागले."[३३]

जेव्हा वास्को- दी-गामा भारतात आला त्यावेळी हिंदूस्थानातील लोकांना आपण ख्रिश्ती बनवू असे पोर्तूगीजांना वाटत होते. म्हणून पोर्तुगिजांनी आपल्या धर्माच्या प्रसारासाठीच इ. स.१५६० मध्ये धर्मशासन मंडळ गोवा येथे स्थापना केला.[३] त्यानंतर त्यांनी हिंदू जनतेवर मोठया प्रमाणात अत्याचार सुरु केला. पोर्तुगिजांच्या या धार्मीक अत्याचाराचे उल्लेख अनेक इतिहासकारांनी आपल्या ग्रंथात केले आहे. इतिहासकार मंडलीक यांने अशाच प्रकारे मत व्यक्त केले आहे, "पोर्तूगिजाने फ्रेंच

व इंग्रज यांच्या प्रमाणे व्यापार वृध्दीवर व राजकारणावर जास्त लक्ष न देता गोव्यात व केरळ मध्ये आपले धर्मप्रसाराचे कार्य शेवट पर्यंत सुरु ठेवून येथील मोठ्या प्रमाणीतील हिंदूना ख्रिस्ती केले."[३५] सरदेसाई पोर्तूगिज यांच्या अत्याचाराच्या संदर्भात लिहितात, "पोर्तूगिज यांनी वसई, मुंबई ठिकाणे काबीज केली. तेव्हा इकडील पूष्कळ लोकांस त्यांनी बाटवून ख्रिश्ती केले. विशेषत: ब्राम्हण प्रभू वगैरे उच्चवर्णीय जातीचे लोकांवर त्यांनी कहर केला."[३६] पोर्तूगिजांच्या जबरदस्तीने धर्मांतर करण्यांच्या धोरणामुळे मुंबईत हिंदू लोकांची फारशी वस्ती नव्हती.[३७] त्यातही पोर्तुगीजांनी अनेक उपायनी गोवा व वसई प्रांतात लक्षावधी हिंदूना वाटवून ख्रिचन केले होते.[३८] साष्टी गांवाचे व आगर वसईचे बहुतेक लोक धरुन वाटविले.[३५] पोर्तूगीजांचे अत्याचार साष्टी व वसई भागात जास्त होते. तेथे हिंदूचे पुरुष घरी नसल्यास त्यांच्या मुलांना बाटविले जात. पुरुषांबरोबरच मुलांना सुध्दा बाटविण्यांचे धोरण पोर्तूगीजांनी अंगिकरले होते.[३९]

थोडक्यात पोर्तुगीजांच्या वर्चस्वाखाली वसई प्रांताचे ख्रिस्तीकरण एकाच तत्वावर झाले ते तत्व म्हणजे ज्यांचे राज्य त्यांचा धर्म हे होय.[४०] विशेष म्हणजे दक्षिणेकडेचा गोवा, साष्टी व बारदेश आणि उत्तरेकडचा वसई म्हणजे पोर्तूगीजांचे धर्मराज्य होते.[४१] यावेळी साष्टीत ठाणे, भिंवडी, कल्याण पर्यंत पोर्तुगीजांनी हातपाय पसरविले होते. शिवाय ते फार उंडारले तेव्हा पेशवा बाजीराव यांने मनावर घेतले.[४२] परिणामी छत्रपती शाहु व बाजीराव यांनी पोर्तूगीजांना धडा शिकविण्यासाठी कोकणात मोहीम काढली. आणि यासाठी चिमाजी आप्पाला पोतूगिजांविरुध्द रवाना केले.[४२अ] चिमाजी आप्पाच्या वसई मोहीमेत अनेक मराठा सरदारानी व व्यक्तीनी महत्वाची भूमिका बजाविली. त्या पैकी एक अणजूरकर नाईक घराणे होय.

### **६.४ मराठयांचे सहायक नाईक घराणे.**

पोर्तुगीजांविरुध्दच्या लढयात ज्या महत्वाच्या व्यक्तींनी व घराण्यांनी मदत केली, त्यात अणजुरकरचे नाईक घराणे महत्वाचे होय. कल्याणजवळ अणजुर नांवाचे प्रसिध्द गांव होते. तेथे पठारे क्षत्रीय राहत असून त्यांना तेथे महत्व होते. या पठारे परिवाराचे प्रमुख निबांजी नाईक.[४३] निंबाजी नाईक पोर्तूगिजांच्या अत्याचारांविषयीची तक्रार घेऊन इ.स. १६८३ मध्ये छत्रपती संभाजीकडे

गेले होते. तेव्हा राजे संभाजी यांनी त्यांच्या मदतीसाठी सैन्य रवाना केले. त्यावेळी पारशिक गडी उतरुन पाचशे सैनिक अणजुरच्या किनाऱ्यावर आले होते. परंतू याच वेळी मोगल बादशाहा औरंगजेबानी मराठा सत्तेवर आक्रमण केल्यामुळे छ.संभाजीने निबांजी नाईकांना मदत करण्यास पाठविलेली मोहीम अर्धवटच राहीली.[४४]

याकाळात पोर्तुगिजांचा त्रास जसा मराठा सत्तेला होता, तसाच तो हिंदू जनतेलाही होताच. मुसनमान यांच्या प्रमाणेच पोर्तूगिज हे हिंदू जनतेवर अन्याय-अत्याचार करीत असत. परिणामी शिवाजी महाराजांनी स्वराज्य निर्माण करण्यापुर्वी हिंदूची गाऱ्हाणी ऐकणारे कोणीच नव्हते. परंतू स्वराज्याने ती अडचन दूर झाली. पेशव्याच्या काळात तर कोकणातील भिंवडी-कल्याण प्रांतातील वतनदार पुढे आले. त्यांनी पेशव्यांकडे पोर्तूगिजाना धडा शिकविण्यासाठी राजकारण सुरु केले. त्यात अणजुरकरचे पठारे घराणे प्रमुख होते.[४५] छत्रपती शाहु महाराजांच्या कारकिर्दीतही पोर्तुगिजांचे हिंदूवरील अत्याचार सुरुच होते. तेव्हा कल्याण प्रांतातील अणजुरकर गांवाचा प्रमुख गंगाजी नाईक यांनी छत्रपती शाहु, पेशवा बाजीराव व चिमाजी आप्पाची भेट घेतली. त्यावेळी त्यांने विनंती केली की, "प्रांत सर करुन स्वधर्मस्थापना करुन आमचे वतन आम्हास परत द्यावे. या कार्यास लागणारी मदत आम्ही करतो."[४६] गंगाजी नाईक यांने इ. स. १७२२ मध्ये बाजीराव पेशव्यांची भेट घेतली. तेव्हांपासुन विविध प्रकारची निती अवलंबुन नाईकांने साष्टीतील पुढारी लोकांना मराठयांकडे वळविले. नाईकांने पोर्तूगीजांचा पाडाव करण्यासाठी ठिकठीकाणच्या माऱ्यांच्या जागा व गुप्तवाटा रामचंद्र महादेव व इतर प्रमुख मराठे यास दाखवून दिल्या.[४७] त्याचा मराठयांना खुप फायदा झाला. यावेळी मालाडचा जमीनदार अंताजी रघुनाथ कावळे हा या खटपटीत सामील झाला. त्यामुळेच या खटपटीला जोर आला. त्यानंतर कावळे यांनी बाजीरावाशी पत्र व्यवहार केला.[४८] एवढेच नव्हे तर त्याभागातील, त्यांनी मराठयांना सांगितले की, 'किल्ले, जंजीरे, वसई व कोट ठाणे या जागाचे लाग, भाग व खाडीचे उत्तार व मार्ग आम्हांस माहीत आहे. वा ठाणे व वसई भागातील कोटाचे भाग आमच्या स्वाधीन आहे.[४९] तेव्हा महाराज शाहू व पेशवा यानी त्यांना मदतीचे आश्वासन दिले. तसेच पोतूगिजांविरूध्द स्वारी करण्याचा निणर्य घेतला. त्यापुर्विपासूनची मराठयांची पोतूगिजांशी मराठयांचा संघर्ष सुरु होता.

## ६.५ पोर्तूगीजांविरुध्द मराठयांची प्रारंभिक आक्रमणे.

मराठा सत्तेच्या अनेक वर्षापूर्वी पोर्तुगीज सत्तेची स्थापना महाराष्ट्राच्या पश्चिम किनाऱ्यावर झाली. छत्रपती शिवाजीच्या काळापासुन मराठे- पोतुगीज संघर्ष सुरु झाला. छत्रपती शाहुच्या काळापर्यंत अनेकवेळा मराठा- पोर्तूगिज यांच्यात संघर्ष झाला. परंतू त्यामुळे पोर्तुगिजांना आळा बसला नाही. अधून मधून पोर्तूगिजांचा त्रास मराठयांना सहन करावा लागला.[५०] इ.स.१७१९ पेशवा बाळाजी विश्वनाथाने मोगल बादशाहाकडून दक्षिणेतील सहा सुभ्याच्या चौथई-सरदेशमुखी वसूलीच्या सनदा आणल्या होत्या. त्या शाहु महाराजांच्या नांवे झाल्यावर छत्रपती शाहुने रामचंद्र महादेव जोशी चासकर यास कल्याणवर पाठविले. ऑगष्ट १७१९ रोजी त्यांने कल्याण व भिवंडी जिंकूनही घेतली.[५१] याकाळात आंग्रे व इंग्रज यांच्यात संघर्ष सुरु होतां. तेव्हा पोर्तूगीजांनी इंग्रजांना मदत केली असता छत्रपतीने रामचंद्र जोशी यास पोर्तूगिजांना मदत करण्याचा आदेश दिला. यावेळी पोर्तूगीजानी मराठयांशी एक स्वातंत्र तह केला.[५२] याचवेळी पावसाळा सुरु झाल्यामुळे कृष्णा चासकर घाटावर आला. त्यानंतर काही काळ मराठा- पोर्तुगिज संघर्ष थांबला होता.

### पिलाजी जाधव यांची मोहीम

पोर्तूगीजांच्या विरुध्द अणजुरच्या गंगाजी नाईकाने मराठयांना सहकार्य करण्यांचे धोरण अंगीकारले होते. त्यांनी मराठयांना वसई भागातील गुप्त वाटा, घाटाचे चढउत्तार याची माहीती दिली होती. हया माहीतीच्या आधारे १५ नोव्हे. १७२३ रोजी पिलाजी जाधवाने वसई प्रांतावर अचानक हल्ला केला.[५३] हा प्रांत आपल्या राज्याचा प्रांत आहे या सबबीवर पिलाजीने चार हजार सैन्यासह हल्ला चढविला होता.[५४] यावेळी वसई शहरच मराठयांच्या हाती येणार होते. परंतू मराठयांनी वसई जवळचा गोखीरवे हे गाव जाळून उदध्वस्त केल्याची बातमी पोर्तूगीज अधिकारी यांना मिळाली. तेव्हा पोर्तूगीजाने वसईची नाकेबंदी केली .परिणामी मराठयांना वसई जिंकता आली नाही. उलट मराठयांच्या या कारवाईला जशास तसे या न्यायाने कारवाई करून पोर्तुगीजांनी मराठयांचे तळोजा वैगेरे गावातील ही लोकांना ठार मारले व काहीना कैद केले.[५५] जेव्हा पेशवा बाजीरावास ही वार्ता समजली तव्हा त्यांनी पोर्तूगिजांचा सुड घेण्यांची भुमीका घेतली. त्यामुळे पोर्तूगीजांनी माघार घेतली.

परीणामी मराठा -पोर्तुगीज यांच्यात तडजोठ झाली व त्यांच्यात कांबवे या गावी १० जानेवारी १७२४ रोजी पुन्हा एकदा तह झाला.[५६] त्यातहामुळे काही काळ मराठा-पोतूगीज संघर्ष थांबला होता. त्यानंतर निजामाचा बंदोबस्त होईपर्यंत पेशवा बाजीरावाने पोर्तूगीजांना दु:खविले नाही.

इ. स. १७२८ च्या मार्च मध्ये निजामाचा बंदोबस्त केल्यानंतर मे १७२८ मध्ये पिलाजी जाधवाने पोर्तूगीजांच्या दमण प्रांतातील दोन गावे जिंकली. त्याचा सुड म्हणून ऑगष्ट मध्ये पोतूगीजाने कल्याण प्रांतावर हल्ला केली.[५७] यावेळी कल्याणचा सुभेदार रामचंद्र महादेव जोशी मृत्यू पावला.[५८] तेव्हा त्याचा भाऊ कृष्णकांत जोशी कल्याणचा सुभेदार बनला. मात्र कृष्णराव हा रामचंद्रप्रमाणे चाणाक्ष नव्हता. यावेळी पोर्तूगीजांनी कल्याणच्या दुर्गाडी किल्ल्यावर हल्ला चढविला असता अणजुरकरचे गंगाजी नाईक, शिवाजी नाईक व नारायणजी नाईक यांनी फार पराक्रम केला. त्यांनी कल्याणच्या किल्यावरील तोफा दुगार्डी वर नेऊन पोर्तूगीजांवर तोफ डागली आणि त्यांचा पराभव केला. त्यामुळे कल्याणचा किल्ला सुरक्षित राहीला.[५९]

इ.स.१७३० च्या मे महिन्यांत पिलाजी जाधव यांच्या नेतृत्वाखाली मराठयांनी पुन: पोतूगीजांवर हल्ला चढविला. भिवंडी जवळील कांबवे येथे पोर्तूगीजांचा किल्ला घेण्यासाठी मराठयांनी किल्ल्यास वेढा दिला. याचवेळी पोतूगिजांचा रक्षणसाठी दोन गलबते आली होती. मराठयांनी मोठया हिंमतीने ती पकडली. त्यात असलेला दारुगोळा व तोफा मराठयांनी ताब्यात घेतल्या. त्या तोफाच्या सहाय्याने मराठयांनी किल्यावर हल्ला चढविला. परिणामी पोर्तूगीजांनी मराठयासमोर शरणागती पत्करली. याचवेळी पिलाजी जाधव व कृष्णाजी महादेव यांनी २७ फेब्रुवारी १७३१ रोजी मनोहरपुरच्या युध्दात पोर्तूगीजांना पराभुत केले. तेव्हा त्यांच्या कडून मराठयांनी १२ तोफा व इतर युध्द साहीत्य मिळविले.[६०] त्यानंतर मराठयांनी साष्टीवर हल्ला चढविला. यावेळी मराठे साष्टी जिंकणार असे दिसत असतांना इंग्रजांची सातशे सैनिकांची तुकडी पोतूगीजांच्या मदतीस आली. परीणामी मराठयांना साष्टी येथून माघार घ्यावी लागली.

इ.स. १७३० च्या पावसाळयात शंकराजी केशव, गंगाजी नाईक यांनी वसईवर छापा घालण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या मदतीला बाजी भिवराव व रामचंद्र जोशी आलेत. मात्र पोर्तूगीजांच्या जागरुकते पुढे त्यांचा प्रयत्न फसला. मात्र मराठयांनी बहादुर येथे मोर्चा कायम ठेवला.

हा वेढा चालु असतांनाच गंगाजी नाईक, सयाजीराव सुर्वे आणि बाजीराव बेलासे यांच्या पुढाकाराने २८ मार्च् रोजी वसईला लागुन आठ मैलावर उत्तरेस एका लहानश्या बेटावर असलेला कर्नाळा व जंजीरा काबीज केला.[६१]

### ६.६ चिमाजी आप्पाची १७३७ ची (साष्टी-ठाणे) मोहीम :-

इ. स. १७१९ पासुनच मराठा-पोर्तूगीज वैर निर्माण झाले. परंतू १७३७ पर्यंत त्यात शत्रुत्वांची तीव्रता कमी होती.[६२] मात्र मानाजी आंग्रे व संभाजी आंग्रे यांच्यातील संघर्ष सुरु असतांनाच पोर्तूगीजांनी ठाणेच्या कोटाचे बांधकाम सुरु केले होते. हा किल्ला साष्टी बेटातील सर्व पोर्तूगीजांना प्रसंगी आश्रयस्थान व्हावा. साष्टी बेटातील सर्व वाटा रोखून धराव्यात अशा स्वरुपाची रचना करणारा नकाशा तयार करण्यांत आला.[६३] इ. स. १७३१ साली पोर्तुगीजाने ठाणे किल्ला बांधण्यास प्रारंभ केला.[६४] कारण दोन्ही पक्षांना कळून चुकले होते की, सन १७२३ चा तह कायम टिकणे शक्य नाही. मराठे आज ना उद्या आपल्यावर आक्रमण करणार हे जाणून पोर्तूगीजांनी स्वसंरक्षणाची तयारी सुरु केली.[६५] याकाळात पोतुगीजांच्या अत्याचाराला त्रस्त होवून वसई व साष्टी भागातील गंगाजी नाईक यांच्या कडील व्यक्तींनी पेशवा बाजीराव, चिमाजी आप्पा व शाहु महाराज यांच्याकडे सातारा येथे जाऊन वसई प्रांतावर स्वारी करण्यास प्रवृत्त केले.[६५अ] तेव्हा पेशवा बाजीराव यांने ठाण्याच्या कोटाचे बाधंकाम पुर्ण होण्यापुर्वीच साष्टीवर हल्ला करुन ते बेट जिंकूण घेण्याचे ठरविले. परीणामी १७३६ मध्ये सिद्दीचा पराभव केल्यानंतर पेशव्याने पोर्तूगीजांविरुध्द मोहीम हाती घेतली.[६६]

पोर्तूगीजांचा बंदोबस्त करण्यांची कामगिरी पेशवा बाजीराव यांने आपला धाकटा बंधू चिमाजी आप्पावर सोपविली होती.[६७] कारण राजकारण व रणकारण या दोन्ही कडे बाजीरावाला लक्ष देता यावे म्हणून पेशवा बाजीरावाने वसई लढाईचे सुत्र स्वतःकडे न घेता लहान बंधू चिमाजी आप्पाकडे दिले. मात्र त्यामागे कातडी वाचविण्याचा बाजीरावाचा उद्देश नव्हता.[६८] दुसरे कारण हेही होते की, बाजीरावाने निजामाचा बंदोबस्त केला असता तरी उत्तर भारतातील स्थिती अद्यापही अस्थीर होती. त्यावर बाजीरावाचा डोळा होता. ज्या पोर्तुगिजांच्या विरुध्द आप्पा स्वारी करणार होते, त्या प्रदेशाचे वर्णन दिक्षितांनी पुढील प्रमाणे केले आहे. 'ज्या युध्दभुमीवर साष्टी वसईचा मुक्ती

संग्राम खरे तर धर्मसंग्राम पेटत जाणार होता. ती भुमी अतिशय प्रतिकुल व अडचणीची होती. लहान मोठया खाडया, नदी नाले आणि भुसभुशीत जमीन या गोष्टी सैनिकाचा हालचालीस अडथळे उत्पन्न करणाऱ्या असतात."[६९] अशा अवघड प्रदेशात बाजीराव यरंनी आपल्या धाकटया भावाची नेमणूक केली होती. पेशवा बाजीराव यांनी युध्दाची तयारी करण्यासाठी शंकराजी फडके यास हुकुम केला. तेव्हा कल्याण येथे भवानी मातेच्या गोंधळाचे निमित्य करुन कल्याणच्या परिसरात मराठयांचे बरेच सैन्य जमा करुन त्यांना कामे ठरवून देण्यांत आली.[७०] तसेच लष्करांची जमवाजमव व हालचाली गुप्तपणे व्हावी यासाठी त्याने शंकराजी फडके, रामचंद्र हरी, चिमणाजी बापुजी, अणजुरकर यांना पुढे रवाना करुन मोहीमेची तयारी चालविली.[७१]

### ६.६.१ चिमाजी आप्पाचा ठाण्यावर ताबा.

पोर्तुगीजांविरुध्दच्या मोहीमेचे सर्व सुत्रे पेशवा बाजीरावाने लहान भाऊ चिमाजी अप्पाकडे सोपविली होती. वसई मोहीमेसाठी चिमाजी आप्पांने आपल्या सैन्याचे दोन विभाग केले. त्यापैकी खंडोजी माणकर व दानाजी बलकवडे यांच्या नेतृत्वाखाली साष्टीवर फौज जाणार होती.[७२] त्यापैकी एका तुकीडीने वसई जिंकण्याचा प्रयत्न केला. तर दुसऱ्या तुकडीने वसईच्या आसपासचे किल्ले जिंकावे असे ठरविण्यांत आले.[७३] बाजीरावाने पोर्तुगिजांविरुध्दची मोहीम अणजुरकरचे गंगाजी नाईक, बापुजी श्रीपत, वासुदेव जोशी यांच्याशी सलामसलत केल्यानंतर सुरु केली.[८४] २४ मार्च १७३७ रोजी चिमाजी आप्पा पूण्याहुन स्वारीस निघाला.[७४] पूढे शंकराजी केशव, मोराजी शिंदे, चिमणाजी भिवराव इत्यादी सरदार चिमाजी आप्पांना येऊन मिळाले.[७५] २६ मार्चला रात्री चिमाजी आप्पाची फौज ठाण्याजवळ पोहचली तेव्हा लुई दी बोथेलो झोपला होता.[७६] चिमाजी आप्पाच्या वसई स्वारीच्या आघाडीवर बुवाजी नाईक अणजुरकर, त्याचा भाऊ मुरारजी नाईक व आणखी दोन अणजुरकर बंधू होते. यावेही एका हस्तकाने किल्ल्याच्या बुरुजा जवळच पहारेकऱ्यांना अफु पाजून ठेवली होती. तेव्हा त्वरीत नाईक बंधूनी ठाण्यांचा एक बुरुज जिंकुन घेतला व ठाण्यात प्रवेश करून त्यांनी संकेताच्या दोन तोफा उडविल्या.[७७] ज्यावेळी तोफेचा आवाज आला तेव्हा चिमाजी आप्पा बेलापुरास होते. रात्रीचा गुप्त छापा टाकूण खाडीच्या तोंडावर असलेला बुरुज आपल्या टोळीने

जिंकल्यांचा तो संकेत होता. तेव्हा जलद गतीने चिमाजी आप्पा निघाला व कळव्यास पोहचला.[७८] तोफाच्या आवाजाने पोर्तुगीजाचा ठाण्याचा किल्लेदार बोथेलो जागा झाला व भावी संकटाला तोंड कसे द्यावे या विवंचनेत पडला. वास्तविक मराठे सैन्य साष्टीकडे येत आहे, असे असतानाही किल्लेदार गाफील राहीला कसा, याचा निटपणे उलगडा होत नाही.[७९] यावेळी आप्पा सैन्यासह दाखल झाल्याने सर्व सैन्य खाडी ओलांडून पलीकडे बेटात घुसले. मराठे ठाण्यांत घुसल्याचे समजताच पोर्तुगीजांमध्ये घबराहट निर्माण झाली. त्यामुळे एक तुकडी किल्ला लढविण्यासाठी ठेवून गव्हर्नर व त्यांचे अधिकारी आपल्या बायकामुल्यांना घेऊन करंजेस पळून गेले.[८०] वास्तविक यावेळी पोर्तूगीज सैन्याच्या सहा कंपन्यानी मराठयांशी लढावयास पाहीजे होते परंतु लढण्यांऐवजी त्या करंजेस पळून गेल्या.[८१] परिणामी मागे ठेवलेल्या तुकडीला धीर राहीला नाही. दुसऱ्या दिवशी राहीलेल्या सैनिकांनेही तोच मार्ग स्विकारला. यावेळी पोर्तुगीज सैन्य भयग्रस्त होवून सामान सुमान तेथेच टाकून तेही चालते झाले.[८२]

२७ व २८ मार्च १७३७ ला पोतुगीजांचे मुख्य सैन्यही पळून गेले. परिणामी सर्वच मराठी फौज साष्टी बेटात घुसली व त्यांने शहराचा ताबा घेतला.[८४] याविजया वेळी पोतूगिज थोडे सावध नव्हते. त्यासंबंधी प्रा. पुराणीक म्हणतात, "मराठासारख्या सामर्थ्यांशी हार्डवैर पडले असता पोर्तुगीजांनी आठही प्रहर जागृत असायला हवे होते, हे त्यांच्या सारख्या सावध व चतुर शत्रुंना सांगणे म्हणजे जाणत्याला प्रवचन करण्यासारखे उपहासपद होते."[८५] ठाणे काबीज केल्यानंतर आता फक्त बेट व आसपास पोर्तुगिजांच्या चौक्या व गढया हस्तगत करावयाच्या राहील्या होत्या.[८६] हा मराठयांचा अतिशय महत्वाचा होता त्यातही चिमाजी आप्पांचा हा पोतुगिजांविरूध्दचा पहीलाच विजय होता. त्यामुळे चिमाजी आप्पाने साष्टीवर मिळविलेल्या विजयाची वार्ता गूरू ब्रम्हद्रेस्वामीस कळविली. चिमाजी आप्पा लिहीतात, "स्वामीच्या आर्शीवादे करुन पुण्याहुन स्वार होवून ठाणे हस्तगत केले. वानेरे, वेसावे, बेलापूर हे जागे फार बळकट आहेत. तेथीलही उपाय करु, जे होणे ते स्वामीच्या आशिवादे होईल. वसई जवळ फौज जाऊन बसली आहे."[८७] चिमाजी आप्पाच्या या पत्रावरून आप्पांनी मिळविलेल्या विजयाची माहीती तर मिळतेच त्याच बरोबर आप्पाची पुढील योजना काय होती हे स्पष्ट होते.

### ६.६.२ वसई जिंकण्याचा प्रयत्न.

चिमाजी आप्पाच्या नेतृत्वाखाली एका फौजेने साष्टीवर हल्ला केला त्याचवेळी दुसऱ्या एका तुकडीने वसईकडे कुच केले होते. साष्टी बेट घेण्यांस अचानक हल्याची जी युक्ती अंमलात आणली त्याच पध्दतीने वसई जिंकण्यांचे ठरले होते. या कार्यासाठी माहुलीच्या रानात शंकराजीपंत यांच्या नेतृत्वाखाली लोक जमा होऊ लागले.[८८] २६ मार्चला संध्याकाळी हे सैन्य राजावलीच्या उतारावर येऊन पोहचले.[८९] मात्र पोर्तुगीजांना मराठी सैन्य आल्याची चाहुल लागली. तेव्हां पोर्तूगीजांच्या एका चौकीने मराठा सैन्यास रोखले असता झालेल्या चकमकीमुळे शत्रु पक्ष जागा झाला. परीणामी पोतूगीजांने वसईच्या सरक्षणांसाठी भक्कम तयारी केली. यावेळी शंकराजी पंताने उताराखाली दीडसे लोकांची टोळी रवाना करुन तिला चौकी मारण्याचा हुकुम दिला. तसेच स्वत: शंकराजीपंत पापडी मानिकपुरहुन कोटा बाहेर येऊन पोहचला. परंतू वसई सारख्या भक्कम किल्ला जिंकणासाठी तो आला नव्हता. शिवाय त्यासाठी आवश्यक ते साहीत्य नसल्यामुळे त्यांनी आप्पाकडे युध्द साहीत्याची मागणी केली. परंतू मदत येण्याअगोदर वसईच्या आजुबाजूची लहान लहान ठाणी जिंकुन घेण्याचे त्यांनी ठरविले.[९०] याचवेळी शंकराजी पंतच्या मदतीला बाजी भीवराव व रामचंद्र आलेत.[९१] वसई किल्ला अतिशय मजबुत होता. त्याच्या आजुबाजुचे खोपरे, आगाशी, अर्नाळा, वेसावे, तारापुर किल्ले घेतल्याशिवाय वसई जिंकता येणार नव्हती. परंतू ते आधी जिंकून घेणे शक्य नव्हते.[९२] वसईचे महत्व लक्षात घेऊन पोर्तुगिजांनी त्या किल्याचा सरंक्षणाची व्यवस्था चोख केली होती. यातच कोणीतरी अफवा पसरविली की, मराठयांने आसपासचे गांवे जिंकलीत. परिणामी पोर्तुगिजांनी चौक्यांची विशेष खबरदारी घेतली.[९३] तेव्हा मराठयांनी वसईवर छापा घालण्याचा प्रयत्न केला. परंतू पोतुगीजांच्या जागृतीमुळे त्यांना यश मिळाले नाही.[९४]

वसई जिंकण्यास मराठयांना अपयश आले तरी यावेळी इतर काही ठाणी व किल्ले जिंकण्यात मराठे यशस्वी झालेत. वसईच्या उत्तरेस आठ मैलावर लहानशा बेटावर अर्नाळा किल्ला आहे. हा किल्ला जिंकून घेणे मराठयांना अतिशय महत्वाचे होते. वास्तविक पोर्तुगिजांना या किल्याचे महत्व वाटत नव्हते. परंतू मराठयांना तेथे आरमारी तळ उभारण्याची आवश्यकता वाटत होती. कारण तेथे तळ उभारल्यास मराठयांचा फायदा होईल असे मराठयांना वाटत होते.[९५] अंणूजरकर,

बेलासे, सुर्वे यांच्या चारशे लोकांच्या टोळीने २८ मार्च रोजी अर्नाळा काबीज केला.[९६] अर्नाळा प्रमाणेच १ एप्रिलला जीवधन, ८ एप्रिलला टकमक, १ मे ला मांडवी, १९ मे ला मनोर, इत्यादी ठाणी मराठयांनी सहज जिंकलीत.[९७] २८ एप्रिलला मराठयांनी बेलापुरचे ठाणे घेतल्यानंतर जुन महीन्यात कल्याण जवळील सांताकृझ काबीज केले.[९८] धारावी हे वसईवर वर्चस्व प्रस्थापित करण्यांच्या दृष्टीने महत्वाची होते. 'वसईचा नाका धारावी जाग आहे तो जागा मजबुत होये असा विार केला पाहीजे. धारावीस दहा तोफा ठेवून वसईवर लागु केलीया वसई हात बांधुन येईसारखे आहे'.[९९]

यावेळी मराठयांनी वानरे व वेसावे ठाणी जिंकण्यांचा प्रयत्न केला. साष्टीच्या सुरक्षेसाठी ही दोन ठाणी महत्वाची होती. होनाजी बलकवडे यांच्यावर वेसावे जिंकण्यांची जबाबदारी होती.[१००] साष्टीच्या ठाण्यावर वर्चस्व प्रस्थापित झाल्यावर बेटातील उरलेल्या तटबंदीच्या जागा आणि वानरे बेसावे ही बंदरे घेण्यासाठी सैन्याला रवाना करण्यात आले.[१०१] बलकवडे यांचे दोन तीन जबरदस्त हल्ले पोर्तूगीजानी परतवले. यावेळी मराठयांनी किल्यातील लोकांना मिळणारे पाणिही बंद करुण पाहिले. परंतू पोर्तूगीजाने किल्यावर पाणि साठविण्याची सोय केलेली असल्यामुळे मराठयांचा तोही प्रयत्न कुचकामी ठरला.[१०२] परीणामी तीन चार महिने मेहनत घेवूनही मराठे वेसावे जिंकु शकले नाही. पोर्तुगीजाने अतिशय परकाष्ठा करुन मराठयांचे हल्ले परतुन लावले. वेसावे आपण जिंकु शकत नाही असे दिसताच होनाजी बलकवडे, खंडोजी मानकर यांच्या मदतीसाठी बांद्रास गेले. त्या दोघांनी बांद्रा जिंकण्यासाठी हल्ले केलेत, परंतू त्यांना यश मिळाले नाही. कारण बांद्रयाचा किल्लेदाराने किल्या वाचविण्यासाठी प्रयत्नाची पराकष्ठा केली. तसेच पोतुगीजांना यावेळी इंग्रजांची मदत मिळत असल्यामुळे मराठयांना मे अखेर माघार घ्यावी लागली.[१०३]

दरम्यानच्या काळात मराठयांनी आसपासची मालाड, तुरंबे, मरोळ इत्यादी ठाणी एकामागून एक जिंकून घेतली. करंजाकडून ठाण्याच्या बंदराकडे शत्रू आल्यास अटकाव व्हावा म्हणून ठाण्याच्या पुर्वेस ३ मैलावर असलेले पारसिक हस्तगत करणे आवश्यक होते. ही कामगीरी नारायण जोशीकडे देण्यात आली. त्यांने ३ एप्रिल ला पारसिक जिंकून घेतले.[१०४] अशाप्रकारे चिमाजी आप्पाच्या सैन्याने सर्व बेट व्यापले. जून महिन्यांत मराठयांनी कल्याण जवळील सांताकृज ही ठाणी जिंकली.[१०५]

परंतू याचवेळी पावसाला सुरु झाल्यामुळे चिमाजी आप्पा पुण्यांस परत निघाला. त्यापुर्वी शंकराजीपंत, मोराजी शिंदे व गंगाजी नाईक यांची वसईवर, खंडोजी मानकर, रामचंद्रपंत ठाण्यास तर नारायण जोशी यांस बेलापुरास याप्रमाणे बंदोबस्ताची व्यवस्था ठेवली होती.[१०६] तर मनोर येथे विठ्ठलपंतास बंदोबस्तासाठी ठेवण्यांत आले होते.[१०७] तसेच ठिकठिकाणी आपले कामगार व सैन्य ठेवून पावसाळयापुर्वी चिमाजी आप्पाने पुण्यांस निघाला.[१०८] चिमाजी आप्पा १ जुले १७३७ चिमाजी आप्पा पुण्यांस ला परत आला.[१०९] यानंतर जवळजवळ दीडवर्ष पावेतो कोकणाच्या कार्याभागाकडे आप्पास लक्ष देता आले नाही.[११०]

**६.७ चिमाजी आप्पाची वसई मोहीम.**

चिमाजी आप्पाने पहील्या मोहीमेत पोर्तुगिजांचे अनेक किल्ले जिंकूण घेतले त्यामुळे पोर्तुगिजांची शक्ती कमजोर झाली. परंतू चिमाजी आप्पांच्या या मोहीमे नंतर पोर्तूगिजांनी जय्यत तयारी केली. कमकुवत लोकांना कमी करुन त्याजागी नविन कर्तूत्वान व्यक्तीची भरती केली. शिवाय अनेक ठिकाणी तोफा व आगीचे सामान पाठविले.[१११] म्हणजेच पोर्तुगिजांनी संरक्षणाची भक्कम तयारी चालविली होती.

इ. स. १७३८ हा काळ मराठयांसाठी अतिशय अनुकूल होता. निजाम अथवा उत्तरेकडील स्वाऱ्याचे नियोजन नव्हते. त्यामुळे मराठयांचे सर्व सरदार व सैन्य वसई मोहीमेत गुंतले होते.[११२] चिमाजी आप्पा नुकतेच खानदेशातून परत दक्षिणेत आला. पेशवा बाजीराव व चिमाजी आप्पा यांनी पोर्तूगिजांकडे लक्ष केंद्रीत केले. यावेळी उत्तर कोकणात पोर्तूगिज जे झुंजत ते त्यांना गोवा व दमण येथून जी मदत मिळत होती त्या भरोशावर. म्हणून त्यांची गोवा येथील रसद तोडण्यांची योजना यावेळी आखण्यात आली. त्यासाठी व्यंकटराव घोरपडे व दादाजीराव भावे यांची नेमणूक करण्यात आली. तर दमनकडे शंकरराजी केशव यांची रवानगी करण्यात आली. अशी सर्व बाजूंनी नाकेबंदी केल्यानंतर २६ नोव्हेंबर १७३८ मध्ये चिमाजी आप्पा पुन्हा एकदा कोकणात उतरला.[११३]

### ६.७.१ माहीम वर ताबा.

कोकणात आल्यांनंतर चिमाजी आप्पाच्या सैन्याने प्रथम माहीमवर हल्ला चढविला. माहीम लढविण्याची जबाबदारी शंकराजी केशव यांचा जेष्ठ बंधू महादजी केशव, कर्णाजी शिन्दे इत्यादी सरदारांवर होती.[११४] कोकणात उत्तरल्यानंतर महिमची लढाई फार अटीतटीची झाली. माहीमच्या किल्ल्यांला मराठयांनी वेढा दिला. मराठयांनी झाडे पाडून तोफासाठी मोर्चे उभारले गेले. सोबतच तटाभोवती सुरुंग पेरले. या बरोबरच समुद्रात टेहेळणी करण्यासाठी गलबते ठेवली. अशाप्रकारे कडक बंदोबस्त असून सुध्दा वसईहुन पोर्तुगीजांना मदत आली. मात्र ती दोन दिवसात संपूनही गेली.[११५] यावेळी माहीमवर मराठयांचे कानठळे बसेल असे हल्ले सुरु होते. त्यापुढे पोर्तुगीजांचा प्रतिकार लुळा पडला. मराठयांनी मारागीरी केल्यामुळे किल्यातील दारुचे कोठार पेटले. त्यामुळे पोर्तुगिजांचे अवसानच गळाले. परीणामी मराठयांनी डिसेंबर अखेर माहीम काबीज केले.[११६] त्यानंतर ९ जानेवारी १७३९ रोजी पोर्तूगिज किल्लेदार व शंकराजीपंत यांच्या तहावर सहया झाल्या आणि मराठयांनी माहीमचा ताबा घेतला.[११७] मात्र माहीमच्या या संघर्षात शंकरजीचा भाऊ महादजी केशव ठार झाला. तर रामचंद्र हरी हा जखमी झाला.[११८] माहीमच्या या संघर्षात महादजी पंत यांच्या बरोबर इतर अनेक सैन्य मारले गेले.[११९]

माहीमच्या संघर्षाची माहीती किल्लेदाराने वसईच्या आपल्या वरीष्ठास कळविली. त्या वरून त्या युध्दाची सविस्तर माहीती मिळते. तो लिहीतो, ‘रामचंद्र हरि व महादाजी केशव यांनी माहिमास मोर्चे लावले होते. गनीम इंग्रज फिरंगी व हबशी ऐसे एकत्र होऊन दोन तिन दिवसांत शंभर गलबते भरुन दक्षिणेकडे केळवे अंग मोकळे होते, तिकडून गनीम कोटामध्ये जात. त्यास कळव्या कडील तर्फेस सात आठशे माणूस घेऊन ता. १० रोजी रामचंद्रपंत चालोन गेले.गनीमाचे २५/३० माणूस मारिले. इकडील एक राऊत पडला, एक दोन घोडी जखमी झाली. त्या उपरी काल गणमाने संधी पाहुन दीड दोन हजार माणूस मोर्च्यावर चालुन घेतले, एकच वेळी तिहीं मार्च्यावर हल्ला केला. कोटावरुन तोफांचा मार जबरदस्त केला. मोर्चे जाळवयास लागले. लोकांस बाहेर निघोन हत्यार करावयास जागा नाही. तेव्हा रामच्ंरदपंत, अमरसींग, वग़ैरे दहा पंधरा राउतांनी घोडी घालुन गनीमाचे दहापंधरा माणूस मारिले. रामचंद्रपंतांनी खुद्द दोघे ठार केले आणि गणीम फिरविला. ते

समयी रामचंद्रपंताच्या उजव्या हाताला गोळी लागली. हातची तलवार सुटून गुडघ्यास लागली आहे. ऐसे होतांच मशार निल्हे, त्या बरोबर गनीमानें मोर्चे काबीज केले. आमच्या लोकाचा धिर सुटोन निघाले. महादजी केशव, वाघोजी खनवीलकर, राजबाराव बुरोडकर, चिंतो शिवदेव, जनार्दन हरि व गणे, हरि कारकुन दि।। महादाजी केशव, व धोंडोपंत, विठ्ठल शिवदेव याचा भानो जवाई. वगैरे लोक मोर्चात होते. त्यास निघावयास फुरसत न होऊन तेथेच झुंजोन कामास आले. आजमासे दोनशे मानूस कामस आले व जखमी शंभरापर्यंत बाजीरावाची निर्भत्सना सहन न होऊन लढतांना ही मंडळी कामास आली."[१२०] माहीम चा किल्ला मराठयांच्या हवाली करण्यापुर्वी किल्लेदार यांने वसईच्या जनरलला पत्र लिहीले. त्यावरुन मराठा सैन्याची हल्याची तयारी, त्यांची सैन्य संख्या, आरमाराचे संचार, सोबतच किल्ला वाचविणे अशक्य असल्याचे वर्णन मिळते. पोर्तूगिज किल्लेदार लिहीतो, "आज सकाळी मला खात्रीलायक बतमी कळली आहे की, चिमाजी आप्पा, पिलाजी जाधव आणी शंकरराजी सचिव हे तिघे मराठा सरदार या ठाण्याच्या कसब्याकडे येवून दाखल झाले आहेत. त्यानी आठ हजार घोडदळ आणले असुन दमण येथे असलेले सैन्य वेगळेच आहे. एकून जवळजवळ चौदा हजार सैन्य या हल्यात भाग घेणार आहेत व कसब्यातील माड तोडून टाकण्याचे सत्र सुरु झाले आहे. शत्रूनी आपल्या बरोबर चौदा हत्ती, पुष्कह उंट आणी बारा तोफा आणल्या आहेत. हया ठाण्याबरोबरच कळम आणी ृशिरागाव या ठाण्यांवर शिकस्त करण्याचा त्यांचा बेत आहे. शत्रुंचे आरमार समुद्रातून संचार करीत आहे. शत्रू सैन्य मोठे आहे व त्या प्रमाणात माझ्यापाशी दारूगोळा काहीच नाही. सैन्याची तीच गत आहे. तरा आपणापाशी कुमक आसल्यास ताबडतोब इकडे रवाना करावी. न आल्यास या ठाण्याचे काय हाईल ते सांगता येत नाही."[१२१]

यावरुन पोतूगिजांची स्थिती मराठयांच्या आक्रमणामुळे दयनिय झाली होती हे स्पष्ट होते.

**६.७.२ चिचणी हस्तगत**

माहीम जिंकल्यानंतर मराठयांनी १० जानेवारीला केळवे ही ठाणी जिंकून घेतली आहे. २२ जानेवारी १७३९ रोजी मराठयांनी शिरगांव हस्तगत केले.[१२२] त्यांनतर राणोजी शिंदे यांनी खतलवाडा व डहाणू ही जिंकले.[१२३] दरम्यान मराठा सैन्याने अशेरी किल्यास वेढा दिला होता.

मराठयांनी किल्याची रसद बंद केली. तसेच किल्यात कोणी जाणार नाही याचा बंदोबस्त केला.[१२४] परिणामी जानेवारी च्या शेवटी अशेरी किल्ला मराठयांच्या ताब्यात आला.[१२५]

यावेळी मराठयांना तारापुर किल्यासाठी अतिशय महत्वाचा असलेलस चिचणी हे ठाणे जिंकणे आवश्यक होते. कारण चिचणी हाती आली म्हणजे अर्ध्या तारापुरवर विजय मिळण्यासारखे होते.[१२६] चिंचणी हे गाव ठाणे जिल्हयातील डहाणू तालुक्यात आहे. मुंबई पासुन ११० किलोमिटर वर असलेले चिंचणी या उपनगरात प्रामुख्याने कोळीवाडा, भंडारवाडा व वाणीवाडा यांचा समावेश होता. कोळी वसाहतीच्या जवळ खाडीच्या बाजुला एक गावदेवताचे मंदीर आहे. चिंचणी आणि तारापुर दोन शहरे एका अरुंद खाडीने विभागली आहेत.[१२७] अशा किल्यावर मराठयांनी हल्ला केला व जानेवारी अखेरीस मराठयांनी चिचाणी हस्तगत केली.[१२८]

**६.७.३ तारापुरची लढाई**

माहीम, केळवे आणि आशिरगड विजयानंतर चिमाजी आप्पाने तारापुरकडे मोर्चा वळविला.[१२९] तारापुरचा किल्ला अतिशय दुर्गम होता. त्यांच्या भोवती लांब आणी रुंद खंदक होते. विशेष म्हणजे तारापूर पार केल्याशिवाय कोटापर्यंत पोहचण्यांची बोलणे सुध्दा शक्य नव्हते. तसेच तारापूरचा पोर्तूगिज किल्लेदार लुईस व्हेलोझू माशाहु हा अतिशय झूंजार वीर होता. आणि त्यांच्या हाताखालची माणसे तशीच हिंमतीची होती.[१३०] मात्र यावेळी मराठयांकडेही अनेक मातब्बर सरदार होते. राणोजी भोसले, मल्हारराव होळकर, बाजी भिवराव, रामचंद्र हरी पटवर्धन, तुकोजी पवार व यशवंतराव पवार इत्यादी.[१३१] २४ जानेवारी १९३९ रोजी मराठयांनी तारापुरवर जबरदस्त हल्ला चढविला.[१३१] मराठे किल्ला जिंकण्यासाठी शर्तीचे प्रयत्न करीत होते. यावेळी पोर्तुगीजांविरुध्द सर्व मराठा सरदाराने एकजुटीने किल्ला जिंकण्यासाठी सर्वशक्ती पणास लावली.[१३३] मराठयांचा तोफा तारापुरास प्रथम संहारक ठरत होत्या.[१३४] मराठयांच्या वतीने यावेळी मल्हारराव होळकर व यशवंतराव पवार यांनी विशेष प्रयत्न केलेत. यशवंतराव पवारने तारापुरच्या किल्ल्यात एक सुरुंग लावला. मल्हारराव होळकराने सुध्दा बुरुजाजवळ सुरुंग लाविला. त्याचा स्फोट होताच तटाला खिंडार पडले.[१३५] त्यामुळे मराठे त्या मोकळया जागेतून किल्यात शिरले. चिमाजी आप्पा यावेळी तेथेच उभे होते. त्यांने सैन्याला

किल्यावर चढाई करण्याचा आदेश दिला.[१३६] तेव्हा मराठे शिडया लावून वर चढले. माञ पोतुगीजांनी मराठयांच्या सुरुंगाला व तटावरुन घुसण्याच्या त्यांच्या प्रयत्नांना दाद दिली नाही. उलट मराठयांच्या तोफांना ते तटावरुन बंदुका झाडून आणि तोफा उडवून जवाब देत होते. मराठेही त्यांच्या अग्नीवर्षावाला बिलकुल न जुमानता आपल्या सैनिकांच्या प्रेतावरुन तटांच्या खिंडारातून घुसत होते. शत्रु सैन्याला मारत होते आणि मरत होते. अशाही परिस्थितीत किल्यात घुसण्याचा प्रयत्न करीत होते.[१३७]

मराठा व पोर्तूगिज यांच्यातील संघर्ष अतिशय अटीतटीचा झाला. याचा उत्तम पुरावा म्हणजे मराठयांच्या बाजूचा बाजी भिवराव रेठरेकर गोळयांच्या वर्षावात तटावर निशाण लावण्यासाठी चढत असतांना तटावरुन आलेली गोळी तोंडात लागल्याने जागच्या जागीच ठार झाला.[१३८] बाजीच्या मृत्यूनंतरही मराठयांनी लढा सुरु ठेवून किल्ला जिंकला.[१३९] याचवेळी पोर्तूगीजांचा किल्लेदार ही मराठयांचा प्रतिकार करीत असता मारल्या गेल्यामुळे. परिणामी लढाई संपुष्ठात येवून २४ जानेवारी १७३९ रोजी तारापुर किल्ला मराठयांच्या ताब्यात आला. संघर्षाअंती मराठयांनी अनेक पोर्तूगीज अधिकारी व ४००० पेक्षा अधिक सैनिकांना कैद केले.[१४०] चिमाजी आप्पाने तारापुरचे वर्णन करणारे पत्र बम्हेद्रस्वामीस लिहीले. चिमाजी आप्पानी बाजीराव पेशवाना जे पत्र लिहीले त्यात आपल्या हाताखालच्या सर्व जवान मर्दाचा अभिमानाने वर्णन केलेआहे. मल्हारराव होळकर, राणोजी शिन्दे, यशंवतराव पवार, रामचंद्र हरी, गोविंदा हरी, तुकोजी पवार, कदमबांडे इत्यादी सर्वानी पराक्रम केला असे आप्पा आर्वजून सांगतो आणि शेवटी 'स्वामीच्या पुण्यप्रतापे थोर, तेणेकरुन जागा फत्ते झाली.'[१४१] असे चिमाजी नम्रपणे सांगतो.

तारापुरचा किल्ला मराठयांनी जिंकला त्यावेळी पोर्तूगीजांच्या किल्यात काही स्त्रिया होत्या त्या मराठयांना सापडल्या. त्या स्त्रियांमध्ये तारापुरच्या किल्लेदाराची पत्नी ही होती. चिमाजी आप्पा पुढे तिला उभी केली असता आप्पा म्हणाले, 'हिला कशाला धरून आणीली' या स्त्रियांना मराठयांनी सौजन्याने वागविले. त्यानंतर सन्मानपुर्वक त्यांची वसईला रवानगी केली. यावेळी किल्लेदाराच्या पत्नीने पतिच्या अंत्यविधीची परवानगी आप्पाकडे मागीतली असता. चिमाजी आप्पाने ती दिली. आपणा विरुध्द लढणाऱ्या शत्रुच्या किल्लेदाराशी मरणोत्तर सुध्दा औदार्याने वागणाऱ्या चिमाजी

आप्पाचे हे उदार चारित्र्य यावेळी दिसुन आले.[१४२] यावेळी कप्तानाच्या पत्नीस जाऊ देण्यांत आले असले तरी पोर्तूगिजांचे दोन हजारावर कैदी अडकुन ठेवण्यांत आले.[१४३]

तारापुरच्या लढाईत मराठे विजयी झाले असले तरी त्यांना त्याची जबर किंमत मोजावी लागली. बाजी भिवराव सारखा पराक्रमी सरदार मराठयांना गमवावा लागला.[१४४] त्यांचा मृत्यूने चिमाजी आप्पास अतिशय दु:ख झाले. तारापुरच्या या युध्दात मराठ्याने मोठे धाडस, पराक्रम व श्रमसयास केले. मराठ्यांचे दोन हजार सैन्य मृत्युमुखी पडले आणि तितकेच जखमीही झाले.[१४५] बाजी भिवराव मृत्युमुखी पडल्याची बातमी जेव्हा बाजीराव पेशवा यांना समजली तेव्हा त्यांना साक्षात भाऊ गेल्याचे दुख झाले.[१४६] त्या दुख:समयी बाजी भीवरावाच्या आईस (वेणूबाईस) पेशवा बाजीरावाने सुंदर सांत्वनपर पत्र पाठविले.[१४७] 'पौष शु। ११ तारापुरवर हल्ला केला ते समयी बाजी भीवराव तोंडात गोळी लागुन कैलासवाशी जहाले. ईश्वर मोठे अनुचित केले. तुम्हास मोठा शोक प्राप्त जाला. आमचा तर भाऊ गेला. त्यास तुम्ही वडील. दु:खाचे परिमार्जन करुन विवेक करावा.''[१४८] यावरून बाजीराव व आप्पा सैनिकाच्या मृत्यूमुळे त्यांच्या परीवारांचे सांत्वन करीत असत हे दिसते. तसेच त्याना त्या संकट समयी धिर देत असत.

तारापुरचा संघर्ष अतिशय भिषण होता. चिमाजी आप्पांनी त्या तारापुरच्या युध्दाचे वर्णन करणारे पत्र स्वामीना लिहीले आहे. ते वस्तुनिष्ठ व प्रत्यक्ष युध्द कर्ताने लिहीले आहे. ते पुढील प्रमाणे, "सारे लश्करचे लहान थोर माणूस रात्रीचेंच खाडीतोन उतरुन मोर्च्याचे पाठीमागे जमा बसविले होते. सुरुंग एकामागे एक अंतर करुन उडाले. सरकारच्या सुरुंगाचे खंडारें मोठे पडले, उजव्या हाताकडे दुसरी बहुत खिंडारे पडली. त्याच्या उजवीकडे हबश्यांच्या लोकांनी कोटासच शिडी टेकून वरते चढले. पुढे धारकरी होता तो वर चढल्यावर, बरी गोळी लागुन खाली भुईवर पडला. त्याचे मागोमाग दुसरा वर चढला तोही पडला. फिरोन लोकांनी लगट करुन वरती चढले. मारामाराची शर्थ केली. हुजराताचे निशाणाजवळ बाजी भीवराव व रामचंद्र हरि होत. ते सारे नामांकित लोकतितके बरे वजेनें चालोन गेले. गुतेकर व बाळोजी चंद्रराव होते. उजवेकडे मल्हाररावाची व राणोजी भोसल्यांची निशाने होती. त्याणीही शर्थ करावयाची तैसी केली. खंदक सात आठ हात. खोल व सात आठ हात रुंद होता. तो खंदक उतरोन कोटावरी चढावयासी बहुत प्रकारची अडचन होती. शेवट पावेतों फिरंगी यांनी हिंमत

सोडली नाही. तोफांचा व बरकंदाजांचा मार सिमेपरता."[१४९] या पत्रावरुन मराठे किती जिद्दीने लढलेत हे स्पष्ट होते. मराठयांचा चिवटपणा व राज्यासाठी प्राण अर्पण करण्याची तयारी दर्शविते.

### ६.७.४ पुन्हा वसई।।।..

### वसईचा किल्ला.

पोतुगिज यांच्या वर्चस्वाखाली असलेल्या वसई प्रांतात पहिल्या शतकात व्यापारी भरभराट होती. इ. स. १५२६ मध्ये तो पोर्तुगीजांनी पाडून वसईला नवा किल्ला बांधला. वसईच्या तळाला ११ बुरुज व त्यावर ९० तोफा होत्या.[१५०] सिद्दीच्या जंजिरासारखाच हा वसईचा किल्ला म्हणजे अक्षरश: यमपूरी होती.[१५१] वसईच्या आसपासचे किल्ले मराठे सहज जिंकलेत. मात्र वसईचा किल्ला अतिशय मजबूत होता. जो पर्यंत वसईचा किल्ला मराठे जिंकणार नव्हते, तो पर्यंत घेतलेल्या ठाण्याचे महत्व नव्हते. विशेष म्हणजे वसई किल्ला उत्तर कोकणातील पोर्तूगीजांच्या वर्चस्वाचे द्योतक होते. शिवाय तो किल्ला अजिंक्य समजाला जात असे. वसई किल्याचा आकार अष्टकोणी होता.[१५२] दीड मैलाचा परीघ या किल्याला असून जमिनी पासुन तीस-चाळीस फुटापर्यंत उंच तट आहे. वसईच्या प्रत्येक कोणावर चौकीनी बुरुज असुन त्यावर त्याकाळी पट्टेदार तोफा चढविल्या होत्या. त्या किल्यांच्या पश्चिमेस अरबी समुद्र, दक्षिणेत वसईची रुंद खाडी, पुर्वेस दलदल असे हया किल्ल्याला नैसर्गीक संरक्षण लाभले होते. फक्त उत्तरेकडून वसईच्या किल्यांवर आक्रमण करता येत होते.[१५३] वसई किल्याचा पाया पंधराफुट रुंद होता.[१५४]

### ६.७.५ वसईच्या सभोतालच्या ठाण्यांची प्राप्ती.

चिमाजी आप्पा पोर्तुगीजांविरुध्द या दुस-या मोहीमेत मोठया जोमाने आक्रमण करीत होता. विशेष म्हणजे मराठा सरदारांनी आप्पाला मोलाचे सहकार्य होते. त्यांच्या सहकार्यामुळे चिमाजी आप्पाने तारापुरचा किल्ला जिंकला. यानंतर चिमाजीने आपला रोख वसईकडे वळविला. ६ फेब्रुवारी १७३९ रोजी चिमाजी आप्पा यांने वसईला वेढा दिली.[१५५] चिमाजी आप्पाने यावेळी रणनीती नुसार कार्य केले. त्यासाठी वसईच्या आजुबाजुच्या परसिरातील किल्ले जिंकण्यांसाठी त्यांने

खंडोजी माणकर, राणोजी शिंदे इत्यादी सरदारांना पाठविले. त्यात मराठयाना यशही मिळाले. १५ मार्च १७३९ रोजी वसईला आधार असलेला बांद्रा किल्ला मराठयांनी भुईसपाट केला.[१५६] त्यापुर्वीच ६ फेब्रुवारी १७३९ रोजी चिमाजीने वसईस पंचवीस हजार घोडदळ, चाळीस हजार पायदळ, चार हजार सुंरुग लावणारे मजुर, पाच हजार उंट, पन्नास हती व असंख्य पेढारी अशा चतुरंग दलानिशी वसईला वेढा घातला. प्रचंड सैन्यासह मराठयांनी वसईला वेढा दिला असला तरी वसई जिंकणे सोपे नव्हते. वसईच्या उत्तरेस खुष्कीची बाजु तेवढीच वेढा देण्यांसाठी मोकळी होती. कारण पूर्व, पश्चिम व दक्षिण बाजुला पाणी आणि चिखल असल्यामुळे मराठयांनी खुष्कीतला प्रदेश जिंकून पोर्तुगीजांशी युध्द करण्यांसाठी आडगळीचा मार्ग स्विकारला.[१५७] दरम्यान मराठयांनी वसईच्या आसपासची धारावी, करंजे ही शहरे व धारावी बेट खंडोजीने जिंकलीत.[१५८] तसेच ९ फेब्रुवारीला वर्सोवा, ७ मार्चला धारावी, १२ मार्चला कारंजाबरे मराठयांनी जिंकले. तर १५ मर्च ला मराठयांनी बाद्राचा कोट जमीनदोस्त केला. हया सर्व स्थळांचा वसईच्या पोर्तूगीजांना आधार मोठा होता.[१५९]

मराठयांची दुसरी आघाडी..

वसईचा लढा लवकर आटोपावा अशी बाजीरावाची इच्छा होती. मात्र ते शक्य झाले नाही कारण वसईच्या पोर्तुगीजांना गोव्याहून कूमक मिळत होती. ती कुमक बंद करण्या इतपत सामर्थ्य संपन्न आरमार मराठ्याकडे नव्हते. त्यावर एकच उपाय होता, तो म्हणजे प्रत्यक्ष गोव्यात योग्यवेळी काही सैन्य घुसवून गोव्यात घबराट निर्माण करावयाची. जेणे करून वसईकडे कुमक पाठविणे पोर्तुगीजांना अशक्य होईल. यावेळी साष्टीचे पोर्तुगीज त्रस्त झाले होते. अशावेळी त्यांच्यावर प्रहार करण्याची योग्य संधी होती. म्हणून व्यंकटराव यांच्यावर ही मोठी कामगीरी सोपविली. माहिमला पोर्तुगीज शरण येत असताना व्यंकटरावाचे सैन्य सावती मार्गे गोव्यात घुसले. अर्थातच त्यामुळे चिमाजी आप्पाचे काम सोपे झाले. कारण शत्रू पक्षाला दोन आघाडयावर युध्द करावे लागल्याने त्यांचे सैन्य बळ विभागाले जावून मराठयांचे फावले.[१६०] तसेच वसईला वेढा देण्यापुर्वीच शंकराजी केशव यास इ. स. १७३८ च्या नोव्हेंबर महिन्यात आठ हजार घोडदळ व दहा हजार पायदल देवून दमणवर पाठविले.[१६१] कारण दमणमार्गे वसईला रसद पुरवठा होता. ती रोखण्याससाठी शंकराजी ला

पाठविण्यांत आले. शिवाय पोर्तुगिजांना विरुध्द दुसरी आघाडी उघडली.[१६२] अशाप्रकारे दमण आणि गोवा दोन्ही बाजूंकडून मराठयांनी वसई भोवती फास करकचून आवळला.[१६३]

### ६.७.६ इंग्रजांचे दुप्पटी धोरण.

वसईच्या सेनापतीने गोव्याच्या गर्व्हनर वीरजईस १७ ऑगष्ट १७३९ रोजी पत्र लिहीले. तो लिहतो, 'वसईच्या किल्यास वेढा देणाऱ्या मराठयांच्या सैन्यात बुनगे व सैनिक मिळून दोन लक्षांवर माणसे होती.[१६४] पोर्तुगीजांने आपले सगळे बळ यावेळी वसईसाठी लाविले होते. मात्र त्याला कोठुनही मदत मिळत नसल्यामुळे त्यांचा बाहय जगाशी संबंध संपुष्ठात आला.[१६५] मराठयांनी वसईला वेढा दिला असता पोर्तुगीजानी मुंबईच्या इंग्रजांकडे मदतीसाठी विनंती केली. याच दरम्यान मराठयांचा वकील ही इंग्रजांकडे पोहचला, त्याने तोफा, दारुगोळा इत्यादीची मदत मराठयांना द्यावीत, अशी मागणी केली. ही मागणी मान्य न केल्यास पेण, पनवेल, ठाणे या मार्गाने मुंबईकडे जाणारी वाहतुक बंद करु असे इंग्रजांना सांगीतले.[१६६] सोबतच पोर्तुगीजांना जी मदत इंग्रज देत होते ती त्वरीत बंद करावी असा आग्रह धरला. मराठयांच्या या धोरणामुळे इंग्रज अडचणीत सापडले. परिणामी इंग्रजांनी पोर्तुगीज व मराठे हया दोघानांही मदत न करण्याचे धोरण स्वीकारले.[१६७] मात्र पोर्तुगीजांना उघड मदत न करता गुप्तपणे २० फेब्रुवारीचा सुमारास इंग्रजांनी दारुगोळा पुरविला. त्यानंतर वसईच्या अधिकाऱ्याने आम्ही अडचणीत आहोत आम्हास १ लाख रुपये कर्ज द्यावे अशी विनवनी इंग्रजांनकडे केली. तेव्हा गहाण जिन्नस ठेऊन इंग्रजांनी १७/४/१७३९ रोजी पंधरा हजार रुपये कर्ज दिले व काही कारागीर वगैरे लोक पाठविण्यांचे कबुल केले.[१६८] मात्र इंग्रजाकडून आलेली मदत संरक्षणाच्या दृष्टीने अतिशय अपुरी होती. मात्र यावेळी इंग्रजांचा दुपटी धोरण स्पष्ट निदर्शनास आले.

### ६.७.७ वसईचा संग्राम.

मराठयांनी यावेळी आपली युध्दनीती बदलून पोर्तुगीजांच्या किल्यावर सरळ धडक देण्यापेक्षा किल्यासमोर धमधमे बांधुन व त्यावर तोफा रचुन मारा करण्याचे ठरविले. शिवाय तोफखान्याच्या

आश्रयाने किल्याच्या भोवती तटबंदी सुरुंग पेरावयाचे असे नवीन डावपेच आखले.[१६९] त्यासाठी मराठयांनी वसई किल्या भोवती मोर्चेबांधणी केली. हे काम अतिशय जलद गतीने व शिस्तबध्द पध्दतीने करण्यांत आले. ते पाहुन पोर्तुगीजाचा मुख्य इंजिनियर दो आद्रियान दगा व्हील आश्चर्याने थक्क झाला.[१७०] मार्च महिन्यात मराठयांनी अनेक सुरुंग लावले. परंतू जमीन रेताळ असल्यामुळे सुरुंग कुच कामी होत असे. किल्ल्यास सुरुंग कोठे लावावा हाच प्रश्न मराठयासमोर निर्माण झाला होता. अशावेळी पोर्तुगीजाने सर्व शक्ती वसईला पणास लावली होती. पोर्तुगीजांचे सर्व् सैन्य वसईत गोळा झाले होते. परिणामी वसई किल्यात धान्याचा साठा संपत आला असता गोव्याहुन नवीन मदत येत नव्हती. अशावेळी इंग्रजांनी मध्यस्थी करण्यांसही नकार दिला. तेव्हा वसईच्या किल्लेदाराने पाचशे सैन्य ठेऊन मराठा हल्ल्याची वाट पाहत राहीला. दोन-तीन लहानशा तुकडयांनी बाहेर जाऊन मराठा सैन्यावर तोफेनी मारा केला, त्यात अनेक मराठी सैन्य मारले गेले.[१७१] एप्रिल १७३९ मध्ये मराठयांचे सुरुंग तटापर्यंत पोहचले असता मराठे व पोर्तुगीज यांच्यात घनघोर युध्द झाले. त्यात मराठयंची एक गोळी लागून जॉन झेवियर पिंटो मारल्या गेला.[१७२] २५ एप्रिल १७३९ रोजी रात्री ९.०० वाजता, वसईचा लढवय्या जनरल मुर्तीज्युद सिलव्हेर हा रेमेदिऊस नावाच्या बुरुजावर पाहणी करीत असतांना मराठयांच्या एका गोळीचा बळी ठरला.[१७३] त्यानंतर कायतान दी सौझ परेरा या पोर्तुगीज सरदाराने युध्द सुरु ठेवले.[१७४] परैराने किल्याचे संरक्षण करण्यांसाठी शर्तीचे प्रयत्न चालविले. त्यात अनेक मराठा सैन्य मारले जात होते. यावेळी पोर्तुगीजांच्या तोफेच्या माऱ्यामुळे मराठा सैन्यांची मोठया प्रमाणात जी अगणीत प्राणहाणी झाली त्यास केवळ रानटीपना असे म्हणावे लागेल. मात्र मोठया प्रमाणात मराठे मृत्यूमुखी पडत असतांनी ते जिद्दीने लढत होते. मराठयांनी यावेळी अनेक सुरुंग लावलीत. वसई किल्यास सुरुंग लावण्यांची जबादारी राणोजी शिंदे, मल्हारराव होळकर व यशवंतराव पवार यांच्यांकडे देण्यांत आली होती.[१७५]

मराठे जिद्दीने लढत होते पण विजय मिळत नव्हता. तेव्हा धार्मीक प्रवृतीच्या चिमाजी आप्पाने 'जो पर्यंत किल्ला जिंकत नाही, वसईच्या किल्ल्यातील तुंगार टेकडी वरील महादेवाचे दर्शन होत नाही तोपर्यंत येथुन हलावयाचे नाही.' असा निर्णय घेतला.[१७६] मात्र दोन चार महिने लढा देऊनही वसईचा किला दाद देत नव्हता. तेव्हा चिमाजी आप्पा भयंकर संतापले.[१७७] परीणामी चिमाजी आप्पांनी

आपल्या सैन्याला वैतागुन सांगीतले, 'किल्ला हस्तगत होत नाही, याजकरता मजला तोफेच्या तोंडी बांधुन माझे डोके तरी किल्यात पाडावे, नाहीतर किल्ला घ्यावा.'[१७८] आप्पांच्या या चेतावनीने सैन्य जोमाने कामाला लागले. त्याच रात्री खलबते झाली व दुसऱ्या दिवशी सकाळी किल्यांच्या तटबंदीखाली सुरुंग पेरण्यात आले.[१७९] मराठा पोर्तुगीज लढा अतिशय घनघोर युध्द सुरु असतांनाच १ मे व २ मेला तटाला सुरुंग लागुन तटाला खिंडार पडले. त्याएकाच दिवशी दुपारी तीन वाजेपर्यंत मराठयांनी सेबस्तियांव व रेमेदिऊस या बुरुजांवर अनुक्रमे अकरा व सहा मोठे हल्ले केलेत. सेबस्तियांव व काव्हालैस या बुरुजांमध्ये मराठयांच्या सुरुंगामुळे किल्यांच्या तटास खिंडार पडले. त्यातुन चार हजारांवर मराठा शिपायांनी किल्यात घुसण्यांचा प्रयत्न केला. परंतू पोर्तुगीजांच्या तोफाच्या माऱ्यापुढे तो प्रयत्न अयशस्वी ठरला.[१८०] मात्र २ मे १७३९ रोजी लावलेला एक सुरुंग ३ मे रोजी उडाला. तेव्हा संताजी वाघई या शुर सैनाने वसईवर चढाई केली. त्याचबरोबर इतरही सरदारांनी एकजुटीने वसई वर चढाई केली, त्यात त्यांना यश मिळाले. सुरुंगाला बत्ती दिल्यानंतर समोरचा एक प्रचंड बुरुज अस्मानात उडाला. पोर्तूगीजाच्या ध्यानीमनी नसतांना त्यांची बुरुजावरची ५०-६० माणसे अस्मानात उडाली.[१८१] इतका भयंकर हल्ला मराठयांनी चढविला होता.

### ६.७.८ वसई फत्ते.

वसईच्या या लढयात अणजुरकराचे गंगाजी नाईक हे आपल्या चारही बंधूसह अतिशय जिद्दीने लढा देत होते. त्यांनी वसईच्या तटाला खिंडार पाडण्यांत यश मिळविले. परंतू मुरारजी नाईक तेथेच लढतालढता मारला गेला.[१८२] मराठयांनी सुरुंग लावून तटाला खिंडार पाडल्यामुळे किल्ला मराठयाच्या ताब्यात जाणार असे दिसताच परेराने रात्री जहाजातुन आपली बायकामुले दमणकडे पाठविण्यांचे ठरविले. ते जहाज मराठयांच्या हाती लागले. त्यांत किल्लेदाराची अतिशय सुंदर पत्नी होती. चिमाजी आप्पांने बायका मुले असलेला तराफा पकडल्याबद्दल आपल्या शिपायांना दोष दिला व किल्लेदाराच्या परिवारातील सदस्यांना मोठया सन्मानाने परत किल्यांत पाठविले.[१८३] परंतू परेंराच्या पत्नीने मराठयांची व त्यांच्या सैजन्याची केलेली वाखाणणी त्याच्या पुर्वग्रहाशी अत्यंत विसंगत होती, 'मराठयांचा सेनापती देवकोटीतील असामान्य पुरुष असुन त्याच्याशी झगडण्यांत

तुम्हाला कधिही यश लाभणार नाही.' असे तिने आपल्या नवऱ्याला बजाविले.[१८४] चिमाजी आप्पाच्या स्वभावाने त्या इतक्या प्रभाविन झाल्या की, तिने आपल्या पती सांगितले की, 'तुम्ही कशासाठी भांडता चिमाजी आप्पा पूण्यवान आहे. मी तेथे गेले असता मला वाकडे दृष्टीने पाहीले देखील नाही. तेव्हा त्यांशी लढून यश येईल असे दिसत नाही.'[१८५] अर्थात परैराच्या पत्निने आप्पाची एक प्रकारे वकालतच केली होती. डॉ. कांबळे म्हणतात, 'शिवाजी महाराजाप्रमाणेच अशा पुरूषाची स्तुती स्वजनाप्रमाणेच परकियांनीही करावी, हे योग्यच होय.'[१८६]

पर्रेरासही आतापर्यंत कळून चूकले होत की, आपण मराठयांचा प्रतिकार करु शकत नाही. कारण इंग्रजांकडून मिळत असलेली मदत संरक्षणाच्या दृष्टीने तुटपूंजी होती. मराठे सैन्य तटाला पडलेल्या खिंडारातुन लोंढेच्या लोंढे किल्यात घुसत होते. होणाऱ्या संघर्षात पोर्तुगीज मारले जात होते. त्यामुळे दोन दिवस कायतान-द सौझ पर्रेराने आपल्या प्रमुख सहकार्यांशी विचार विनीमय करुन वसईला राखणे अशक्य आहे असा निर्णय घेतला.[१८७]

याचवेळी बाजीराव दिल्लीवर होणाऱ्या नादिरशाहाच्या बंदोबस्तासाठी उत्तरेकडील स्वारीच्या तयारीत होता त्यांने वसईस वेढा देऊन बसलेल्या चिमाजी आप्पास तातडीने निरोप पाठविला. 'आम्ही बुऱ्हाणपुर जवळ मुक्काम करुन खानदेश प्रांताचा बंदोबस्त करतो. वसई प्रसंग उरकुन आप्पा आपण लवकर घाटावर यावे. पागेची पथके घाटावर आम्हाकडे पाठवावी. चहुं दिवसी वर्तमान पावेते करणे आप्पा! परराज्य राहीले तरी सर्वावरी आहे. त्यास फार विचार मनात न आणता इकडील कार्याची पैरवी मनात आणून कर्तव्य ते करावे.'[१८८]

चिमाजी आप्पास दक्षिणेची मोहीम त्वरीत निकाली काढण्याची आज्ञा देऊन बाजीराव आपल्या सैनानिशी उत्तरेस निघून गेले.[१८९] त्यांने चिमाजी आप्पांची फौज बरोबर नेण्यांस मागवून घेतली नाही. परिणामी फिरंग्याच्या आशेवर पाणी फिरले व ते नईलाजाने मराठयांना शरण आले.[१९०] ४ मे रोजी पोर्तुगीजाने तहाचे पांढरे निशान उभारले.[१९१] एकंदर स्थिती प्रतिकुल आहे असे दिसताच पोर्तुगीजांनी ५ मे रोजी तहाची बोलणी सुरु केली.[१९२] त्याच बरोबर मराठयांनी ५ मे१७३९ रोजी वसई सर झाली.[१९२अ] त्यानंतर मराठा व पोर्तूगिज यांच्यात वाटाघाटी झाल्यात व १२ मे १७३९ रोजी मराठी सेना वसई किल्यात शिरली.[१९३] अशाप्रकारे साडे पंचेविस महीने लढा दिल्यानंतर पोर्तुगीज यांचा

सगळा उत्तरेचा प्रदेश मराठयांच्या ताब्यात आला. २३ मे १७३९ रोजी वसई किल्ल्यावर मराठयांचा विजयी भगवा झेंडा फडकला.[१९४]

### ६.७.८ वसईचा तह ( ५ मे १७३९)

पोतुगीज मराठयांकडून पराभूत झाले असली तरी त्यांनी चिमाजी आप्पांकडे तहाच्या वाटाघाटी करतांना हिंदूच्या धर्मस्वातंत्र्याच्या अटीचा अंतर्भाव तहात करु नये अशी हट्टी भुमीका घेतली. विशेष म्हणजे चिमाजी आप्पांने पोर्तुगीजांचा तो हट्ट मान्य केला.[१९५] तसेच तहाच्या अटी ठरवितानाच वसई खाली करण्याकरिता पोर्तुगीजांनी चिमाजी आप्पाला एका आठवडयांची मुदत मागीतली.[१९६] चिमाजी आप्पांने ती अट ही मान्य केली. त्यानंतर पोर्तुगीजांनी वसई खाली केल्यानंतर १३ मे १७३९ रोजी चिमाजी आप्पा व मराठयांनी वसई किल्ल्यात प्रवेश केला.[१९७] यावेळी मराठा व पोर्तूगीज यांच्यात तह झाला. त्या तहाच्या अटी खालील प्रमाणे होत्या.

१) पोर्तुगीज फौज व बुनगे यांना सर्व हत्यारांसह बैंडवाजवीत व निशाण उभारुन सुरक्षितपणे किल्याबाहेर मराठयांनी जाऊ द्यावे.

२) वसई येथे राहत असलेली ख्रिस्ती, मुसलमान किंवा हिंदी कुटूंबे किंवा लोक वसई सोडू इच्छित नाही, त्यासर्वास आपापली मालमत्ता घेऊन चिमाजी आप्पाने सुरक्षित जाऊ द्यावे.

३) वसईच्या बंदरात जहाज असतील त्यासही आपला दारुगोळा व तोफखाना घेऊन सुरक्षितपणे बंदरातून जाऊ द्यावे.

४) ख्रिस्ती पाद्रीसही आपआपली मालमत्ता घेऊन सुरक्षितपणे जाऊ द्यावे.

५) एकमेकांनी पकडलेले कैदी ज्याचे त्यास परत करावे.

६) वसईतील कोणताही माल किंवा सामान योग्य किंमत दिल्याशिवाय घेऊ नये.

७) किल्ला खाली करत असतांना पोर्तुगीजास कोणताही त्रास होऊ नये म्हणून चिमाजी अप्पाने आपले सैन्य दूर अंतरावर न्यावे. पोर्तुगीज लोक सहज तोफेच्याबाहेर जाईपावेतो मराठी सैन्याने किल्ल्यात प्रवेश करु नये.

८)  जे लोक वसईत राहतील मग ते कोणत्याही धर्माचे असो त्यांना धर्माचरण करण्यास मराठयांनी हरकत करु नये.

९)  वसईत तीन ख्रिस्ती मंदीरे आहेत. ती तशीच राहु द्यावीत. त्यात असलेल्या मुर्तीस अथवा दागीन्यास मराठयांनी हात लावू नये.

१०)  पोर्तुगीज लोकांचा दारुगोळा वसईत आहे. ते सर्व घेऊन जाण्याची त्यांना मोकळीक असावी. ( ही अट चिमाजीने मान्य केली नाही ते सर्व सामान चिमाजीने विकत घेतले.)

११)  या तहावर हस्ताक्षर झाल्यानंतर त्याचप्रमाणे अटींचे पालन व्हावे यासाठी चिमाजी आप्पाने आपला एक अंमलदार पोर्तुगीज जहाजावर ठेऊन द्यावा व पोर्तूगीजाचा एक अंमलदार मराठयांच्या ताब्यात राहावा.

वसई विजायानंतर सर्व बुरुजांची नांवे बदलण्यात आली. वसई विजयाचे मराठी इतिहास अप्पार महत्व आहे.[१९८] वसईच्या विजयानंतर मराठयांनी अलिबाग जवळील पोर्तुगीजांच्या वर्चस्वाखाली असलेली चोल व कोर्लाई ही ठिकाणे काबीज केली.[१९९]

वसई तहानंतर आप्पांनी जी भूमिका घेतली ती मराठयांसाठी भूषणावह आहे. लढाईतील पराजीत ख्रिस्ती वसई करांची, तसेच किल्यात अडकलेल्या त्यांच्या कुटूंबियांची व्यवस्थित सुटका व्हावी, त्यांना योग्य त्या सुविधा मिळाव्यात आणि ते सुखरुपपणे सुरक्षित ठिकाणी जाऊन पोहोचावेत यासाठी चिमाजी आप्पाने जातीने लक्ष दिले. वसईच्या युध्दानंतर ज्या तहाच्या अटी ठरल्या, त्या मराठ्यांनी तंतोतंत पाळल्या, अशी खुद्द फिरंग्यानी कबूली दिली आहे.

ना. के. बेहरे मराठयांच्या या स्वभावाविषयी लिहीतात, 'मराठे तहाची कलमे बरोबर पाळीत नसत, ही इंग्रजांची ठराविक ओरड यावरुन लुच्चगिरीची दिसते. मराठे तहाच्या अटी अत्यंत प्रमाणिकपणे अमंलात आणीत. परंतू शत्रुंनाही त्या ते उघडया डोळयांनी मोंडू देत नसत. उलट बाजुने अटी मोडल्या, तर बावळटा प्रमाणे स्वस्थ न बसता मराठे 'अरे' चे उत्तर 'कारे' देत असत. या तहांतील कलमे किती उदार व शत्रुंचा गौरव करणारी आहेत हे देखील लक्षात घेण्यासारखे आहे. शत्रु कचाटयांत सापडला, म्हणजे त्याला अगदी पिळून काढून जवळ जवळ नामशेष करावयाचा किंवा त्याची कंबर कायमची मोडून टाकावययाची, ही राजनिति मराठे शिकले नव्हते.'[२००]

मराठयाच्या प्रामाणिकपणे विषयी एका समकालीन अस्सल कागदपत्रांत म्हटले आहे. "पोर्तूगीज लोक जहाजात बसून तोफेच्या टप्पाच्या बाहेर जाई पावेतो, मराठी फौजेने किल्यात प्रवेश करु नये. मराठी राज्याचे जे प्रमुख सूत्र सहिष्णूता याचे प्रत्यंतर या तहाच्या वाटाघाटीमध्ये पुर्णपणे येते. या तहात स्पष्टपणे नमुद करण्यांत केले आहे, की फिरंग्याची देवळे, मालमत्ता लुटू नये, स्वखुशीने वसईत शहरातील त्यांना आणि त्याच्या धर्माला संरक्षण द्यावे."[२०१]

वसई मोहीमेचे सर्व श्रेय चिमाजी आप्पाला जाते. विशेष म्हणजे वसई मोहीमेची सर्व सुत्रे आप्पाच्या हाती होती. त्यात कोणाचेही हस्तक्षेप असल्याचे दिसत नाही. मराठी गो. स. सरदेसाई म्हणतात, 'राजकारणाच्या व शाहुच्या दृष्टीने ज्या भानगडी, अव्यवस्था किंवा वैयक्तीक रागव्देष जंजीरा प्रकरणात उदभवले तसले प्रकार वसईच्या प्रकरणांत झाले नाही. खुद शाहू यांने जंजीरा प्रकरणात जे लक्ष घातले. तशी ढवळ ढवळ त्याने वसई संबंधाने केली नाही'.[२०२] थोडक्यात 'वसईचा इत्यंभुत कारभार एकहाती चिमाजी आप्पा कडे होता. आणि क्वचित एखाद्या विशिष्ट बाबी पलीकडे शाहुचे हुकूम आणण्याची त्याला जरुर पडली नाही.'[२०३] एकहाती सुत्रे आप्पांकडेच असल्यामुळे माहीमे संदर्भात सर्व निणर्य आप्पांनी घेवून वसई मोहीम यशस्वी केली.

आप्पाच्या याविजयामुळे उत्तर कोकणातील महाराष्ट्राचा भाग पोर्तुगीजाच्या ताब्यातून मुक्त झाला.[२०४] या विजयामूळे पोर्तुगीजांचा किती प्रदेश मराठयांच्या वर्चस्वाखाली आला त्याचे माहीती खालील पत्रावरील वर्णनावरुन स्पष्ट होते. 'वेसाव्या पासुन दमन पर्यंतचा पासष्ट मैल लांबीचा पोर्तुगीजांचा उत्तर प्रांत मराठयांनी काबीज केला. त्यात चार बंदरे, तिनशे चाळीस खेडी असुन प्रांताचे उत्पन्न अडीच लाख रुपये होते. वसई शिवाय आठ शहरे, वीस किल्ले, दोन तटबंदीच्या टेकडया, ठाण्यासह सर्व साष्टी बेट व अर्नाळा किल्ला मराठयांना मिळाला. पोर्तुगीजांनी पंचवीस लाख रुपयांचा दारुगोळा व जहाजे ५९३ गमाविली व त्याची प्रतिष्ठाही गेली. पोर्तुगींजांकडे फक्त चेउल, दमण, दिव ही ठाणी राहीली'.[२०५]

वरील वर्णनावरुन हे स्पष्ट होते की, चिमाजी आप्पाच्या वसई विजयाने पोर्तुगीजांची सत्ता जवळपास नष्ट झाली. वसईवर मराठयांनी विजय मिळविल्याची माहीती गोव्याला पोहताच,

गोव्यांच्या गव्हर्नरने साष्टी व बारदेश या दोन प्रांताच्या वसूलीवर शेकडा चाळीस टक्के खंडणी निमूटपणे मराठयांना देण्यांचे कबूल केले.[२०६] तसेच २७ एप्रिल १७३९ रोजी गोव्याच्या गव्हर्नरने व्यंकटराव घोरपडे यांच्या सोबत एक तह केला.[२०७] शिवाय मराठयांना युध्द खर्चाबद्दल सातलाख रुपये दंड देण्याचे पोर्तुगीजांनी कबूल केले.[२०८]

चिमाजी आप्पाच्या वसई विजयामुळे पोर्तुगीजांची स्थिती अतिशय सोचनिय झाली. शाहु महाराजाला लिहीलेल्या पत्रात वसईच्या विजयाचे महत्व सांगताना आप्पाने उद्गार काढले की, "फिरंगी यांचा जागा वसई हस्तगत झाली त्यामुळे समुद्रांत सर्वांना दहशत बसली, चौऱ्यांशी बंदरातरी महाराजाची सलाबत गालीब(जारदार)."[२०९] आणि ते सत्यही होते कारण वसई वरील आप्पाच्या विजयामुळे बाजीराव व चिमाजी आप्पाची सर्वज्ञ दहशत प्रस्थापित झाली होती.

चिमाजी आप्पा व त्यांच्या नेतृत्वाखाली वसई जिंकण्यासाठी मराठयांनी जो पराक्रम केला, त्या संदर्भात ना. के. बेहरे लिहीतात, "या लढाईत चिमाजीच्या आधिपत्याखाली मराठयांनी दाखविलेली चिकाटी प्रशंसनीय आहे. समोरासमोर उभे ठाकून, शत्रुच्या तोफांच्या अचूक चालणाऱ्या गोलंदाजीची व तेणेकरुन येणाऱ्या मृत्यूची पर्वा न करता निधडया छातीने खंदक ओलांडून कोटावर चढणे सामान्य धैर्याचें काम नव्हते. शत्रु न दिसतां व शत्रुवर उलटवार करण्यांची एकदा देखील संधी न सापडतां, मार खात खात व माणसांचे बळी देत देत देत नेटानें पुढें सरकणें, ही लश्करी शिस्त या प्रसंगी मराठ्यांनी उत्तम प्रकारे दाखविली. विजय प्राप्त झाल्यावर, तोपर्यंत खालेल्या माराचें उट्टें सहज शत्रुवर काढता येतें. पण त्यापुर्वी शांतपणे घाव छातीवर घऊन पुढें सरकण्यांत बहाद्दुरी लागते."[२१०] ही बहादूरी मराठयांनी वसई मोहीमेत दाखविली होती. आणी त्यामुळेच मराठयांना वसई मोहीमेत मराठयांना विजय मिळविता आला.

### ६.७.९ चिमाजी आप्पाचे अभिनंदन आणि कौतूक.

पोर्तूगीजांसारख्या बलीष्ठ परकियांविरुध्द चिमाजी आप्पाने विजय मिळविल्यामुळे त्यांचे सर्वत्र कौतूक करण्यांत आले. मोर शेठ करंजे आनंदाने आप्पास लिहीतो, "स्वामींचे आज्ञापत्र आले तेथे 'वसई' फत्ते जाली. आपण शनिवारी किल्यात गेलो म्हणून लिहिले तेणेकरुन विशेष आनंद

जाला तो पत्री लिहावा यैसा अर्थ नाही. पुर्वी अवतार जाले त्यांनी कीर्ती संपादिल्या, त्यापेक्षा स्वामीच्या पुण्यप्रतापे अधिक दिसोन आला. स्वामी वसईस वेढा देऊन राहीले, तेव्हाच आमच्या मनात आले की स्वामीस येश अगत्य रुप येतच आहे. तेणे प्रमाणे येश आले. अति उत्तम गोष्ट जाली."[२११]

मल्हार राम आप्पांना लिहीतो, 'स्वामीनी वसई फत्ते केल्याची पत्रे श्रीमंत राऊ स्वामीला आली त्यावरुन कळले, येथे उतछाह थोर जाहला. साकारा वाटल्या. हा किर्ती घोष स्वामीचा दिगांतरी जाहला'[२१२] वसईच्या किल्ल्यावर मराठ्यांचे निशान लागल्याचें आनंदकारक वर्तमान ऐकुन एका सरदाराने आपले विचार चिमाजी आपास लिहुन कळविले, ते असे, "श्रवणें बहुत आनंद जाला. त्याचा लिहीता विस्तार आहे. वसई एक्या तोंडाने झूजावें. कोट बिलंद, गच्ची रुंद, मोर्चा अथवा सुरुंग चालवीन म्हटल्यास पाणी लागते. फिरंगे यासारखे झूंजणार. असे असोन अप्रतीम तर्तूद करुन उघडे सुरुंग चालविले. त्याणींही प्रत्योपकार यथाविध केला. तथापी स्वमीचे पुण्य व पराक्रम अप्रतीम. तन्मुहें याजवर सलाबत बसून ईश्वरावर तवकल केली. तन्मुळें फिरंगी यावर सलाबत बसली. दक्षिणची फौज म्हणजे मऊ लागले म्हणजे बेजरब घेणार, कठीन लागले म्हणजे फिरोन पाहणे नाही. ऐशी पुर्वापार या राज्यांतील तऱ्हा. सरदारांत कर्म जहाले नाही. पुढेही होणे नाही हा तो निच्चयच आहे. स्वामी केवळ इश्वरी अवतार तनमुळे या फौजेस ह्या हिंमती जाहाल्या. ज्या प्रारें वानराकरवून लेका घेविली त्या प्रकारे हे गोष्ट जहाली. दक्षिण फौजेस उपास करुन व छातीचा कोट करुन झूंजावे हे हिमंत पुर्वी कोणी केली ऐसे ऐकिलेहि नव्हते. परंतू स्वामी साक्षात ईश्वरांचे अवतार ह्यामुळे हे कर्म होते तेथे संशय नाही. सर्व प्रकारेंओढ, उपास करुन हिंमत धरणे आणि येणेंप्रमाणे झूंजाणे ही गोष्ट सर्व स्वामीच्या पुण्यांची आहे. नाही तरी औरंगजेब पूर्वीहि पादशहा जहाले होते. तनी ह कर्मे करावी परंतू त्यासहि विचाराच्या बाटेनें या समयांत व्हाव्या ऐसे येत नाही. स्वामी ईश्वराचें अवतार हे गोष्ट खरी. येथे संशय नाही. आम्ही मानवी लोक, नानाविध मनाचे प्रकार, निच्चय होत नाही. सारांश येतदर्थी पर्याय मनांत आणतां अंत चितांत येत नाही. सर्व गोष्टी ईश्वरावतारासारख्या आहेत. जे कामास आले हे पराक्रम पाहात असतील त्यांचे जन्म धन्य आहेत. जे कामास आले त्याणी तो हा लोक परलोक साधिला. ज्यापासुन ईश्वरी सेवा जितकी घडावयाची असते त्याचप्रमाणे घडते.

सारांश हे तर्तूद, हे मर्दूकी, या समयांत हे हिंमत, हे गोष्ट मनींहि कल्पवत नाही. ही कर्मे ईश्वरासमान आहेत. सेवेशी श्रृत होय हे विनंती "[२१३]

वसई विजयाचा आनंद सर्वत्र झालाच, पण चिमाजी आप्पांची भावजयी काशिबाईनाही आनंद झाला. तेव्हा आपल्या दिराचे कौतुक करणारे पत्र काशिबाईनी पाठविले, "श्रीयासह चिरंजीव राजश्री आप्पा यासी सौभ्यागवती काशीबाई आर्शीवाद. उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहणे. तुमचे पत्र पाठविले ते पावले. वसई फत्ते केलियाचे वर्तमान लिहीले. त्यावरुन बहुत संतोष वाटला. आपण येशस्वी जाहाले हे थोर गोष्टी जाहली. बहुत काय लिहणे. लोभ असो दिल्हा पाहीजे. हे आर्शीर्वाद."[२१४] या शिवाय इतरही अनेक पत्र उपलब्ध आहे. जे आप्पाच्या विजयामुळे संगळीकडे आनंदाचे वातावरण निर्माण झाल्यांचे स्पष्ट करते. अमृतराव शंकर दिनकरराव आप्पाचे अभिनंदन करताना लिहीतो, "वसई हस्तगत जाहीयांचे वर्तमान राजश्री रायांच्या पत्रावरुन कहोन परम आनंद जाहला. स्वामी येशस्वी पुण्यवान आहोत. वसई फत्ते केली यापेक्षा श्रीकृपे महत्कार्य होऊन हिंदुराज्याचे संस्थापन स्वमीचे हातुन होईल. वसईचा प्रसंग म्हणावा तरी हस्तगत ऐसा भरवसा कोनासही नव्हता. परंतू स्वामीचा निश्चये थोर, तन्मुळेच वसई फत्ते होऊन देव, ब्राम्हण, जोशी, गणीक या सर्वात खरे केले. स्वामीचा पराक्रम गगन भेदून गेला."[२१५]

चिमाजी आप्पाने केलेल्या या पराक्रमाबद्दल खालील पत्रात अशक्य प्राय कार्य चिमाजी आप्पाने केल्याचे वर्णन आहे. "यैशास बहु उत्तम गोष्ट जाली यैसे कर्म मागे ही कोणास न जाहले अथवा पुढेही न होणार यैसी गोष्ट स्वामीचा हातुन जाला. स्वामीच्या पुण्य प्रतापास जोडा नाही."[२१६]

अनेक शाहीरानी ही आप्पाच्या वसई विजयासंबंधी काव्य लिहिली आहेत. वसई विजयाचे वर्णन शाहीर तिवारी आपल्या शब्दात खालील प्रमाणे वर्णन करतो.

> "शौर्याची शर्थ जाहली ! बावटा तटावरी चढला
> जयनादाने वसईचा ! दिकप्रांत अहा दुमदुमला
> पोर्तुगीज किल्लेवाला ! आप्पांच्या शरणी आला."[२१७]

### *चिमाजी आप्पा व पेशवा बाजीराव भेट*

*पोर्तुगिजांसारख्या परकीय सत्तेचा आप्पांनी परभव केल्यानंतर सर्व महाराष्ट्रात उत्सव साजरा केल्या गेल्या. त्याला पेशवा बाजीराव ही अपवाद नव्हते. आप्पांच्या विजयाची खबर पुण्यात पोहचली असता बाजीरावा यांनी ताबडतोब शनिवार वाडया वरुन तोफांची सलामी देण्यांचा हुकूम सोडला. साखर वाटण्यांत आली.[२१८] चिमाजी आप्पा वसईला असतांनाच बाजीरावाने वसईची मोहीम लवकर आटोपून नादीरशाहाच्या बंदोबस्तासाठी उत्तरेत यावे असा निरोप दिला. वसईची मोहीम आटोपल्यानंतर चिमाजीने मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यांना ताबडतोब बाजीरावकडे पाठविले.[२१९]*

*पोर्तुगीजांनी वसई खाली केल्यानंतर १३ मे १७३९ रोजी चिमाजी आप्पाने वसईच्या किल्ल्यात प्रवेश केला.[२२०] त्यानंतर चिमाजी आप्पांनी तेथील समस्याचे निराकरण केल्यावार ते परत निघाले. चिमाजी आप्पा व व्यंकटराव घोरपडे जुन १७३९ मध्ये वसईहून सातारा येथे आले.[२२१] त्यानंतर ३१ जुलै १७३९ रोजी चिमाजी आप्पा पुण्यात परत आले.[२२१] खानदेशात बाजीरावाला चिमाजी आप्पाने वसई फत्ते केल्याची वार्ता समजली.[२२२] तेव्हा पासुन बाजीरावाला चिमाजी आप्पा पुण्यास कधी येतो असे वाटत होते. ४ सप्टेंबर १७३९ रोजी आप्पाचे पुण्यास आगमन झाले. या प्रसंगी बाजीराव पेशवे जातीने औंधापावोतो सामोरे गेला आणि त्यांनी आपल्या पाठच्या भावास छातीशी धरुन गळामिठी घातली.[२२३] या भेटीवीषयी प्रा. पुराणिक म्हणतात, "कृशानृच्या कृश ज्वालेप्रमाणे आधीच कृश झालेल्या आपल्या त्या युध्दाच्या कष्टांनी अधिच कूश झालेल्या आपल्या त्या तेजस्वी धाकटया भावाला कडाडून मिठ्ठी मारली."[२२३अ]*

### ६.७.१० वसई तहाचे महत्व.

*चिमाजी आप्पाने पश्चिमेकडील आंग्रे, पोर्तुगीज, सिध्दी यांचे तंटे यशस्वी सोडविलीत. यावरुन एक गोष्ट स्पष्ट होते आणि ती म्हणजे कोकणची परिस्थीती व दर्यावरील युध्दे हे प्रश्न बाजीराव पेक्षा चिमाजी आप्पाने जास्त साध्य केली. चिमाजी आप्पास कोकण प्रदेशातील नदी, नाले, भौगोलीक रचना तसेच समुद्रांत व किनारा यावर निर्माण होणाऱ्या अडचणी व त्यावर कशा*

प्रकारे मात करावयाची याचा अनुभव जंजीरा स्वारीमध्ये आला होता.[२२४] चिमाजी आप्पास जंजिरा मोहीमेच्या अनुभवाचा वसई युध्दात फायदा झाला. जंजिरा स्वारीच्या वेळी प्रत्यक्ष खपुन त्यांना जो अनुभव आला. त्या मुळेच पोर्तुगीजा सारख्या बलिष्ठ विदेशी आरमार निपुण सत्तेवर चिमाजीला मात करता आली.[२२५] परंतू या युध्दाची खरी फलश्रुती चार दोन ठिकाणे किंवा दहाविस किल्ले मराठयांच्या हाती पडणे एवढयापुरतीच मर्यादित नव्हती. पोर्तुगीजासारख्या शास्त्रासंपन्न पाश्चिमात्य सत्तेवर विजय मिळविल्याने मराठयांचा वचक जवळजवळ सगळया युरोपियांवर बसला होता.[२२६]

आप्पच्या वसई विजयामुळे इंग्रजांसारख्या परकीय शक्तीनाही मराठयांशी सलोख्याचे संबध ठेवण्यांची गरज वाटू लागली. जेव्हा गोर्डन शहुमहाराजाकडे गेला तेव्हा श्रीपतरावाने गोर्डनने उत्तर दिले की, नवीन गव्हर्नर आल्याने स्नेह जोडण्याकरिता आलो. छ. शाहुला गोर्डन म्हणाला की, पोर्तुगीज आपले शेजारी त्यामुळे त्यांना मदत करणे आम्हांस भाग पडले. आता आपणास जय मिळलाच आहे तेव्हा आपल्याशी ही आम्ही स्नेहभावानेच वागणार.[२२७] वसईचा विजय मराठयांच्या इतिहासात अतिशय महत्वाचा विजय होता. त्याचे महत्व खालील पत्रावरुन स्पष्ट होते. "फिरंगी निघोन गेले वसई फत्ते झाली ! संस्थानच प्राप्त झाले!! रायेच एक सुटले!!! फिरंगी स्थळापासून चेवले. ईश्वर यांस (पेशव्यास) स्थल दिले मोठी फलेथापीही करोड रुपये खर्च केला, फार येत्न केला.यैसा योत्न या राज्यात कोणी केला नाही."[२२८]

अनेक अभ्यासकानी सुध्दा आप्पाचा हा विजय अतुलनिय होता असे म्हटले आहे. डॉ. दिक्षीत आप्पाच्या वसईत विजया विषयी म्हणतात, "बाजीराव व चिमाजी आप्पा राम लक्ष्मणांची जोडीत जणू, चिमाजी आप्पानी गुजरात, मध्यप्रदेश येथे मोठे पराक्रम केले आणि सर्वात महत्वाचे दोन गोष्टी म्हणजे अत्यंत चिवट असणारा शत्रू जो पोर्तूगीज त्यांच्या वसईतून हकालपट्टी केली."[२२९] चिमाजी आप्पांच्या वसई विजयाचे महत्त्व स्पष्ट करताना प्रा. पुराणिक श. श्री. म्हणतात, "आजपर्यंत निजामावर बाजीरावाने पालखेड व भोपालच्या मोहीमा काठल्या त्यात चिमाजी आप्पा त्याचा केवळ उजवा हात होता व त्यांच्या विचारानेच त्याने सारी व्युहरचना केली हे तर झाले, पण त्याही पेक्षा विशेष म्हणजे विसवर्षापुर्वी बाजीरावाने पुण्याह वाचन केलेल्या फिरंग्याविरुध्दच्या धर्म संग्रामात चिमाजी आप्पाने अपुर्व यश संपादन करुन भगवा झेंडा फडकविला होता."[२३०]

चिमाजी आप्पा व पोर्तुगीज यांच्यातील तहामुळे मराठयांचा कोकणात प्रभाव वाढला. या तहामुळे पोर्तुगीजांचा सुमारे पाऊनशे मैल लांबीचा प्रदेश मराठयांना मिळाला. या क्षेत्रात ३४० गावे होते. शिवाय आठ मोठी शहरे, दोन डोंगरी आणि वसई व ठीकाणे ही दोन मोक्यांची लष्करी नाकी मराठयांच्या हाती लागली.[२३१]

चिमाजी आप्पाच्या वसई विजयाचा परिणाम असा झाला की मुंबई येथील इंग्रजांना असुरक्षित वाटून इंग्रजांने कॅप्टन इंचबर्ड यास चिमाजी आप्पाच्या भेटीस पाठविले. या भेटीत इंग्रजांच्या प्रशासकीय अडचणी संदर्भात चर्चा झाली. जुन १७३९ मध्ये चिमाजी अप्पा व इंचबर्ड ची भेट झाली. त्यात त्यांनी मित्रता, शांती या संदर्भात तहाची रचना केली.[२३२] चिमाजी आप्पाच्या वसईमोहीमेमुळे हिंदू धर्म रक्षणांचे कार्य झाले असे मानले जाते. इतिहासकर श. श्री. पुराणिक यांनी आपल्या ग्रंथात चिमाजी आप्पाच्या विजयाचे महत्व स्पष्ट करीत असतांना लिहीतात, "शिवाजी नंतर हिंदू धर्म रक्षणाचे कार्य पार पडले असे सांगीतले आहे. मराठयांचे स्वराज्य हे स्वराज्यासाठी निर्मीती हिंदू धर्म रक्षणासाठी केली होती. शाहुने जंजीरा आणि वसई येथे ज्या मोहीमा केल्या त्या याच उदेशासाठी होय. त्या दृष्टीने वसईच्या विजयाने शिवाजीच्या हिंदूत्वरक्षणाच्या घ्येयाची पुर्तता चिमाजीने व बाजीरावाने केली."[२३३]

वसई विजयाचे महत्व स्पष्ट करताना मराठी रियासतकार सरदेसाई म्हणतात, "या युध्दात युरापियनांस जिंकल्यामुळे मराठयांचा वचक सर्व देशात बसून त्यांची सत्ता स्थिर झाली. इतर सत्ताधिश व जनता मराठयांना व मुख्यत: बाजीराव व चिमाजींना सन्मानाने वागवून त्यांच्या आज्ञा पाळू लागले.'[२३४]

**सारांश:**

मराठा व पोर्तूगिज यांच्यात शिवाजी महाराजांच्या काळापासुन संघर्ष सुरु होता. मात्र त्याचा शेवट चिमाजी आप्पांनी केला. यापुर्वी छत्रपती शिवाजी, पेशवा बाजीराव यांनी पश्चिमेकडील अत्याचारी परकीय सत्ताधिश पोर्तूगिंजाना लगाम घालण्याचा प्रयत्न केला. परंतू त्यांना त्यात यश मिळाले नाही. मात्र जेव्हा पेशवा बाजीराव यांनी चिमाजी आप्पांकडे पोर्तूगिंज विरुध्दच्या स्वारीची

सुजे दिली, तेव्हां आप्पांनी दिव-दमन पर्यंतचा संपूर्ण प्रदेश ढवळूनच काढला. आप्पांनी एकवेळा नव्हे तर दोनदा पोर्तूगिंज विरूध्द मोहीम काढून पोर्तूगिजांचा बंदोबस्त केला. दूस-या मोहीमेमध्ये तर आप्पांच्या अंगी असलेल्या अनेक गुणांची पारख झाली. यावेळी शत्रूला कोंडीत पकडण्यांसाठी वसईला कोणतीही मदत मिळणार नाही याची दक्षता आप्पांनी घेतली. त्यानंतर त्यांनी अतिशय नियोजीतपणे वसईवर हल्ला चढविला व वसई हस्तगत केली. या मोहीमेत चिमाजी आप्पा यांने सैन्याचे नेतृत्व, मोहीमेचे नियोजन, आरमाराचा योग्य उपयोग, सैन्याला चेतविन्याची अंमलात आणलेली युक्ती तसेच आघाडीवर राहून सैन्याला उत्तेजन देण्याचे काम चिमाजी आप्प्पांनी केले. त्यामुळे त्यांना पोर्तुगिजांच्या सारख्या, आरमार सज्ज सत्ताधिशांवर मात करता आली. मात्र या विजयात मराठयांच्या अनेक सरदारांनीही महत्वाची भूमिका बजाविली. ज्यामध्ये अणजूरकरचे नाईक बंधू, मानाजी आंग्रे, शंकरावजी केशव, मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, अंबाजी रघूनाथ, बाजी भीवराव यांचे योगदान अतिशय महत्वाचे ठरले. त्यांच्या सहकार्यामुळेच आप्पाला वसई मोहीम यशस्वी करता आली.

*संदर्भ :*

*०१. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. २००*

*०२. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पूर्वार्ध), पूर्वोक्त,पृ. १८९*

*०३. गर्गे. स. मा.(संपा.), ब्रिटीश रियासत, खंड-१, पूर्वोक्त,पृ. ५७*

*०४. गर्गे. स. मा.(संपा.), ब्रिटीश रियासत, खंड-१, पूर्वोक्त,पृ. ५७*

*०४अ.बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पूर्वार्ध), पूर्वोक्त,पृ. १८९*

*०५. बनहट्टी राजेंद्र, (मुरलॅडकृत अनुवादीत), अकबर ते औरंगजेब, डायमंड पब्लिकेशन्स, पूणे, २००६,पृ. ०७*

*०६. डॉ. मोरवंचीकर रा. श्री., सातवाहन कालीन महाराष्ट्र, पुर्वोक्त, पृ.१६*

*०७. प्रा. सु. ह. जोशी, डॉ. म.रा. कुळकर्णी, डॉ. रघुनाथ शेळके, प्रा. शिल्पा कुलकर्णी, (संपा.), इतिहास माहीती कोश, पृ.३१*

*०८. गर्गे. स. मा. (संपा.), ब्रिटीश रियासत, खंड-१, पुर्वोक्त,पृ. ५९*

*०९. गर्गे. स. मा. (संपा.), ब्रिटीश रियासत, खंड-१, पुर्वोक्त,पृ. ५९*

*१०. डॉ. मोरवंचीकर रा. श्री., सातवाहन कालीन महाराष्ट्र, पुर्वोक्त, पृ.१९९*

*११. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त,पृ.३०*

*१२. १०. डॉ. मोरवंचीकर रा. श्री., सातवाहन कालीन महाराष्ट्र, पुर्वोक्त, पृ.१९९*

*१३. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त,पृ. ६४*

*१४. गर्गे. स. मा. (संपा.), ब्रिटीश रियासत, खंड-१, पुर्वोक्त,पृ. २९*

*१५. गर्गे. स. मा.(संपा.), ब्रिटीश रियासत, खंड-१, पुर्वोक्त,पृ. ३००*

*१६.प्रा. सु. ह. जोशी, डॉ. म. रा. कुळकर्णी, डॉ. रघुनाथशेळके, प्रा.शिल्पाकुलकर्णी (संपा.), इतिहास माहीती कोश, पुर्वोक्त, पृ. ४६९*

*१७. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त,पृ. ६३*

*१८. डॉ. मोरवंचीकर रा. श्री., सातवाहन कालीन महाराष्ट्र, पुर्वोक्त, पृ.२००*

*१९. डॉ. मोरवंचीकर रा. श्री., सातवाहन कालीन महाराष्ट्र, पुर्वोक्त,पृ.१९४*

२०. डॉ. मोरवंचीकर रा. श्री., सातवाहन कालीन महाराष्ट्र, पुर्वोक्त, पृ.१९५

२१. डॉ. मोरवंचीकर रा. श्री., सातवाहन कालीन महाराष्ट्र, पुर्वोक्त, पृ.१९५

२२. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त,पृ.६४

२३. डॉ. मोरवंचीकर रा. श्री., सातवाहन कालीन महाराष्ट्र, पुर्वोक्त, पृ.१५

२४. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त,पृ.६४

२५. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त,पृ.६४

२६. दिक्षित म. श्री.,प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त,पृ. ११८

२८. कुलकर्णी अ. रा. (संपा), आज्ञापत्र, पुर्वोक्त, पृ. ५६

२९. प्रा. केशट्टीवार के. मु, (१९९२), मध्ययुगीन भारत, पुर्वोक्त, पृ.३५२

३०.प्रा. सु. ह. जोशी, डॉ. म. रा. कुळकर्णी, डॉ. रघुनाथशेळके, प्रा. शिल्पाकुलकर्णी (संपा.), इतिहास माहीती कोश, पुर्वोक्त, पृ. ४६९

३१. डॉ. मंडलीक माधुरी, १९ व्या शतकातील महाराष्ट्रातील हिंदूधर्म सुधारणा चळवळ, पुर्वोक्त, पृ.३१

३२. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६४

३३. बेहरे ना.के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त,पृ.२४६-२४७

३४. गर्गे. स. मा. (संपा.), ब्रिटीश रियासत, खंड-१, पुर्वोक्त,पृ. १५४

३५. डॉ. मंडलीक माधुरी, १९ व्या शतकातील महाराष्ट्रातील हिंदूधर्म सुधारणा चळवळ, पुर्वोक्त, पृ.३१

३६. गर्गे. स. मा. (संपा.), ब्रिटीश रियासत, खंड-१, पुर्वोक्त,पृ. १५४

३७. डॉ. मंडलीक माधुरी, १९ व्या शतकातील महाराष्ट्रातील हिंदूधर्म सुधारणा चळवळ, पुर्वोक्त, पृ.३३

३८. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२९८

३९. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त,पृ.६४

४०. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२९८

४१. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ.२४७

४२. दिक्षित म. श्री.,प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त,पृ. ११८

४२अ. प्रा.जाधव वसंत, आधुनिक महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास, पुर्वोक्त, पृ. २८

४३. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त,पृ.६४

४४. गर्गे स. मा., (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५३०

४५. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त,पृ.६४

४६. गर्गे स. मा., (संपा.), ब्रिटीश रियासत, खंड १, पुर्वोक्त, पृ. १५४

४७. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त,पृ.६४

४८. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५३०

४९. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६४

५०. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.६४

५१. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड ३०, पुर्वोक्त, पृ.३३९

५२. गर्गे स. मा., (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५२९

५२अ.प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२१७

५३. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.६९

५४. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.६९

५५. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२१५

५६. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२१६

५७. गर्गे स. मा., (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५३०

५८. दिक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त,पृ. ११९

५९. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.६९

६०. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२१५

६०अ. बिरादार टी. के.,पेशवाईचा कालखंड, (पूर्वार्ध), पुर्वोक्त,पृ.१९०

६०ब. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२१७

६१. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.६९

६२. प्रा. पुराणिक श .श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२२५

६३. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५३१

६४. प्रा. सु. ह. जोशी, डॉ. म.रा. कुळकर्णी, डॉ. रघुनाथ शेळके, प्रा. शिल्पा कुलकर्णी, (संपा.), इतिहास माहीती कोश, पुर्वोक्त, पृ. १२४

६५. गर्गे स. मा., (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५३२

६५अ.प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२२०

६६. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५३२

६७. दिक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ११९

६८. दिक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ११९

६९. दिक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वेक्ता, पृ. ११९-१२०

७०. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५३२

७१. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.६८-६९

७२. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.७२

७३. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.७२

७४. दिक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. ११९-१२०

७५. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त,पृ.२४८

७६. गर्गे स. मा.,(संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५३३

७७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२२८

७८. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५३३

७९. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.७२

८०. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.७२

८१. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा.),मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.६९

८२. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५३३

८३. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा.),मराठ्यांचा इतिहास, खंड २, पूर्वोक्त, पृ.६९

८४. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा.),मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.६९

८५. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२२५

८६. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५३३

८७. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.७३

८८. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.७३

८९. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा.),मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.६९

९०. गर्गे स.मा.,(संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५३३-५३४

९१. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५३४

९२. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.७४

९३. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.७३

९४. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पंर्वोक्त, पृ.२२८

९५. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.७७

९६. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.७५

९७. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६७

९८. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा.),मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.६९-७०

९९. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२२९

१००. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२२९

१०१. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह.(संपा.),मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.६९

१०२. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.७५

१०३. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२२९-२८०

१०४. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. २३१

१०५. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६५

१०६. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५३४

१०७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२३०

१०८. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ.२४८

१०९. गर्गे स. मा., (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५३५

११०. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५३४

१११. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ.२५०

११२. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६६

११३. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२३६

११४. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.७७

११५. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२३७

११६. दिक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त,पृ. १२४-१२५

११७. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त,पृ.२५०

११८. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.७८

११९. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. २३६

१२०. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त,पृ.२५०-२५१

१२१. प्रा. पुराणिक श.श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२३८

१२२. दिक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त,पृ.१२५

१२३. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.७१

१२४. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड १६, पुर्वोक्त, पृ.८३

१२५. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६६

१२६. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड १६, पुर्वोक्त, पृ.६१

१२७. डॉ. मोरवंचीकर रा. श्री., सातवाहन कालीन महाराष्ट्र, पुर्वोक्त, पृ.१९४

१२८. बेहरे ना.के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त,पृ. २५१

१२९. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. २४१

१३०. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२३८

१३१. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२३८

१३२. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६६

१३३. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६६

१३४. दिक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त,पृ.१२६

१३५. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६७

१३६. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६७

१३७. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. २४२

१३८. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२३९

१३९. प्रा. सु. ह. जोशी, डॉ. म.रा. कुळकर्णी, डॉ. रघुनाथ शेळके, प्रा. शिल्पा कुलकर्णी,(संपा.), इतिहास माहीती कोश, पूर्वोक्त, पृ.२३६

१४०. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६७

१४१. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२३९

१४२. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२४०

१४३. दिक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्ता,पृ. १२६

१४४. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६७

१४५. दिक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त,पृ. १२६

१४६. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. १२१

१४७. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ.३७

१४८. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पुर्वोक्त, पृ. ३१

१४९. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त,पृ.२५२

१५०. प्रा. सु. ह. जोशी, डॉ. म.रा. कुळकर्णी, डॉ. रघुनाथ शेळके, प्रा. शिल्पा कुलकर्णी,(संपा.), इतिहास माहीती कोश, पुर्वोक्त, पृ.४१७

१५१. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ.१३९

१५२. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा.),मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ. ७०.

१५३. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा.),मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.७०

१५४. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड १६, पुर्वोक्त, पृ.१४८

१५५. बेहरे ना.के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ.२७४

१५६. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा.),मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.७०

१५७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२४३

१५८. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड १६, पुर्वोक्त, पृ.१४१

१५९. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. ६७

१६०. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्ता, पृ.१५३

१६१. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. २४२

१६२. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. २४२

१६३. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. २३१

१६४. डॉ. कांबळे आर. एच., मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. २४८

१६५. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६७

१६६. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५४४

१६७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२४७

१६८. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५४५

१६९. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.७०

१७०. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड १५, पुर्वोक्त, पृ. ३४

१७१. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा.),मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.७१

१७२. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६७

१७३. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६७

१७४. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२४७

१७५. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६८

१७६. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त,पृ.२५३

१७७. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. १३९

१७८. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. १३९

१७९. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. १४०

१८०. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध), पूर्वोक्त, पृ.२४८

१८१. कस्तुरे कौस्तुभ, ।।पेशवाई।।, पुर्वोक्त, पृ. १४०

१८२. पुराणिक श.श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध), पूर्वोक्त, पृ.२४८

१८३. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त,पृ.२५३-२५४

१८४. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त,पृ.२५४

१८५. हेरवाडकर र. वि. (संपा.), पेशव्यांची बखर, पुर्वोक्त, पृ. २९

१८६. डॉ. कांबळे आर. एच.,मराठयांच्या इति. चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ. २४३-२४४

१८७. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध), पुर्वोक्त, पृ.२४८

१८८. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.६६

१८९. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. २६०

१९०. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. २६०

१९१. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पुर्वोक्त, पृ. १५०

१९२. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा.),मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.७२

१९२अ. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पुर्वोक्त, पृ. १५०

१९३. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ. ७२

१९४. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध), पुर्वोक्त, पृ.२४९

१९५. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पुर्वोक्त, पृ. १५०

१९६. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५४०

१९७. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. २५४

१९८. प्रा. सु. ह. जोशी, डॉ. म.रा. कुळकर्णी, डॉ. रघुनाथ शेळके, प्रा. शिल्पा कुलकर्णी, (संपा.), इतिहास माहीती कोश, पुर्वोक्त, पृ. ४१८

१९९. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, (पुर्वार्ध), पुर्वोक्त, पृ. १९३.

२००. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ.२५८

२०१. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ. ३१-३२

२०१अ. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ.२६०

२०२. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ४३०

२०३. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ४३०

२०४. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.७२

२०५. कुलकर्णी अ. रा. व खरे ग. ह. (संपा.),मराठ्यांचा इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.७२

२०६. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ.२६०

२०७. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ.२६०

२०८. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२५३

२०९. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२५२

२१०. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ.२५४-२५५

२११. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड १६, पुर्वोक्त, ले. १७४, पृ. १३४

२१२. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड १६, पुर्वोक्त, ले.१७४, पृ.१३५

२१३. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. २५५

२१४. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड १६, पुर्वोक्त, ले. १८८

२१५. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड १६, पुर्वोक्त, ले.१७८, पृ. १३६

२१६. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड १६, पुर्वोक्त, ले.१७३ पृ. १३४

२१७. केळकर य. न. (संपा.), (२००८), ऐतिहासिक पोवाडे, मराठयांचा काव्यमय इतिहास, डायमंड पब्लिकेशन, पुणे, पृ. १११

२१८. सरदेसाई गो स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पुर्वोक्त, पृ. १५२

२१९. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६९

२२०. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ.६९

२२१. दिक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त,पृ. १३७

२२२. दिक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त,पृ. १३४

२२३. दिक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्ता,पृ. १३७

२२३अ.प्रा. पुराणिक श.श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२१०

२२४. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ४२८

२२५. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ४२८

२२६. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२५३

२२७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२५३

२२८. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ. ३२

२२९. डॉ.दीक्षित दुर्गा (संपा.), महाराष्ट्र सांस्कृतिक इतिहास कोश, पुर्वोक्त, पृ. २१

२३०. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ. २०९-२१०

२३१. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्ता, पृ. २६०

२३२. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पूर्वोक्त, पृ. ५४७

२३३. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उत्तरार्ध ), पुर्वोक्त, पृ.२५४

२३४. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पूर्वोक्त, पृ. ५५३

## प्रकरण : ०७ बाजीराव-मस्तानी प्रकरणात चिमाजी आप्पांची भूमिका.

७.१ मस्तानी कोण?

७.२ सौंदर्यवती 'मस्तानी'

७.८ बाजीराव-मस्तानी विवाह

७.४ मस्तानीचे पुण्यात आगमण :-

७.५ बहुगुणी मस्तानी.

६.६ मस्तानीचा शनिवारवाडयात प्रवेश.

७.७ बाजीरावास हिंदूधर्मातून काढण्यांचा प्रयत्न.

६.८ चिमाजी आप्पाच्या नजर कैदेत बाजीराव-मस्तानी.

७.९ मस्तानीचे पाटसला प्रयाण.

७.१० मस्तानीस कैद

७.११ मस्तानी प्रकरणात शाहू महाराजांची भूमीका.

७.११ चिमाजी आप्पास उपरती

७.१२ बाजीराव-मस्तानीचा मृत्यू

६.१३ मस्तानीच्या मृत्यू : हत्या वा आत्महत्या?

## *प्रकरण : ०७ बाजीराव-मस्तानी प्रकरणात चिमाजी आप्पांची भूमिका.*

*पेशवा बाजीराव यांच्या जीवनात व परिवारात वादळ निर्माण करणारी स्त्री म्हणजे मस्तानी. मस्तानी बाजीराव पेशव्याच्या जीवनात सन १७२९ मध्ये आली. त्यानंतर १० वर्ष मस्तानी बाजीरावाच्या सहवासात होती. मात्र मस्तानीच्या सहवासात असतांना बाजीराव पेशवा यास काही वाईट सवयी जडल्या. बाजीराव मद्यपान व मांसभक्षण करु लागला. परिणामी बाजीरावाच्या परिवारातील सदस्य संतप्त झाले. एवढेच नव्हे तर घरातील मंडळींनी बाजीराव यांच्यापासुन मस्तानीस दुर करण्यासाठी तिला कैदेत टाकले. त्याप्रसंगी बाजीराव पेशवा आपल्या आवडत्या प्रेयशीची सुटका करु शकला नाही. शेवटी तिच्या विरहाने तो दु:खी बनला. त्या दुखाच्या छायेतच पेशवा बाजीराव रावेर येथे मृत्यू पावला. त्या मस्तानी- बाजीराव प्रकरण चिमाजी आप्पांची भूमिका काय होती हे प्रस्तूत प्रकरणात माडण्याचा एक प्रयत्न.*

### *७.१ मस्तानी कोण?*

*मस्तानी कोण? कोणाची कन्या? तसेच मस्तानीची आई हिंदू होती वा मुसलमान? हे प्रश्न आजतागायत अनुत्तरीय आहे. असे असले तरी उपलब्ध साधनाच्या आधारे मस्तानीच्या संदर्भात खालीलप्रमाणे वर्णन केलेले दिसतात.*

*१) मस्तानी ही निजामाच्या जनानखान्यातील एखादी स्त्री असावी. ती हिंदू असुन मुसलमान राज्यांत राहत असे. परिणामी निजामाच्या जनानखान्यात तिचा प्रवेश झाला. जेव्हा बाजीराव पेशवा यांने पालखेड येथे निजामाचा पराभव केला. त्यावेळी बाजीराव - निजाम यांच्यात मुंगी शेवगांवचा तह झाला. त्याप्रसंगी बाजीरावाला संतुष्ट करण्यासाठी निजामाने आपल्या जनानखान्यातील अप्रतिम स्त्री मस्तानी बाजीरावास अर्पण केली. याविषयी असेही सांगीतले जाते की, मुंगी-शेवगावच्या तहानंतर बाजीराव औरंगाबादेस गेले असता तेथे त्यांने निजामाची भेट घेतली. भेटीनंतर पेशवा बाजीराव परत आपल्या निवास्थानी गेल्यावर बेगमने नवाबास (निजाम) सांगीतले की, 'आपली कन्या वधु आहे, बाजीरावास द्यावयास योग्य आहे. तिचे लग्न करुन बाजीरावाशी घरोबा*

वाढवावा.[१] त्यास होकार देऊन निजामाने मस्तानीचा बाजीरावाशी विवाह लावुन दिला. तिचे नाव मस्तानी.[२] मात्र डॉ. गुजर म्हणतात, 'खानदनी कुटूंबातील निजामासारखा मानी व्यक्ती आपल्या स्वकुलास कमीपणा आणणारे वर्तन करेल असे मुळीच नाही.[२अ] तर कस्तुरे म्हणतात, 'विशेष म्हणजे निजामाने मस्तानी बाजीरावस दिली असती तर पुढे जावई सासरे एकमेकांच्या जीवावर उटतात त्यांचे काय? शिवाय निजामासारखा मुसलमान सत्ताधारी आपली कन्या हिंदू काफराच्या हाती स्वखुशीने देण्याचा विचार क्वचित उगवला आहे. ?[३] त्याकाळात निजामसारख्या मुसलमान शासकांने येवढे मोठे मन केले असते तर कालांतराने बाजीराव व निजाम यांच्यात संघर्ष झाला नसता.

२) मोगल बादशाहीच्या वतीने निजाम दक्षिणेचा सुभेदार असतांना दिल्लीहुन सुजायतखान नावाचा सरदार चालुन आला. त्याप्रसंगी निजामाने चिमाजी आप्पाची मदत मागीतली. तेव्हां चिमाजी आप्पाच्या मदतीने निजामाने सुजायतखानाचा पराभव केला. यावेळी झालेल्या संघर्षात सुजायतखान मारला गेला. तेव्हा सुजायतखान यांच्या मुत्यूमुळे त्याची रक्षा मस्तानी दु:खी झाली. त्या अवस्थेत मस्तानी प्राणत्याग करावयास तयार झाली असता चिमाजी आप्पाने मस्तानीला वाचविले.[४] त्यानंतर मस्तानीला पुण्यात आणण्यात आले. याचवेळी पेशवा बाजीराव बुंदेलखंडातील मोहीम यशस्वी करुन परत आले असता सातारा मुक्कामी बाजीराव व चिमाजीची भेट झाली. त्याप्रसंगी चिमाजी आप्पांने बाजीरावास सांगीतले की, 'मस्तानी कलावंतीन आणली तिचा स्विकार करावा.' बाजीरावाने मस्तानीचे रुप पाहुन तिचा स्विकार केला.[५] चिमाजी आप्पाचे धार्मीक व नीतीपरायण स्वभाव लक्षात घेता तो असे करेल असे वाटत नाही.[६] तसेच सनातनी विचाराच्या आप्पाच्या हातुन असे कृत्य झाले असेल असे वाटत नाही.

३) जाफर जीनत म्हणतात, 'मस्तानी ही निजामाच्या हैद्राबाद दरबारात असलेल्या पर्शीयन मुस्लीम रुहानीबाई या नर्तीकीची कन्या होती.'[८]

४) मोगल सुभेदार महम्मंद बंगष यांने स्वतंत्र राज्य निर्माण करणाऱ्या छत्रसालाविरुध्दा मोहीम काढली. तेव्हा बंगष व छत्रसाल यांच्यात संघर्ष सुरु असतांना राजा छत्रसालाने पेशवा बाजीरावास मदतीची हाक दिली. त्यावेळी अतिशय बिकट परिस्थितीत बाजीरावाने छत्रसालास मदत केली व महमंद बंगषचा बंदोबस्त केला. परिणामी छत्रसालाने बाजीरावास आपला पुत्र मानून आपल्या

जहागीरीचा तिसरा हिस्सा व मस्तानी नावाची कन्यारत्न अर्पण केली.[७] मस्तानी ही बाजीरावास छत्रसालापुसन प्राप्त झाली असावी. मस्तानी संदर्भात प्रा. बिरादार आपल्या पेशवाईचा कालखंड या पुस्तकात लिहीतात, "मस्तानीची आई मध्य आशीयातून आलेली छत्रसालाच्या दरबारातील नर्तकी होती."[८]

वरील सर्व वर्णना वरुन मस्तानी नक्की कोणाची कन्या होती याविषयी गोंधळ दिसून येतो. मात्र छत्रसालाच्या जनानखान्यात अनेक स्त्रीया होत्या. त्यात विविध धर्माच्या व जातीच्या स्त्रियांचा समावेश होता. त्यापैकी एका स्त्रीच्या पोटी मस्तानीचा जन्म झाला असावा. अर्थातच ती राज्यकन्या होती. नृत्यगायनादि कला मुलीस लहानपणापुसन शिकवून त्या धनिकास देण्यांचा रिवाज त्यावेळी प्रचलित होता. दक्षिणेपेक्षा अशा मुलींची पैदास उत्तरेत विशेष होत असे. कदाचित मराठयांच्या फौजेबरोबर असे सौदागर फिरत असतील. या गृहस्थाकडून छत्रसालाने तिला घेऊन बाजीरावास दिली असणे शक्य आहे.[१०] त्याकाळी थोर पाहुण्यांचा सत्कार अशारीतीने करण्याची प्रथा होती. मस्तानी मुसलमान बीजाची एवढयावरुनच ती मुसलमान गणल्या गेली.[११] मस्तानीची आई ही इराणच्या मुसलमानी वंशातील असल्यामुळे तिने आपल्या मुलीचे नाव एक सुफीपीर 'मस्तानबाबा' यांच्या नावावरुन 'मस्तानी' असे ठेवले.[१२] बुंदेलखंडाचा राजा छत्रासाल यांच्या एका मुसलमान रक्षेपासुन समशेरखा, खांजहा आणि मस्तानी अशी तीन अपत्ये होती.[१३] मस्तानी कोणाची कन्या होती याविषयी जसे वाद आहेत तसेच ती बाजीराव यांचे कडे आली तेव्हा तिचे वय कीती याविषयी पण दुमत आहे. मस्तानी ही बाजीराव कडे जेव्हा आली तेव्हा मस्तानी १४-१५ वर्षाची असावी.[१४]

मस्तानी ही छत्रसालाची कन्या अथवा नर्तकी मुलगी मानली जाते. ती स्वत: धर्माने मुसलमान होती.[१६] मस्तानी कोणाची कन्या होती याविषयी जसा वाद आहे तसेच ती कोण्त्या वंशाची हेही स्पष्ट होत नाही. परंपरेनुसार ती एक हिंदू वडील व मुसलमान आईची मुलगी मानली जाते. ती स्वत: धर्माने मुसलमान होती.[१७]

## ७.२ सौंदर्यवती 'मस्तानी'

मस्तानी मुसलमान असो वा हिंदू, छत्रसालाची अनौरस कन्या असो वा नर्तकी, निजामाच्या जनानखान्यातील स्त्री असो वा कन्या, सुजायतखानाची पत्नी असो वा रक्षा, या विषयी जरी कितीही वाद असलेत तरी मस्तानी अतिशय सुंदर, रुपवान, नृत्यांगना होती याविषयी वाद नाही. मस्तानीच्या सुंदरतेचे वर्णन अनेक ग्रंथांतून स्पष्ट होते. मराठी रियासत या ग्रंथात सरदेसाई गो. स. यांनी मस्तानीचे वर्णन पुढील प्रमाणे केले आहे. 'तिचे सर्वच चरित्र चमत्कृतीजन्य असुन त्यामुळे बाजीरावाच्या चारित्र्याला ही एक शृंगारवीर करुणादि रसोध्दव प्राप्त झाला आहे. रुपवानयौवन नृत्यगानादि गुणसंपन्न अशी ही कंचनी."[१८] ना.के. बेहरे आपल्या 'पहिले बाजीराव पेशवे' या पुस्तकांत मस्तानीच्या सौंदर्याचे वर्णन करतात, 'मस्तानी ही अत्यंत सुंदर, विलासिनी होती. विडा खात असतांना तांबुलाचा लाल रंग तिच्या गळयातून आत उतरतांना दिसत होता."[१९] मस्तानी बुंदेलखंडातील असल्याने तिच्यात राजपुती तेज होते तसेच ती अतिशय गोरी होती.[२०]

मस्तानीच्या सौंदर्याचे वर्णन काही इतिहासकारानी अतिशय अंलकारिक कलेले दिसून येते. इतिहासकार लूनिया म्हणतात,

'मस्तानी का मध्ये एशियाची गौरवर्ण,
मध्ये एसियायी की मुसलमानी तिखी ऑखे,
लम्बा माथा, लम्बा मुख, पतले अधर,
निली आंखे, आकर्षक शरीर सौष्टव

और कमनीयते इसी अवर्णनीय रुपराशीपर बाजीराव आसक्त हो गया.[२१] कौस्तूभ कस्तुरे आपल्या पेशवाई या ग्रंथात मस्तानी विषयी लिहीतात की, "मस्तानी म्हणजे सौंदर्यवान, आकर्षक, मोहून टाकणारी !"[२२]

वरील सर्व वर्णना वरुन मस्तानी ही अतिशय सुंदर, मनमोहीनी होती हे स्पष्टच होते. त्याबरोबर ती उत्कृष्ट नर्तकी व गायीका होती.

### ७.३ बाजीराव-मस्तानी विवाह :

मस्तानीचा विवाह बाजीराव सोबत कशा पध्दतीने झाला हे स्पष्ट झालेले नाही. अनेक अभ्यासकांनी त्याविषयी विवीध मते व्यक्त केली आहेत. बाजीराव पेशवा व मस्तानी यांचा विवाह शास्त्रीय पध्दतीने झाला नसला तरी त्याकाळात गांधर्व विवाह पध्दत क्षत्रियांत रुढ होती. त्या विवाहास 'खांडाविवाह' म्हणत असत. खांडा म्हणजे सरळ तलवार थोडक्यात त्याकाळात तलवारीशी किंवा कटयारीशी विवाह लावण्याची प्रथा होती. अशा प्रकारे ज्या स्त्रियांचे विवाह होत तिला 'खांडाराणी' असे म्हणत.[२३] छत्रसालाने बाजीराव-मस्तानी यांचा विवाह उपस्त्री कींवा खांडाराणी याच पध्दतीने लावला. सोबत बाजीरावास वर दक्षिणाही दिली. तेहतीस लाखाची जहागीर वरदक्षिणा समजण्यास हरकत नाही.[२४] खंजीरासोबत विवाह विधी केला, लेकीस आनंद बहूत दिले, हत्ती व पागा व दासी असे दिली. जवाहर वस्त्रे व भुषणे बहुत दिली.[२५] द. ग. गोडसे म्हणतात., 'राजपुतांच्या क्षत्रिय प्रथेनुसार छत्रसालाने जसे खांडाविवाह केले त्या क्षत्रिय परंपरेनुसार मस्तानीचे बाजीरावाशी झालेले लग्न खांडा विवाह पध्दतीनेच झाले असल्याची शक्यता वाटते. या दृष्टीने तो शास्त्रमान्य गांधर्व विवाहच ठरतो. समजण्यात येते होते तशी मस्तानी ही बाजीरावाची रक्षा नव्हती.'[२६] अशा पध्दतीने विवाह लावलेल्या स्त्रीयांना रक्षा, रखेल्या किंवा नाटकशाळा म्हणत नसत तसेच वेश्या व कलावंतीनही म्हणत नसत.[२७] बाजीराव-मस्तानी यांचा विवाह न होताच मस्तानी सुहागन झाल्याचे वर्णन बी. एन. लुनिया यांनी केलेले आहे. ते लिहीतीत,

'न काझी न पंडीत

न गावाह न बराती

न महेर न दहेज

न खानदान न मजहब एक

न मुल्क फिर भी मस्तानी

अनब्याही सुहागन हो गयी.'[२८]

वरील सर्व वर्णनावरून बाजीराव-मस्तानी यांचा विवाह कसा पध्दतीने झाला हे जरी स्पष्ट होत नसले तरी हा विवाह खांडा विवाह पध्दतीने झाला असावा.

## ७.४ मस्तानीचे पुण्यात आगमण :-

बाजीराव-मस्तानी संदर्भात अनेक घटना स्पष्ट होत नाही. त्याच प्रमाने मस्तानी पुण्याला कधी आली याविषयी पण दूमत आहे. मात्र बुंदेलखंड विजयी करुन बाजीराव पेशव्याच्या फौजा पुण्याच्या जवळ आल्या असता चिमाजी आप्पांने भांबुर्डा आणि गारपिराच्या टेकडयावरुन तोफांचे बार काढण्याची आज्ञा केली.[२९] यावेळी चिमाजी आप्पा समोर पेच निर्माण झाला होता. बाजीराव पुण्याला येत असताना चिमाजी आप्पांना बाजीरावांनी दुसरे लग्न केल्याचे समजले तेव्हा मातोश्रीना समजावयाचे कसे? हा प्रश्न चिमाजी आप्पा समोर उभा राहीला. कारण बाजीराव यांने या दूस-या विवाहसंबंधी मातोश्रीना विश्वास घेतले नव्हते. त्यातही दुसरे लग्न मातोश्री राधाबाई एकवेळ मान्य करतील. पण पत्नी मुसलमान धर्मीय असल्यामुळे राधाबाई तिला स्विकारतील काय? असा प्रशन आप्पा समोर उभा राहीला. त्यावर चिमाजी आप्पांनी तोडगा काढला. त्यानी बाजीरावास विनंती केली की, मस्तानीची व्यवस्था दुसरी कडे लावण्यांची. त्या योजनेनुसार मस्तानीचा मेना पुण्यात न आणता मुक्कामाच्या ठिकाणाकडे वळविण्यांत आला.[३०] बुंदेलखंड मोहीम यशस्वी करुन बाजीराव परत आल्यानंतरच्या पत्रातच मस्तानीचा उलेख येत असल्यामुळे मस्तानी ही बुंदेलखंडातून बाजीरावा सोबत आली या समजूतीलला बळकटी मिळते.[३१]

प्रा. पुराणीक मस्तानीच्या पुण्यातील आगमणा संदर्भात म्हणतात, "छत्रसालाने बाजीरावाचा विवाह लावून दिला. १७२९ च्या मे महीन्यात छत्रसालाचा निरोप घेऊन बाजीराव पुण्याला आला." [३१अ]

मस्तानीचे पूण्याला सन १७२९ मध्ये आगमन झाले. मस्तानी पुण्याला आली आणी भट घराण्यात वादळ निर्माण झाले. त्यावरुन कुटूंबात कलह उदभवला. त्या कलहावर प्रकाश टाकण्यापुर्वी मस्तानीच्या अंगी असलेल्या विवीध गुणांचा आढावा घेणे गरजेचे आहे.

## ७.५ बहुगुणी मस्तानी.

मस्तानी कोण ? कोणाची मुलगी ? कोणत्या धर्माची ? असे अनेक वाद असलेत तरी एक गोष्ट अनेक ग्रंथातून स्पष्ट होते, ती म्हणजे मस्तानी व बाजीराव यांचे सबंध प्रेमाचे व जिव्हाळयाचे

होते. तसेच अत्यंत सुंदर लावण्यवती असलेली मस्तानी तेवढीच बुध्दीमान व चाणाक्ष होती. राजकारणाचे, मुत्सद्दीपणाचे तिचे ज्ञान पेशवा बाजीरावाबरोबर चर्चा व विचार विनीमय करण्याइतपत सखोल होते.[३२] विशेष म्हणजे मस्तानी कंचनी असुनही अश्वरोहनांत विशेष कुशल होती. बाजीरावाप्रमणे तलवार, भाला घेऊन ती त्यांच्याबरोबर भरधाव घौडदौडकरी.[३३] इ. स. १७३७ मध्ये बाजीरावाने आपल्या जीवनातील सर्वात वेगवान दिल्ली मोहीम काढली. त्यावेळी १४ दिवसाचे अंतर त्यांनी दोन दिवसात पुर्ण केले. त्यावेळी मस्तानी बाजीरावा सोबत होती.[३४] मराठी रियासतकार गो. स. सरदेसाई म्हणतात, "तीव्र वेगांत उभयतांच्या टिकोवी यत्किंचित मागेपुढे होत नसत. मोहीमांत ती बाजीरावा सोबत हजर असे. या कसबाने व आपल्या मोहक लावण्यांने बाजीरावाचे चित्त तिने आकर्षून घेतले."[३५] मस्तानी हिंदू स्त्रीयांप्रमाणे कपडे घालीत, बोलीत असे. विशेषत: एका पत्निप्रमाणे ती बाजीरावाच्या सर्व सुविधाविषयी लक्ष घालीत असे.[३६]

मस्तानी पुण्याला आल्यानंतर तिने ब्राम्हणंत्व स्विकारले. पेशव्याच्या वाडयात गणपती उत्सावात मस्तानीचे नृत्य गायन होई. तेव्हा मोठा समाज जमत असे. म्हणजेच संस्कृतीने ती हिंदू बनली होती.[३७] मस्तानी बाजीरावाच्या सोबत माहीमेवर असताना बाजीरावच्या तब्येतीची काळजी घेत असे. तिच्यासहवासामुळे बाजीराव तिच्याकडे आकर्षित झाला.[३८]

## ६.६ मस्तानीचा शनिवारवाडयात प्रवेश.

छत्रपती शाहू यांने बाजीरावास ०२-०४-१७२६ रोजी पुणे कसबा हा प्रांत इनाम दिला होता.[३९] तेव्हा पहिला बाजीराव यांनी सासवड ऐवजी पुणे येथे मुख्यालय करण्यांची कल्पना मांडली.व आपल्या पाच सरदारांना वाडा बांधण्यासाठी इ. स. १७२८ मध्ये पुण्याच्या परिसरात जागा दिली. त्यानंतर शनिवारवाडयाचा भूमिपुजन आणि पायाभरणा विधी पहिला बाजीराव यांनी दिनांक १० जानेवारी १७३० रोजी विधिवत केला.[४०] शनिवारवाडयाचा बांधल्यानंतर त्यात आणखी एक नविन भागाचे बांधकाम करण्यांत आले. त्याचे नाव 'मस्तानी महल' ठेवण्यांत आले.[४१] त्या महालाचा दरवाजास मस्तानी दरवाजा असे नाव ठेवण्यात आले. पहिल्या बाजीरावाच्या सुंदर प्रेयसीवरुन यास हे नाव पडले, परंतू जुन्या बखर वाडमयात या दरवाजास नाटकशाळा दरवाजा

म्हटले आहे.[४२] याशिवाय शनिवार वाडयात बाजीराव पेशवा व काशीबाईचा महाल, आप्पा आणि अन्नपुर्णाबाईचा महाल, मातोश्री राधाबाईचा महाल असे खास महाल होते. बाजीराव पेशवा यांच्या दिवाणखाण्या शेजारीच 'चिमणाबाग' होते. बाजीरावाने आपल्या लहान बंधुच्या नांवे ही बाग वसविली होती.[४३]

या भव्य वास्तूमध्ये मात्र बाजीरावाला शांतता मिळाली नाही. कारण लवकरच मस्तानी प्रकरणातून शनिवार वाडयात कलह निर्माण झाला. त्याला कारण म्हणजे बाजीराव पेश्ववा यांना लागलेले व्यसन होय. त्याकाळात अनेक कर्ते पुरुष मद्यप्राशन करित असत. त्यात ब्राम्हणाचेही अधून मधून नांव ऐकु येते. कोणी चोरुन तर कोणी उजळ माथ्याने मद्य प्राशन करित. बाजीराव हा मस्तानीच्या अखंड सहवासात असल्यामुळे अखेर तो त्या व्यसनात गुंतला.[४४] त्यामुळे पेशवे परीवारात अंतर्गत कलह उदभवला. इ. स. १७३९ च्या चार्तूमासात बाजीराव पेशवाच्या मुक्काम पुण्याला शनिवार वाडयात होता. मातोश्री राधाबाई, भाऊ चिमाजी आप्पा, नानासाहेब, सुनबाई (काशीबाई) व सदाशिवभाऊ इत्यादी सर्व मंडळीनां एकत्र नांदण्याचा योग अनेक दिवसानंतर आला होता. अर्थातच त्यामुळे सण, उत्सव, मोठया आनंदाने उत्साहाने घरात पार पडत होते. श्रावण महिण्यांत असल्यामुळे ब्राम्हणांना दान धर्म करण्यात आला. गोकुळ अष्टमीच्या रात्री मस्तानीचे नृत्यही झाले. विशेषत: पेशवा बाजीरव यांची पत्नी काशीबाई स्वत: हे नृत्य बघण्यास उपस्थित होत्या.[४५] मात्र त्यानंतर मस्तानी-बाजीराव यांच्या संबंधाची चर्चा हळूहळू सर्व पुण्यात होवू लागली.

मस्तानी व बाजीराव यांच्या विषयीची माहीती राधाबाईना समजली ती नानासाहेबाच्या लग्न काळात. मात्र घरात लग्नकार्य सुरु असल्यामुळे मातोश्री त्याविषयी फारसे बोलता येईना. मात्र नानासाहेबाच्या लग्नात मस्तानी येऊ नये याची राधाबाईनी दक्षता घेतली. तरीही लग्न समारंभात मस्तानीचा नाच होऊन मस्तानीला बिदागी मिळाली.[४६] त्यासंबंधी फेब्रुवारी १७३० च्या पत्रात प्रथमत: मस्तानीचा उलेख येतो. 'लग्नसंबंध खर्च देहनशी रु.१०० मिसकीन मस्तान कलावंत, रु.१०० राघे नटवा, रु.२० बाबु गुरव, मिसकीन मस्तान कलावंत सनगे रु. ३०, पेसवना सुटे शालु'[४७] यानंतरच्या काळात बाजीराव हे मस्तानीचा सहवास जजास्तच राहू लागले. याकाळात बाजीराव बहुधा सातारा दरबारात असत आणि पुण्यात आले की, एकतर फडावर नाहीतर मस्तानीकडे राहत

असे. त्यामुळे चिमाजी आप्पा व मातोश्रीला बाजीरावांशी मस्तानी विषयी बोलण्याइतका वेळच मिळत नव्हता. मात्र पुण्यात चित्पावन असणाऱ्या ब्राम्हण पेशव्याने मुसलमान कन्येशी विवाह केल्याची कुजबुज सुरु झाली होती.[४८] त्याचे मातोश्री राधाबाई व चिमाजी आप्पा यांना मनस्वी दु:ख झाले.[४९] बाजीराव पेशवा मस्तानी कडे का ओढले गेले त्याविषयी सरदेसाई म्हणतात की, "बाजीरावाची पत्नी काशिबाई ही शांत व गरीब स्वभावाची होती. पण ती प्रकृतीने बरीचशी अधू होती. या कारणामुळे बाजीरावाचे लक्ष मस्तानी कडे अधिक वेधले असल्याचा संभव आहे."[५०]

यानंतरच्या काळात काही अशा घटल्या ज्यामुळे पेशव्याविषयी परीवारात कलह निर्माण झाला. १ ऑगष्ट १७३४ रोजी रघुनाथरावचा जन्म झाला. रघुनाथरावाच्या जन्मावेळी पुण्यात साखर वाटण्याचा व चौघडा वाजविण्याचा आदेश चिमाजी आप्पांनी दिला. साधारण: याच सुमारास मस्तानीलाही पुत्र प्राप्ती झाली. या पुत्राचे नांव मस्तानीने 'कृष्णसिंह' ठेवले. मस्तानीने कृष्णासिंहाच्या जन्मानंतर खरात वाटली.[५१] आपल्या पुत्राचे मस्तानीने नांव कृष्णासिंह ठेवले तर बाजीराव त्यांचे नावं ठेवले 'शमशेर बहादूर.'[५२] शमशेरबहादूरच्या जन्मानंतर बाजीरावाला मस्तानीची जास्तच काळजी वाटत होती. कारण मस्तानीचा मुक्काम पुण्याबाहेर होता. तो परिसर अतिशय गर्द किर्रान होते. तेथे मस्तानी आपल्या लहाणपुत्र व चार-पाच दास्या व नोकरासह राहत होती.[५३] आणि म्हणून राऊ बहुतेक वेळा मस्तानी कडेच मुक्कामाला राहत असे. परंतू एके दिवशी बाजीराव पेशवा यांने चिमाजी आप्पा व मातोश्री राधाबाई यांच्यापुढे मस्तानीस पुण्यात शनिवार वाडयात आण्याचा विषय काढला मात्र मातोश्रीनी त्यास नकार दिला. चिमाजी आप्पाचेही म्हणणे जवळपास नकोच होते. त्यामुळे नाईलाजाने बाजीरावाला बरेचदा शनिवार वाडयाच्या बाहेरच रहावे लागत असे.[५४] मात्र बाजीराव पेशवा यांने निजामा विरुध्द स्वारीवर जाण्यांपुर्वी आई राधाबाई व बंधू चिमाजी आप्पा यांच्या विरोधाला न जुमानता मस्तानीला शनिवार वाडयात घेवुन आले. यावरुन बरेच वादंग निर्माण झाले.[५५]

यानंतर दिवसें दिवस मस्तानी- बाजीराव यांच्या संबंधावरून पेचप्रसंग निर्माण होत गेले.

### ७.७ बाजीरावास हिंदूधर्मातून काढण्यांचा प्रयत्न.

पेशवाईचा काळ धार्मीक रुढी व परंपरेला महत्व देणारा काळ होता. त्यामुळे ब्राम्हण वर्गाला बाजीराव यांचे वर्तन धर्मविरोधी वाटत असल्यामुळे ब्राम्हणांनी त्यांच्या विरुध्द पवित्रा घेतला.[५६] कारण पेशवा बाजीराव मांस भक्षण-मद्यपान करु लागले होते. मस्तानी सारख्या मुस्लीम स्त्री सोबत दृढ संबंध आणि तिच्या नेहमीचा सहवास सनातनी समाजाला बोचत होता. परिणामी धर्म पंडीताने पेशवा बाजीरावावर बहिष्कार घालण्याचे ठरविले.[५७] मस्तानी ही छत्रसालाच्या (बुंदेल खंडाचा चा राजा) मुसलमान रक्षेपासुन झालेली कन्या असल्यामुळे व तिला बाजीरावाने महालात आणल्याने पुण्यातल्या समस्त ब्राम्हणाने पेशव्यांच्या धार्मीक कार्यावर बहिस्कार घालण्यांची भाषा सुरु केली.[५८] याचवेळी शमशेरची मुंज व्हावी असा हट्ट बाजीराव पेशवा याने धरला होता. तेव्हा ब्राम्हणांनी विरोध करुन बाजीरावास हिंदू धर्मातून काढून टाकण्याचे ठरविले. त्याकरिता पुण्याला ब्राम्हणांची सभा बोलाविले. यावेळी उत्तर भारतातून काही ब्राम्हण आले होते. त्यांना जेव्हा बाजीरावाला धर्मातून बाहेर काढले जाणार असे समजले तेव्हा सभेत जाऊन त्यांनी ब्राम्हणांची निर्भत्सना केली. पेशवा बाजीरावास धर्मातून काढले तर त्याचे वाईट परिणाम होतील असे त्यासभेला उपस्थित असलेल्या ब्राम्हणांना त्यांनी बजावून सांगीतले.[५८अ] तसेच राधाबाईनी सुध्दा ब्राम्हणांना म्हटले की, 'तुम्ही धर्मकार्यास तयार नसाल तर पेशवे काशीहुन ब्राम्हण आणवून धर्मकार्य करतील.'[५९] परिणामी ब्राम्हणांनी बहिस्काराची भाषा बंद केली.

मात्र बाजीरावाला लागलेले व्यसन कसे सोडवावे हा प्रश्न आप्त स्वकीयाना पडला. चिमाजी आप्पा व जवळच्या नातेवाईकाने बाजीराव यांना समजविण्याचा व मस्तानी पासुन दूर राहण्याचा सल्ला दिला. परंतू त्याचा काहीही परिणाम बाजीरावावर झाला नाही.[६०] बाजीराव मस्तानीच्या इतक्या आहारी गेले होते की, एकदा ते साताऱ्यास छत्रपती शाहुच्या भेटीस गेले असता त्यांने आपल्या सोबत नर्तकीस घेतले. त्या बद्दल शाहु महाराजाने बाजीरावाचा निषेध केला. इतकेच नव्हे तर साताऱ्यातील जोशी व अनगळ या पेशव्यांच्या सावकारानेही बाजीरावाची कानउघडणी केली.[६१] पेशवा बाजीराव यांचे स्नेही (जोशी व अनगळ) सातऱ्यास गेले असता, त्यानां बोलावून छत्रपतीने सांगीतले की, "तुम्ही उभयंता बाजीराव याजकडे जाऊन त्यास सांगावे, तुम्ही येथे चार

महिने असुन दरबारात एक दोन वेळा आला, एरव्ही आठही प्रहर कंचनीस घेऊन पडता ही गोष्ट नीट नाही."[६२] याकाळात बाजीरावाच्या सर्व हितचिंतकानी बाजीरावास समजाविंण्याचा प्रयत्न केला. मात्र बाजीरावास मस्तानी विषयी जास्त निकराने सांगीतल्यास तो आपल्या जीवास अपाय करेल असे जवळच्या लोकांना वाटत होते.[६३]

पेशवा बाजीराव यांचे असे प्रकार पाहुन मातोश्री राधाबाई, भाऊ चिमाजी आप्पा व नानासाहेब इत्यादी मंडळींना चीड आली. अशा प्रकारच्या घटना मातोश्री राधाबाईस अत्यंत दुखी व चिंताग्रस्त करणाऱ्या होत्या. म्हणून राधाबाईनी सातारा येथे जाऊन छत्रपती शाहुची भेट घेतली. मस्तानीस बाजीराव यांच्या पासून अलग करण्यांची विनंती राधाबाई नीकेली. मात्र छत्रपती शाहू यांने पेशवा बाजीरावाच्या व्यक्तीगत जीवनात हस्तक्षेप करण्यास नकार दिला. एवढेच नव्हेतर राधाबाईस असा सल्ला दिला की बाजीराव तुमचा पुत्र आहे आपणच बाजीरावाचे वर्तन सुधारण्यास सांगणे योग्य होईल.[६४]

### ७.८ चिमाजी आप्पाच्या नजर कैदेत बाजीराव-मस्तानी.

बाजीराव व मस्तानीचा सहवास परीवारातील सदस्यांना पसंत नव्हता.[६५] चिमाजी आप्पा तर बाजीरावाकडून मस्तानी प्रकरणात दूखावला गेला.[६६] मात्र पेशवा बाजीरावांच्या हट्टापुढे कुणाचे चालत नव्हते. अशावेळी मातोश्री व चिमाजी आप्पा यांना हे अवघड दुखणे निस्तारणे मोठे कष्टदायक होते. पुत्र नानासाहेब प्रस्तुतच्या नाजुक प्रकरणी आजी आणि चिमाजी आप्पांचा पाठपुरावा करित होता. एवढेच नव्हे तर आपल्या वडीलांना वेडा ठरविण्याइतपत नानासाहेबाची मजल गेली होती.[६७] पुण्यात पेशवा बाजीराव यांच्याकडे मातोश्री राधाबाई यांनी तर पाठ फिरविल्या सारखेच केले होते. तर काशीबाईच्या चेहऱ्यावरची नाराजीही लपत नव्हती. मस्तानी - बाजीराव प्रकरणात चिमाजी आपांची तर व्दिधा मनस्थिती झाली होती. याप्रसंगी आप्पा आपल्या पराक्रमी बंधुला आणी करारी मातोश्रीना दोघांनाही सांभाळून घेण्यांची तारेवरची कसरत करत होते.[६८]

बाजीराव- मस्तानी प्रकरणामूळे त्याकाळी काय स्थिती निर्माण झाली होती त्याचे वर्णन विश्वाव पाटील यांनी पूढीलप्रमाणे केले आहे. "उत्तर हिंदूस्थानात आपल्या घोडदौडीने विजयाचे

झेंडे गाडणारा प्रतापी बाजीराव एका सौंदर्यवतीच्या मोहपाशात गुरफटून जावा, या कल्पनेने तत्कालीन राजकारणात मोठी खळबळ माजली होती. एकीकडे उभा शनिवारवाडा चिंतातूर, जागोजागाचे सरदार-दरकदार हवालदिल."[६९] मस्तानी -बाजीराव यांच्या प्रेम संबंधाने राजकारणात खळबळ माजली होती. मस्तानी महालात अधुन मधुन वावरणाऱ्या पेशवा बाजीराव यांना असंतोष जाणवत नव्हता असे नाही. परंतू मातृभक्त आणि बंधुप्रेमी विश्वपुरुषही मस्तानीचा मोह आवरु शकला नाही.[७०] तसे पाहता बाजीरावाची मातृभक्ती निस्सीम होती. तो मातोश्री पुढे सदैव नम्र असे. चिमाजी आप्पा लहान असला तरी त्याच्या सदाचारामुळे व शहाणपनामुळे बाजीराव चिमाजीचा मान ठेवित असे.[७१] मात्र 'आमचा एवढाही हट्ट मातोश्री व आप्पाने चालवू नये' याची बाजीरावास खंत वाटत होती. परीणामी बाजीराव यास पुण्याला रहावेसे वाटत नव्हते. शनिवाडयातही राहणे नको म्हणून शेवटी बाजीरावाने रेवातीरी जाण्याचा निर्णय घेतला.[७२]

याचवेळी मातोश्री राधाबाई, चिमाजी आप्पा व नानासाहेब यांनी बाजीरावाचा मस्तानी सोबतचा सहावास तोडण्याचा प्रयत्न केला.[७३] कारण मातोश्री राधाबाईने सदाशिवरावाचे विवाह व रघुनाथरावाची मुंज ही कार्य करण्याचे ठरविले.[७४] मात्र पुण्यात बाजीराव विषयी असंतोष होता. तेव्हा धर्मपंडीतानी रघुनाथरावाचा यज्ञोपावित व सदाशिवराव भाऊचा विवाह सोहळा संपन्न करण्यास नकार दिला.[७५] पेशवा बाजीरावाचा काळ हा सनातनी धार्मीक, वर्चस्वाचा काळ होता. रुढी, परंपरा, जातीभेद, धर्म, इत्यादी चे वर्चस्व समाजावर मोठया प्रमाणात होते. अशाकाळात बाजीरावाने मस्तानी या मुस्लीम स्त्री सोबत ठेवणे ब्राम्हण वर्गाला अधर्मिय वाटत होते.[७६] एवढेच नव्हे तर बाजीराव पेशवा यांच्या वर्तनामुळे पेशव्याच्या घराचे अन्मोदक व्यवहार ब्राम्हणाने करु नये अशी चर्चा सुरु झाली.[७७] आता स्वकीय बाजीरावाच्या वर्तनाने अत्यंत संतप्त झाले. त्यांना असे वाटत होते की, बाजीरावाने मस्तानीचा नाद सोडावा. बाजीरावाने असे न केल्यास आपण जबरदस्तीने मस्तानीस दूर करावी. शक्यतोवर तिला जगातूनच नाहीशी करावी. असा विचार जवळच्या लोकात काही काळ चालला होता.[७८] तर पेशवा याला घरच्यांनीच वाळीत टाकल्यासारखेच केले होते. सतत मस्तानीच्या असण्यावरुन घरात मंडळीचे नाराज चेहरे त्यांना पुण्यापासुन लांब राहण्यांस प्रवृत्त करु लागले.[७९] तर मस्तानीच्या मोहपाशातून बाजीरावाची सुटका कशी करावयची हा प्रश्न आप्त

स्वकियांनायांच्या समोर होता. अशावेळी समजुतीच्या गोष्टी सांगुन बाजीरावानी ऐकले तर ठिक नाही तर मस्तानीस दूर पळवून अथवा नजर कैदेत ठेवून प्रकरण मिटवावयाचे असा कठोर निर्णय चिमाजी आप्पा व मातोश्रीनी घेतला.[८०] मात्र आपल्या निर्णयाची अंमलबजावणी धुर्तपणे नानासाहेब यांच्यामार्फत करण्याचे त्यांनी ठरविले. बाजीराव पुण्याला असतानाच मस्तानीस नजर कैदेत ठेवण्यांत आले. मस्तानीला बाजीरावाकडे जाण्यास प्रतिबंध करण्यासाठी तिच्याभोवती चौक्या पहारे बसविले.[८१] अर्थातच या चौकी पहाऱ्यामुळे मस्तानी फार नाराज झाली असे दिसते.

बाजीरावास मस्तानीपुसन दूर करण्यांची त्यांची ही जालीम मोहिम होती.[८२] मस्तानी भोवती चौकी बसविल्यामुळे मस्तानी नाराज झाली होती. त्यावेळी मस्तानीने विंनती केली की, "साहेबाच्या परवानगी वाचून आपण रायाकडे जाणार नाही, पण या चौक्या उठवा, वाटल्यास दहा बायका वाडयात जेथे झोपत असतील तिथे माझी व्यवस्था करा." [८३] मात्र तिचे म्हणने कोणी ऐकल्याचे दिसत नाही.

### ७.९ मस्तानीचे पाटसला प्रयाण.

आप्तस्वकीयानी मस्तानीस नजरकैदेत ठेवल्यामुळे बाजीरावा समोर मोठाच पेच निर्माण झाला. मातोश्री राधाबाई, चिमाजी आप्पा, नानासाहेब यांनीच पुढाकारी घेतल्याने बाजीराव पराक्रमी असुनही मस्तानीस सोडवू शकला नाही. त्यामुळे अतिशय हताश मनाने व दु:खी अंतकरणाने बाजीराव पेशवा पुण्याहून पाटसला निघून गेला.[८४] बाजीराव पेशवा जेव्हा यवत भुलेश्वर जवळ पाटसाला येऊन राहिले. नेमकी हीच संधी साधुन चिमाजी आप्पांनी शनिवारवाडया भोवती चौक्या बसवून तिला नजर कैदेत टाकले. परंतू मस्तानीला बाजीरावाचा विरह सहन होत नव्हता. काही महिने असेच गेल्यावर एक दिवशी (रात्री) मस्तानी चौकी पहाऱ्याची नजर चुकवून पाटसला बाजीरावाकडे निघुन गेली.[८५] म्हणजेच नोंव्हेंबर १७३९ मध्ये मस्तानीने स्वता:ची सूटका करुन बाजीरावाजवळ पाटसला गेली.[८६] हा प्रसंग तत्कालीन एका पत्रात स्पष्ट रेखाटला आहे, "तिचा व रायचा अतिसहवास झाला. याजमुळे राऊ विलासी फार जाले. याजकरिता मातूश्रीनी व आप्पानी रायाला सांगीतले की इचा वियोग चार दिवस करावा. ऐसे म्हणोन दिला हवेलीत ठेवले. बाहेर जाईल

रायाकडे म्हणून चौक्या ठेविल्या. राऊ लगेच करकंबास श्रीच्या दर्शनास गेले. पाटसी येऊन राहीले. इजला त्या खेरीज खमेना. त्याजलाही खमेना याजकरितां युक्तीने हवेलीतून निघुन गेली असेन."[८७] नजर कैदेतून मस्तानी पळून गेल्यामुळे मातोश्री, आप्पा आणि नानासाहेब चकीत होतात.[८८] नोव्हेंबरच्या तिसऱ्या आठवडयात बाजीरावाची छावनी पाटस येथे होती. तिथे एक दिवस अचानक मस्तानीचे आगमन झाले. मस्तानीच्या आगमनाने बाजीराव चकीत व व्यतीत झाला. नजरकैदेतून मस्तानीने पळून जाण्यांचे धाडस केले होते.[८९] अशास्थितीत मातोश्रीने दोन-तीन माणसे बाजीरावांकडे पाटसला पाठविली. महादेव पुरंदरे, मोठे शेठ करंजे आणि परिवारातील आपले हितचिंतक बाजीरावास पाटस येथे भेटले. त्यांनी बाजीराव यांना चांगल्या मार्गाचा अवलंब करण्यांचा सल्ला दिला.[९०] त्यांनी बाजीरावास सल्ला दिला, मस्तानीचा नाद सुटावा, तिला पुण्यास परत पाठवावे. तेव्हा आईचा निरोप बाजीरावास आल्यामुळे आपल्या आवडत्या मस्तानीस दोन शब्द बोलुन बाजीरावाने मस्तानीची रवानगी पुण्यास केली. मातोश्री व चिमाजी अप्पाचे मन मोडणे बाजीरावाला नेहमीच जीवावर येई. विशेषत: बाजीरावावर चिमाजीचे नैतिक वजन असल्यामुळे अप्पाची गाठ पडण्यापुर्वीच बाजीरावाने मस्तानीची रवानगी पुण्यास केली.[९१] असे म्हटले जाते की, मोरशेटांनी मस्तानीच्या सुरक्षिततेची हमी दिली म्हणून राऊंनी मस्तानीला त्या विश्वासावर पुण्याला पाठविले.[९२]

यावेळी मस्तानीला लवकरच चिमाजी आप्पा व मातोश्री समजून घेईल याच एका आशेवर बाजीराव राहत होते. मस्तानीशी मन भरुन येई प्रयत्न बाजीराव बोल्यानंतर बाजीरावाने मस्तानीला शनिवार वाडयास जाण्याचा सल्ला दिला. मात्र मस्तानीचा यावेळी कोठेच जाण्याची इच्छा नव्हती. तरीही बाजीराव यांनी मस्तानीला मेण्यांत बसवून पुण्याला पाठविले.[९३]

### ७.१० मस्तानीस कैद

पाटस वरुन मस्तानी पुण्याला परत आली मात्र तरीही मस्तानी प्रकरण मीटले नाही. उलट २६ जाने १७४० रोजी नानाने चिमाजी आप्पांच्या आदेशाने मस्तानीस पर्वतीच्या बागेत बोलावून संध्याकाळी कैद केले. त्याच दिवशी नानासाहेबाने झालेल्या घटनेचा वृत्तांत चिमाजी अप्पांना

कळविला. याकाळी कोथळा व धनगड हे अतिशय दुर्गम भाग होते. तेथे मस्तानीस पाठविण्याचा आपणवर वाईटपणा न घेता, तिने सत्वर स्वर्गास प्रयाण करावे हाच उद्देश चिमाजी व नानाचा होता. मस्तानीला कैद्र केल्यानंतर त्याचा वृत्तांत नानासाहेब यांनी आप्पास कळविला. नानासाहेब लीहतात, 'शनवार संध्याकाळ, पार्वतीचा बाग असो. मस्तानी बागेत बोलावून कैद केली. कोणी हत्यार धरले नाही. रात्री घरास घेऊस जाऊ. घरात ठेवविसा विचार झाला तर आज्ञेप्रमाणे बंद करुन ठेऊ अथवा चोरुन दहा मानसे बरोबर देऊन कोथळा धनगड येथे भलते जागा पाठवू. स्वामींनी रायाचा जीव जतन करावा. येथून घरात घेऊन गेल्यावर सुचेल ते करु. मारीत नाही. घरी ठेऊ अथवा गडावर चोरुन पाठवू. रायाभोवती चौकी केली पाहीजे. नासरजंगचा मतसता तो (अद्याप) नाही. तवकल (धाडस) करुन फंद नियमित केले. कपाळी असेल ते होईल. स्वामीची आज्ञा (चिमाजीची) व आमचा तवकल (धाडस) करुन येणे प्रमाणे आज संध्याकाळी जहाले.'[९४] नानाच्या हया पत्रावरुन हे स्पष्ट होते की मस्तानीस पकडण्यांचे कारस्थान चिमाजी आप्पाचेच होते. नाना त्याचा कर्ता होता. एवढेच नव्हे तर चिमाजी अप्पा हा या कारस्थानाचा प्रेरक होता.[९५] ज्या पार्वतीवर मस्तानीला कैद केले हीते ती पार्वती ही एक लहाण टेकडी आहे. ती पुणे हया ऐतिहासिक शहराच्या नैऋत्येस वसली आहे. मुख्य शहराच्या सीमेपासुन सुमारे पाचशे यार्डावर आणि पुण्याच्या टपाल कार्यालया पासुन (पोष्ट आफीस) सुमारे साडेतीन मैलांवर पार्वती आहे.[९६]

मस्तानीस फक्त कैद करण्यांचे कारस्थान नव्हते तर तिला ठार करण्यांचाही विचार अंतीम होता की काय? याविषयी नानाने चिमाजी आप्पास पाठविलेल्या पत्रात स्पष्ट होत नाही. "मारीत नाही घरी ठेवू अथवा गडावर चोरुन पाठवू. चोरुन दहा माणसे बरोबर देऊन कोथ ळा धनगड येथे भलते जागा पाठवू.'[९७] मात्र नाना साहेब यांनी कैद केल्यानंतर मस्तानीस आपल्यावरिल संकटाची चाहुल लागली होती, म्हणूनच तिने अन्नाचा त्याग केला होता.[९८] या घटनेविषयी आप्पांनाच दोषी मानल्या जाते. २६ जोनवारी १७४० रोजी आप्पांनी नानासाहेबाच्या हस्ते मस्तानीला कैद करवून आपल्या बंधूच्या पाठीत खंजीर खुपसला होता.[९९]

मस्तानीला कैद केल्यानंतर तिने अन्नत्याग केला. पण नानाचे मन मस्तानीबद्दल इतके कलुषित झाले होते की, ते त्याला सारे ढोंग वाटले. त्याने त्याच दिवशी चिमाजी आप्पांला पत्र

लिहुन सर्व प्रकार कळविला. किंबुहुना, नानाच्या पत्रावरुन तो या दिवसांत जवळ जवळ दरोज आप्पाला पत्र लिहित होता. यावरुनही, या सर्व कारस्थानाच्या मागे मुख्य प्रेरणा चिमाजीची हाती असे दिसते. असेच एक पत्र नाना चिमाजी आप्पाना लिहीतो, "काल येक परवा येक, यैसी पत्रे सेवेशी रवाना केली आहेत. आज हा कालपर्यंत तिने (मस्तानीने) भोजन केले नाही. आमचे मते येकवेळ जाऊन आग्रह करावा म्हणजे निमित्य वारले. सारे भगल (ढोंग) तो दिसतो. परंतू पुढील कार्यावर नजर देऊन सल्ला राबता राखून ठेवावा. पहिली पत्र पाठविली आहेत . त्यांची उत्तरे सत्वर पाठवावीत." [१००]

नानासाहेब यांनी मस्तानीला कैद असले तरी ही वार्ता बाजीरावाला समजू नये याची पण नाना काळजी घेताना दिसतो. आपले हे काररस्थान बाजीरावाच्या कानी जाऊ नये म्हणून याच पत्रात नाना पुढे लिहीतो, "आंबऱ्यास पाठऊन दिले पाहिजे कि, हि तो वर्तमान मनास आणितो की नाही किंवा रायाकडे भेदला असेल न कळे तरी स्वामींनी त्याची नजर कैसी पालथ हि पाहत जावी. नाही तर वाल्याचे हाते रायाचा आप्त होऊन इकडील खबर तिकडे सांगत असेल येथे विशेष काय केले तर स्वामीचा व रायाचा योग असला पाहीजे." [१०१]

### ७.११ मस्तानी प्रकरणात शाहू महाराजांची भूमीका.

बाजीराव पेशवा व मस्तानी यांच्या विवाह झाल्यामुळे धर्मबुडाला (हिंदू) अशा पध्दतीने छत्रपती यांना दरबारातील काही मंडळीनी सांगुन शाहु महाराजांचे कान भरण्याचा प्रयत्न केला. पण शाहू महाराजांनी त्याकडे दूर्लक्ष केले.[१०२] मस्तानीला कैद केल्याची ही बातमी जास्त दिवस बाजीराव यांच्या पासून लपविता आली नाही. मस्तानीला कैद केल्याची वार्ता फुटली व बाजीरावाच्या कानी गेली. त्याचे मन पराकाष्ठेचे प्रक्षुब्ध झाले. [१०३] पुण्यातील वार्ता शाहु महाराजाना समजत होत्या. मस्तानी व बाजीराव यांची जोडी फोडण्याचा एवढेच नव्हे तर मस्तानीस बंद करुन ठेवण्याचा कट होत असल्याचे छत्रपती ऐकून होते.[१०४] पेशव्यास मस्तानी पाहिजे होती व आप्पास बाजीरावाने प्राशनाचे सोडावे हे पाहीजे होते. अशावेळी मस्तानीच्या बाबतीत शाहु महाराजांचा निर्णय घ्यावा

याचा कानोसा आप्पानी घेतला.[१०५] तेव्हा छत्रपती यांनी बाजीराव पेशवा यांना दुखवू नये असे सांगीतले मात्र चिमाजी आप्पांना ते पटलेले दिसत नाही.[१०६]

नाना व चिमाजी आप्पा यांनी मस्तानीस कैद केले आहे ही वार्ता जेव्हा छत्रपती शाहूला समजली. तेव्हा छत्रपती शाहूनी २१ जानेवारी १७४० रोजी नानास पत्र लिहीले. "ऐशियास राजश्री स्वामीची मर्जी पाहता ते वस्तू (मस्तानी) त्याज बरोबर न द्यावी, ठेऊन घ्यावी चौकी बसवावी त्यामुळे राजश्री राऊ खरे जाले. तऱ्ही करावे असे नाही त्यांची वस्तू त्यास द्यावी. त्यांचे समाधन करावे. दुर्वेसनाचा मजकूर त्या वस्तूवर नाही. त्याच्या चित्तास पश्चाताप होऊन टाकतील तेव्हाच जाईल. असे असता चे वस्तूस अटकाव करुन सत्ता तोडू नये." [१०७] महाराजांच्या या भूमिकेमूळे कदाचीत मस्तानीच्या जीवास धोका झाला नसावा.

### ७.११ चिमाजी आप्पास उपरती

मस्तानीस कैद केल्यानंतरच्या काळात बाजीराव पेशवा व चिमाजी आप्पाचे सबंध दुरावलेले दिसतात. तशा प्रकारचे एका पत्रात उल्लेखही येतो. 'श्रीमंत विषयलंपट झाले, त्यामुळे चिमाजी आप्पांशी अंतर पडून निघुन नर्मदा तीरास गेले."[१०८] ही गोष्ट चिमाजीआप्पाला मनस्ताप देत होती. आतापर्यंत असे कधी झाले नव्हते. यावेळी बाजीराव आप्पावर इतका रुष्ठ होता की, बाजीराव यांनी याकाळात चिमाजी आप्पास पत्र सुध्दा पाठविले नाही.[१०९]

पेशवा बाजीराव यांने मनात आणले असते तर तो आपल्या बळावर मस्तानीची सुटका करु शकला असता मात्र त्यामुळे आपल्या परिवारात व समाजात आपल्या विषयी राग निर्माण होईल म्हणून बाजीरावाने तसे केले नाही.[११०] जेव्हा रावेरखेडी चिमाजी आप्पा यांने आजारी असलेल्या बाजीरावाची भेट घेतली तेव्हा त्यास वचन दिले होते की, मी पुण्यात गेल्यावर मस्तानीची रवानगी केल्या जाईल.[१११] त्यानंतर अतिशय दु:खी मनाने चिमाजी अप्पा औरंबाबादवरुन पुण्यास निघाला. त्याने वाटेतच नानास पत्र लिहीले. या पत्रात बाजीरावाच्या मनस्थिती विषयीचा उल्लेख चिमाजीने केला आहे. कारण बाजीराव मस्तानीच्या वियोगाने अतिशय खचून गेला होता. हे आप्पांनी स्वत: पाहीले होते. तेव्हा ७ मार्च १७३० रोजी आप्पानी नानासाहेबास पत्र लिहिले, "चिरंजीव राजश्री

नाना यास चिमणाजी बल्लाळ आशीर्वाद. उपरी येथील कुशल तागाईत छ ११ मोहरम शनिवार जाणून स्वकीये लिहित जाणे. तीर्थरूप राजश्री राऊ स्वामी छ १९ जिल्हेजी गेले. त्या दिवसापासून आम्हांस पत्र लिहून पाठविले नाही. जेथपर्यंत आमचा प्रयत्न चालला तो केला. परंतू ईश्वराचे चित्तास नये. त्यास आमचा उपाय काय आहे? त्याचे प्राक्तनी असेल ते सुखरुप होऊ. आपण निमीत्त घ्यावे ऐसे नाही. यास्तव आज आम्ही निंबदेव्हाऱ्याचा घाट चढलो. दोहो तीही दिवसात पुण्यास जाऊ. पुण्यांत गेल्यावर तिची (मस्तानी) रवानगी त्याजकडे करावी. आपले निमित्य वारावे. त्याचे प्राक्तनी असेल ते होईल ऐसा विचार केला आहे."[११२] या पत्रावरुन आप्पा यांनी मस्तानीला कैदेतून मुक्त करण्याची मानसिकता बनविली होती हे दिसते. हे पत्र म्हणजे चिमाजी आप्पांचे बंधुप्रेम दर्शविणारे आणि त्याही पेक्षा चिमाजी आप्पांच्या मनाचा मोठेपणा होय.[११३] वास्तविक स्वारीत पेशवा व आप्पा एकत्र असतानाही त्यांच्यात पुर्वीचे प्रेम नव्हते. मात्र पेशव्यास मस्तानीचा वियोग दु:सह झाला होता. त्यांच्या वर्तनात चढउतार होत चालला होता.[११४] यावेळी आप्पा बाजीरावास विनवितो. बाजीरावास विश्रांती घ्या, पुण्यास परता चाला अशी गळही चिमाजी घालतो.[११५] मात्र त्याचा उपयोग झाला नाही.

चिमाजी आप्पा जेव्हा बाजीरावाच्या सोबत होंते त्यांना बाजीराव हा मांस भक्षण व मद्यपानाच्या आहार गेल्याचे दिसून आले. बाजीरावाच्या त्या व्यसना संबंधीत चिमाजी आप्पांनी एका पत्रात वर्णन केले आहे. आप्पा लिहतात, 'राऊ घोडयावर बसून चालत होते. असावध होते. पाटिल भेटिस आला त्यास बोलले. कोंबडयाचे प्रयोजन आहे घेऊन येणे, काय बोलतो हा अर्थ चित्तात नाही. मस्तानी जवळून हे विचार निर्माण जाहाले. यांच्या लष्करा भोवती राऊत चौकीस ठेवणे कार्याचे नाही लटका लौकीक होईल.'[११६]

थोडक्यात बाजीराव पेशवा यांना मस्तानी पासुन हे व्यसन जडले असावे असा आप्पाला वाटत होते हे पत्रावरुन दिसते. मात्र आपला बंधू व्यसनी बनल्यानंतरही आप्पांनी बाजीरावचा तिरस्कार केला असे दिसत नाही. बाजीराव मस्तानीच्या अहारी गेल्यावर चिमाजी आप्पानी मस्तानीस शिक्षा केली असेल मात्र आपल्या भावाचा सार्वजनिक अपमान कधिच केला नाही. खाजगीत बाजीरावास चार गोष्टी सांगुन पाहिल्यात.[११७]

चिमाजी आप्पाने बाजीरावाची मनस्थिती ओळखून मस्तानीला त्यांच्याकडे पाठविण्यांची मानसिकता बनविली होती. चिमाजी आप्पांनी रावेर येथे आजारी असलेल्या बाजीरावास वचन दिले होते की, पुण्यास गेल्यावर मस्तानीची रवानगी के ली जाईल. [११७अ] चिमाजीने नानासाहेबास पत्र पाठविले त्यावरुन चिमाजीला बाजीरावाबद्दल आपुलकी होती असेच नव्हे तर त्यांची मानसिकता ओळखण्याची दृष्टी ही होती असे दिसते. मस्तानीच्या संगतीतून राऊस्वामीस सोडवताना आप्पास किती वेदना झाल्या असतील याची कल्पना करता येत नाही. मात्र राऊच्या हट्टापायी आप्पास हात टेकावे लागले.[११८] चिमाजी आप्पाने बाजीरावाचे व्यसन सोडविण्याचा प्रयत्न केला मात्र त्यात त्यांना यश आले नाही.[११९]

चिमाजी आप्पा बाजीरावाच्या मदतीस उत्तरेस गेले असता मातोश्री राधाबाईने चिमाजी आप्पास पत्र पाठवून बाजीरावाबाबत चर्चा करुन त्यांचा विचार जाणून घेणे याची विचारणा करणारे पत्र पाठविले. त्या पत्रात राधाबाई आप्पास लिहीतात, 'चिरंजीवास यांजपाशी बहुत युक्तीच्या विचारे जो विचार करणे तो करुन येणे. चालीवर नजर देऊन जे कर्तव्य ते करावे.'[१२०] राधाबाईनी आप्पांना बाजीराव यांच्या संबंधीत माहीती जाणून घेण्यासाठी वरील पत्र पाठविले. त्या पत्राचे उत्तर देतांना चिमाजी आप्पा लिहीतो की, 'रायांशी चार गोष्टी नम्रतेने बोलणे यैशा बोललो. संप्रत पहिल्यापेक्षा बोलुन चालुन सुखरुप आहेत. देवाची दया आहे. तर दिवसेदिवस संतोषीच होत जातील. चित्तांत मात्र वेध आहे तो कळलाच आहे'[१२१]

बाजीराव व नासीरजंग यांच्या भेटी नंतर १६ एप्रिल १७४० रोजी चिमाजी आप्पा घोड नदी, लोहगांव मार्गे पुण्यांला परत आला. यावेळी चिमाजी आप्पाचा तीन दिवस पुण्यास मुक्काम होता. या मुक्कामात आपल्या मातोश्री राधाबाईशी बाजीरावाच्या समस्येची त्याने चर्चा केली. तसेच मस्तानीला रावेरखेड्याला पाठविण्यांची निकराची मागणी चिमाजी यांनी राधाबाईकडे केली. तिला पाठविणे हे आपल्यावरील वाईटपण टाळण्याच्या दृष्टीनेही चांगले आहे असे मत चिमाजी आप्पांनी व्यक्त केले. मात्र चिमाजी आप्पांचा सल्ला राधाबाईने मनावर घेतला नाही. कारण राधाबाई आपल्या पुत्रास म्हणजेच बाजीरावास ओळखुन होती. गेले सहा महिन्यापासुन दूर असुनही बाजीरावाची मस्तानी विषयीची आसक्ती कमी झाली नव्हती. त्यात आपण मस्तानीस रावेरखेडला

पाठविल्यास मस्तानीच्या सहवासाने बाजीराव कोणत्या थराला जाईल याची कल्पनाही राधाबाई करु शकत नव्हती. बाजीरावाने हातात गंगाजळ घेऊन दारु सोडण्यांची शपथ चिमाजी यांच्या समोर घेतली असली तरी तो दारु सोडेल याची खात्री चिमाजीच काय राधाबाईलाही देता येत नव्हती. त्यातच 'मस्तानी बाजीरावाच्या दृष्टीने महौषधी असली तरी राधाबाईच्या दृष्टीने विषवल्ली होती.' [१२२]

मात्र यावेळी राधाबाईने मस्तानी ऐवजी बाजीरावाकडे अतिशय शांत स्वभावाच्या काशीबाईस रावेरखेडयाला पाठविण्यांचा निर्णय घेतला. तिच्या सहवासाने बाजीरावाचे अंतकरण शांत होण्यांची व तो मार्गावर येण्याची शक्यता जास्त होती. म्हणून २६ जानेवारी १७४० रोजी नानाच्या विचाराने राधबाई यांनी काशीबाई व जर्नाधन यांची रवानगी रावेरखेडयाला केली होती. [१२३] मस्तानी पुण्यांत राहीली या निर्णयामागे राधाबाईची भुमीका महत्वाची ठरली. कारण कौटूंबिक संबधीत अखेरचा निर्णय हा राधाबाईचाच मानण्यांत येई. याबाबतीत राधाबाईने घेतलेला निर्णय मातृभक्त चिमाजी आप्पाने आज्ञाधारकपणे मान्य केला. [१२४]

मस्तानी जरी प्रतिबंधीत होती तरी तिच्या व पेशव्याचा चोरुन-मारुन पत्र व्यवहार चालुच होता. हे पत्र वय्वहार थांबविण्यासाठी चिमाजी आप्पास नानासाहेब यांच्या कडून संदेशही आला. 'राऊत लष्करा भोवते चौकीस ठेवावे इकडे राऊत येउु लागेल तो धरुन एखाद्याचे पारपत्य केले म्हणजे दुसरा कोणी येणार नाही' [१२५] परंतू आप्पास हे पसंद पडले नाही. तेव्हा नानासाहेब यास आप्पा लिहीतात 'यक्सियास ते गोष्ट कार्यात नाही. यास्तव राऊत चौकीस ठेवले नाहीत लष्करांतून राऊत जाईल तो ओलखू येईलेस नाही यैसे असता लटका लैकीक करावा यैसे नाही तुम्हा कडील बोभाट मस्तानीने लिहिल तर तो लटके म्हणावयास आम्हास कार्यास येईल.' [१२६] यावरुन आप्पा या प्रकरणाविषयी जास्त जोखिम घ्यावयास तयार नव्हते.

या काळात बाजीराव व चिमाजी आप्पा घरी नसताना दोन कार्यक्रम पेशवे परीवारात संपन्न झाले. बाजीराव पेशवा व चिमाजी आप्पा वरखेडला होते. तेव्हाच पुण्यांत ४ फेब्रुवारी १७४० रोजी बाजीरावांचे पुत्र रघुनाथ यांची मुंज व ७ फेब्रुवारी १७४० रोजी सदाशिवराव भाऊंचे यांचा विवाह भानु घराण्यातील उमाबाई यांच्याशी लावून देण्यांत आले. [१२७] या दोन्ही कार्याला बाजीराव उपस्थित नव्हते. कदाचित घरच्यानीच त्यांना अशा कार्यापासुन दूर ठेवण्याची भूमिका घेतलेली दिसते.

### ७.१२ पेशवा बाजीराव व मस्तानीचा मृत्यू

नासीरजंगाचा बंदोबस्त करुन खरगोणहुन बाजीराव बुऱ्हाणपुर कडे जात होता. मात्र त्यांच्या मनात यावेळी दोन विचार रेंगाळत होते. एक म्हणजे खरगोण प्रांतात मस्तानी सोबत रहावे आणि दुसरे म्हणजे त्यांचे अंतकरण मातोश्री व भाऊकडे ओढ घेत होते. याकाळात बाजीराव व चिमाजी यांच्यात मस्तानी प्रकरणामुळे दुरावा निर्माण झाला असला तरी बाजीरावाला आपल्या लहान बंधूची काळजी होती. २३ मार्च १९४० रोजी मातोश्रीला लिहीलेल्या पत्रात बाजीरावाने चिमाजीला उन्हाळयात बाहेर जाऊ देऊ नये असे सांगण्यांस तो विसरला नाव्हता. [१२८] बाजीरावाचे पत्र म्हणजे बंधुप्रेम स्पष्ट करणारा दाखलाच आहे. त्या पत्रात पेशवा मातोश्रीना लिहीतात, "प्रस्तुत कोकणातील हवा जबुन आहे. चिरंजीव राजश्री यास (उष्णकाळामध्ये) बाहेर जाऊ न द्यावे. वसईकडे पहावयास जाऊ लागतील तरी येकंदर त्याणी न जावे. मातबर सरदार समागमे आहेत. याजपासुन जे मेहनत घेणे जे घेतजावी. आपण जवळ आहेत. त्यास वरचेवर सांगत जावे."[१२९] थोडक्यात चिमाजी आप्पाने बाजीरावाच्या मस्तानीस कैद करुन ठेवले असले तरी बाजीराव चिमाजी आप्पाची काळजी घेत होता हे दिसुन येते.

नासिरजंगाचा पराभव झाल्यावर बाजीराव नर्मदा तीरी गेले, तर चिमाजी आप्पा पुण्यास परतला. आप्पाच्या ध्यानीमनीही नव्हतें की, बाजीरावाचें हे अखेरच दर्शन ठरणार आहे.[१३०] यावेळी पश्चातापाने विरघळून गेलेल्या आप्पांना आता प्रायश्चित कसं घ्यावं, हे समजेनासं झालं असावं.[१३१]

खरगोण येथे एप्रिलच्या पहिल्या आठवडयात बाजीराव पोहोचला होता. त्यानंतर २० एप्रिल १७४० च्या सुमारास बाजीराव नर्मदा तीरी रावेरखेडी येथे पोहचला. त्यावेळी बाजीरावाचे सारे चित्त मस्तानीकडे लागले होते. चिमाजी आप्पा मार्च अखेर पुण्यांला पोहचला. त्यांने बाजीरावाच्या आग्राहास मान देऊन मस्तानीस रावेरखेडयास पाठविण्यांचे वचन दिले होते.[१३२] याकाळात बाजीरावाला मस्तानी विना जीवन जगणे अतिशय अशक्य वाटत होते. सामाजिक बंधने व कौटूंबिक विरोधांमुळे बाजीराव हताश झाला होता. मात्र मस्तानी नसेल तर जगण्यात अर्थ नाही ही भावना त्याच्या अखेरच्या काळात प्रबळ झाली होती.[१३३] त्याच दरम्यान बाजीरावाची तब्येत बिघडली. ५ एप्रिल १७४० रोजी पेशवा बाजीराव नर्मदा काठी रावेरखेडी आपल्या वाडयात येऊन राहीला.[१३४]

माञ नर्मदाकाठी बाजीराव मस्तानीची (वाट पाहत बसला) प्रतिक्षा करीत होता. तर चिमाजी कुलाब्याला संभाजी आंग्रेचा बंदोबत करण्यांत गुंतला होता. तर मस्तानी कैदेत होती. बाजीराव व मस्तानीस चिमाजी अप्पाने दूर केले असले तरी त्यांचे एकमेकांशी हेरा मार्फत संवाद सुरु होता. आपल्याविरुध्द काय कारस्थान होत आहे. याची माहीती दोघांनाही होती.[१३५]

पुण्याला आपल्या विरुध्द काय सुरु आहे याची कल्पना बाजीरावास नर्मदेच्या काठी समजत नव्हते. परंतू बाजीराव, चिमाजी आप्पाच्या वचनावर विश्वास ठेऊन मस्तानीची वाट पाहत बसला होता. दिवसामागुन दिवस जात होते. तसतसे बाजीराव बैचन होत होता. मात्र मस्तानी येण्यांची चिन्ह दिसत नव्हते. परिणामी बाजीरावाचा अधीरपणा वाढतच गेला. आतापर्यंत चिमाजी आप्पाने वचन दिले व ते पाळले नाही असे कधी झाले नाही. पण जे आजपर्यंत झाले नाही ते आता झाले. चिमाजीने बोलल्याप्रमाणे मस्तानीस पाठविले नाही. ही गोष्ट बाजीरावाच्या जिव्हारी लागली.[१३६]

नर्मदेच्या काठी रावेरखेड्यात बाजीरावाला शेवटीचे दिवस अतिशय मनस्तापात काढावे लागले. याच स्थितीत त्याला ताप आला. यावेळी बाजीराव जवळ पत्नी काशीबाई व पुत्र जनार्दन होता. सर्व त्याची काळजी घेत होते. अशा तापातच बाजीरावने नर्मदा नदीत स्नान करण्याचा आग्रह धरला. सर्वांनी त्यास मनाई केली परंतु तापाने अंग फणफणत असतांनाही बाजीरावाने नर्मदा नदीत अंघोळ करुन मृत्यू ओढवून घेतला. २८एप्रिल १७४० रोजी पेशवा बाजीरावाचा नमर्दा नदीच्या दक्षिण तीरावर रावेर येथे मृत्यू झाला.[१३७]

### ६.१३ मस्तानीच्या मृत्यू : हत्या वा आत्महत्या?

बाजीरावावर जिवापाड प्रेम करणारी मस्तानी ही बाजीरावाच्या मृत्यूसमयी रावेरला उपस्थित नव्हती. काशीबाई सोबत तिला रावेरला पाठविले नव्हते. बाजीरावाच्या मृत्यूसमयी मस्तानी पुण्याच्या महालात होती. जेव्हा बाजीरावाचा मृत्यू झाल्याची बातमी नजरकैदेत असलेल्या मस्तानीस समजली तेव्हा लागलीच तिचा मृत्यू झाला.[१३८] मस्तानीचा मृत्यू तिने स्वत: ओढवून घेतलेला दिसतो. त्यास कारण ही तसेच होते. आपणास बाजीराव असतानाच एवढा त्रास झाला. आता आपणास कोणी त्रासा राहीला नाही असा विचार मस्तानीच्या मनात येवून तिने आत्महत्या केली.[१३९] माञ मस्तानीने

आत्महत्या केली की त्यांची हत्या झाली हे अजून पर्यंत एक रहस्य आहे. मस्तानी बाजीरावा बरोबर सती गेली असे चिमाजी आप्पाला सांगीतल्या गेले.[१४०] मानसिक धक्काने मस्तानीचा मृत्यू झाला की, मस्तानीने आत्महत्या केली हे मात्र कुठेही नमूद करण्यात आले नाही. मस्तानीच्या मृत्यूनंतर तिला बाजीरावाने दिलेल्या टाडा पाबळ यागावी नेण्यात येऊन. पाबळ येथे मस्तानीचे दफन करण्यांत आले.[१४१] पाबळ हे पुण्यापासुन २० मैलावर आहे. तेथे मस्तानीचा एक साधारण कब्र आहे.[१४२] कैदूर, पाबळ ही गांवे मस्तानीस दिलेली होती. शिरुरनजीक पाबळ येथे मस्तानीची कबर गावानजीकच आहे.[१४३] आपण आपले वडील बंधु बाजीराव व मातृसमान त्याची पत्नी यांच्यात दूरावा आणायाला त्याची ताटातुट करायलला, परिणामी दोघांच्या मृत्यूला कारणीभुत झालो, या भावनेने चिमाजी आप्पाचे हात पायच गळाले.[१४३द]

अनेक इतिहासाच्या अभ्यासकानी मस्तानीच्या मृत्यू संदर्भात खालील प्रमाणे मत व्यक्त केले. मस्तानीच्या मृत्यू संदर्भात बिरादार लिहीतात, "पेशवा बाजीरावाचा मृत्यू झाल्याचे समजल्यानंतर नजर कैदेत असलेल्या मस्तानीचाही लगेच मृत्यू घडून आला. मानसिक धक्का बसल्यामुळे की आत्महत्या केल्यामुळे हे मात्र कुठेही नमुद करण्यांत आले नाही."[१४४]

प्रा. श. श्री. पुराणिक या विषयी म्हणतात, 'बाजीरावाच्या निधनाची वार्ता ऐकल्याबरोबर मस्तानीने विष घेऊन किंवा हिरकणी खाऊन आत्मघात करुन घेतला."[१४५] डॉ यादव गुजर यांनी आपल्या मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ या ग्रंथात पुढीलप्रमाणे मत व्यक्त केले आहे. "बाजीरावाच्या मृत्यूने अनाथ झालेली मस्तानी हिने युक्तीने आपली सुटका करुन घेऊन बाजीरावाच्या चितेत उडी टाकून खऱ्या पतिव्रते सारखी सती गेली."[१४६]

वरील सर्व मत विचारात घेता मस्तानीने आत्महत्या केली असावी. मात्र चिमाजी आप्पाने मस्तानीला सती समजून पाबळ येथे मस्तानीचे स्मारक बांधले आहे.[१४७] मस्तानीची अवहेलना तिच्या मृत्यूनंतरही सुरुच होती पाबळ हे मस्तानीचे इनाम गांव होते तरी गावाच्या कब्रस्तानात तिचे दफन करण्यास परवानगी दिली नाही. परिणामी मस्तानीची इतर मुसलमानाप्रमाणे कबर न बांधता समाधी बांधण्यांत आली.[१४८] यावरून मस्तानी विषयी जनतेत सुध्दा असंतोष होता असे दिसते.

अर्थात त्या काळात सरदार, राजा, स्त्रिलंपट नव्हते असे नाही. अनेकांना अनेक पत्नी व उपपत्नी होत्या. परंतू बाजीराव यांने एका एका मुसलमान स्त्रीची घरात स्थापना केली.[१४९] त्यामुळे परीवारात व समाजात असंतोष होता. त्यातही बाजीराव व मस्तानी संबंधाविषयी चिमाजी आप्पाची भुमिका ही संशयास्पद होती. जीवापाड प्रेम करणाऱ्या मस्तानीला कैदेत टाकून चिमाजी आप्पाने एक प्रकारे बाजीराव यांच्यावर अन्यायच केला होता. त्यास दोन कारणे महत्वाची ठरतात. एक तर चिमाजी आप्पा हे सनातनी विचाराचे होते आणि दुसरे म्हणजे आपल्या मातोश्री पुढे आप्पा नतमस्तक होते. त्यामुळे मातोश्रीच्या आदेशाचा आप्पा सन्मान करित. मात्र मस्तानीस कैद केल्यानंतर बाजीरावाची व्यथा पाहून मस्तानीस बाजीरावाकडे पाठविण्याचा प्रयत्न चिमाजी आप्पाने केला परंतू त्यात ते अपयशी ठरले. मात्र मस्तानी प्रकरणात चिमाजी आप्पाला मानसिक त्रास सहन करावा लागला हे खरे.

संदर्भ :

१. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पूर्वोक्त, पृ. ७०

२. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. ७०

३. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. १७८

४. हेरवाडकर र.वि. (संपा.), (१९७५), पेशव्यांची बखर, पुर्वोक्त, पृ. २२-२३

५. हेरवाडकर र. वि. (संपा.), (१९७५), पेशव्यांची बखर, पुर्वोक्त, पृ. २३

६. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. ७०

७. Zafer Zeenat, Tracing The Life Of Mastani, The Hitavad, Dec-2015,pp,05

८. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ. २०५

९. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ. २०५

१०. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५८९

११. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५८९

१२. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पूर्वोक्त, पृ. ११२

१३. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. १७९

१४. सप्रे विद्या, (२०००), मस्तानी कंचनी नव्हे! कुलकामिनी !प्रतिभा प्रकाशन, पुणे. पृ. २०

१३. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५८९

१५. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. ११२

१६. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५८८

१७. सरदेसाई गो. स., मराठों का नविन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. १८३

१८. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५८८

१९. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ. २७९

२०. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. १२६

२१. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ. १०

२२. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. ११२

२३. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [पुर्वार्ध], पुर्वोक्त, पृ. २३४

२४. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [पुर्वार्ध], पुर्वोक्त, पृ. २३५

२५. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [पुर्वार्ध], पुर्वोक्त, पृ. २३४

२६. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [पुर्वार्ध], पुर्वोक्त, पृ. २३५

२७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [पुर्वार्ध], पुर्वोक्त, पृ. २३४

२८. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ. २०६

२९. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. ११४

३०. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. ११४

३१. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. १७९

३२. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ. २०६

३३. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ. ३५

३४. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ. २०६

३५. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५८८

३६. सरदेसाई गो. स., मराठों का नविन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. १८४

३७. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५८९

३८. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ. २०६

३९. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ. २२

४०. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ. २२

४१. सरदेसाई गो. स., मराठों का नविन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ. १८३

४२. डॉ. देशपांडे सुरेश, (अनुवादक र. ब. द. ब. पारसनिस), पेशवे कालीन पुणे, पुर्वोक्त, पृ. २०

४३. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. १२१

४४. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ. ८३

४५. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. १३८

४६. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. ११५

४७. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. १७९

४८. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. ११६

४९. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पुर्वोक्त, पृ. ४०४

५०. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५८७

५१. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. १२२

५२. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. ७१

५३. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. १२६

५४. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. १२६

५५. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. १३६

५६. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ. २०२

५७. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ. ३५

५८. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. १३७

५८अ. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पुर्वोक्त, पृ. ७१

५९. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. १३७

६०. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५९०

६१. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५८९

६२. हेरवाडकर र. वि. (संपा.), पेशव्यांची बखर, पुर्वोक्त, पृ. ६४

६३. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५९०

६४ प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ. २०२

६५. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. १३९

६६. प्रा. सु. ह. जोशी, डॉ. म.रा. कुळकर्णी, डॉ. रघुनाथ शेळके, प्रा. शिल्पा कुलकर्णी, (संपा.), इतिहास माहीती कोश, पुर्वोक्त, पृ. १९०

६७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [पूर्वार्ध], पुर्वोक्त, पृ. २०३-२०४

६८. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. १३७

६९. पाटील विश्वास, फुटात बारा इंचाचे अंतर ??, लोकमत मंथन, १३ सप्टेंबर २०१५, पृ. ०२

७०. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. १३९

७१. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पुर्वोक्त, पृ. ४०३-४०४

७२. दीक्षित म.श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. १३९

७३. कुलकर्णी अ. रा व ग. ह. खरे (संपा.), मराठयांचा इतिहास, खंड-२ पुर्वोक्त, पृ. ७३

७५. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ. २०२

७६. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ. २०६

७७. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५९४

७८. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५९७

७९. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. १४३

८०. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. १८१

८१. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. १६१

८२. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पुर्वोक्त, पृ. १३९

८३. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. १८३

८४. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५९०

८५. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. १३७

८६. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५९०

८७. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ. ८३

८८. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. १८२

८९. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. १३७

९०. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५९०

९१. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ. ८४

९२. सप्रे विद्या, मस्तानी कंचनी नव्हे! कुलकामिनी !, पुर्वोक्त, पृ. १३६

९३. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. १३८

९४. बेंद्रे वा. सी. (संपा.), महाराष्ट्रेतिहासाची साधने, पुर्वोक्त, पृ. ४५५-४५६

९५. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पुर्वोक्त, पृ. ४२३

९६. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ. ८६

९७. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पुर्वोक्त, पृ. ४२२

९८. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पुर्वोक्त, पृ. ४२३

९९. सप्रे विद्या, मस्तानी कंचनी नव्हे! कुलकामिनी !, पूर्वोक्त, पृ. १३६

१००. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड ०९ पृ. ४२३

१०१. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड ०९ ले.३०,पृ. ३३४

१०२. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. ११३

१०३. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पुर्वोक्त, पृ. ४२३

१०४. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५९७

१०५. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ. ८६

१०६. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ. १४१

१०७. सरदेसाई गो. स.(संपा.), पेशवे दफ्तर, खंड ०९ ले. ३२

१०७अ. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५९७

१०८. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५८८

१०९. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.८६

११०. सरदेसाई गो. स., मराठों का नविन इतिहास, खंड-२, पू. १८४

१११. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ. ३५

११२. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड०९ ले.३३

११३. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ. १८५

११४. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ. ८५

११५. दीक्षित म .श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.१८५

११६. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड ०९ ले. ३७

११७. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ.२४२

११७अ. कुलकर्णी अ. रा., पुण्याचे पेशवे, पुर्वोक्त, पृ.३५

११८. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.१७४

११९. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.८५

१२०. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५९६

१२१. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ.१४३

१२२. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पुर्वोक्त, पृ.४३२-४३३

१२३. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पुर्वोक्त, पृ.४३३

१२४. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ.१४३

१२५. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ. ८५

१२६. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड ०९, ले.३०

१२७. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ.१४२

१२८. प्रा. पुराणिक श.श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पुर्वोक्त, पृ.४२७

१२९. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड ०९, ले. ३७

१३०. सप्रे विद्या, मस्तानी कंचनी नव्हे! कुलकामिनी !, पुर्वोक्त, पृ. १३६

१३१. सप्रे विद्या, मस्तानी कंचनी नव्हे! कुलकामिनी !, पुर्वोक्त, पृ.१३६

१३२. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ.१४२

१३३. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ.२०७

१३४. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ.१४३

१३५. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५९७

१३६. प्रा. पुराणिक श.श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पुर्वोक्त, पृ.४३७

१३६अ. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ.२०६-२०७

१३७. सरदेसाई गो. स., मराठों का नविन इतिहास, खंड-२, पुर्वोक्त, पृ.१८६

१३८. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पुर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ.२०७

१३९. गर्गे स. मा. (संपा.), मराठी  रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५९९

१४०. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पुर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ.२०७

१४१. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पुर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ.२०७

१४२. सरदेसाई गो. स., मराठों का नविन इतिहास, खंड-२, पृ.१८७

१४३. गर्गे स. मा. (संपा.), मराठी  रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५९०

१४३अ. सप्रे विद्या, मस्तानी कंचनी नव्हे! कुलकामिनी !, पूर्वोक्त, पृ.१३६

१४४. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ.२०७

१४५. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पूर्वोक्त, पृ.४४३

१४६. डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, पूर्वोक्त, पृ.७२

१४७. सप्रे विद्या, मस्तानी कंचनी नव्हे! कुलकामिनी !, पूर्वोक्त, पृ.१४१

१४८. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पूर्वोक्त, पृ.४४५

१४९. सप्रे विद्या, मस्तानी कंचनी नव्हे! कुलकामिनी !, पूर्वोक्त, पृ.१४८

## प्रकरण : ८ चिमाजी आप्पाचे शेवटचे दिवस.

८.१ चिमाजी आप्पाची कुलाबा मोहीम

८.२ पेशवा बाजीरावाचा मृत्यू (२८ एप्रिल १७४०)

८.३ बाळाजी ऊर्फे नानासाहेबास पेशवाई.

८.४ पेशवा नानासाहेब व राजे संभाजी यांच्यातील समझोता:

८.५ चिमाजीचा आप्पाचा शेवट.

## प्रकरण : ८ चिमाजी आप्पाचे शेवटचे दिवस

### ८.१ चिमाजी आप्पाची कुलाबा मोहीम.

बाजीराव यांचे शेवटचे दिवस अतिशय दु:खात गेले. त्याही परिस्थितीत बाजीराव ससैन्य निजामाच्या हैद्राबादवर चालून गेले. तेव्हां मराठा व निजाम यांच्यात गोदावरी काठी संघर्ष होवून नासीरजंग पराभूत झाला. परीणामी २७ फेब्रुवारी १७४० रोजी नासिरजंग व बाजीराव यांच्यात तह झाला.[१] तहानंतर पेशवा बाजीराव उत्तरेकडे निघाला. यावेळी चिमाजी आप्पास बाजीरावाने बंदेलखंडाकडे पाठविले. कारण नादिरशहाला रोखण्यांची जबाबदारी बाजीरावाने चिमाजीवर सोपविली होती. परंतू बाजीरावास नादिरशहा परत गेल्याचे समजताच ते निश्चींत झाले. त्यामूळे बाजीरावांनी चिमाजी आप्पास पुण्याकडे रवाना केले.[२] यावेळी नासीरजंगाने चिमाजी आप्पास औरंगाबादला बोलाविले होते. म्हणुन चिमाजी आप्पा औरंगाबादला गेले. तेथे त्यांचा नासिरजंगाने मोठा आदर सत्कार केला.[३] तेथून चिमाजी आप्पा पुण्यासाठी परत निघाला.[४] याकाळात कोकणात आंग्रे परीवारात संघर्ष सूरु होता. बाजीरावाने चिमाजी आप्पास कुल्याब्यात जावून संभाजी आंग्रे व मानाजी आंग्रे या दोन भावा मधील मतभेद मिटविण्यांस सांगीतले.[५] याचवेळी चिमाजी आप्पा पारनेर जवळ असताना त्यास मानाजी आंग्रेचे पत्र मिळाले. मानाजी आंग्रेनी चिमाजी आप्पास मदतीची विनवणी केली होती की, "राजश्री संभाजी आंग्रे सरखेल एकाएकी अललीबागेत उतरुन हिराकोट घेतला, सागरगड घेतला, चौलचा कोट घेतला, मचा कोट घेतला, अलीबागेत कुलाब्याचे पाणी बंद केले. चे समय येऊन आपले रक्षण करावे."[६] मानाजी आंग्रे यांचे पत्र मिळताच चिमाजी आप्पा अतिशय जलदगतीने घोड नदीवर आले व तेथेच चिमाजी आप्पा ने मुक्काम केला. यावेळी परिस्थितीचे गांभिर्य लक्षात घेवून चिमाजी आप्पां यांनी मानाजी यास मदतीच्या आश्वासनाचे पत्र पाठविले. तसेच इंग्रजांनाही पत्र पाठवून मानाजी आंग्रेला सहकार्य करण्याविषयी चिमाजी आप्पाने लिहिले. दुसऱ्या दिवशी चिमाजी आप्पा विस कोसाचा मजल मारीत लोहगांवास आला.[७] तेथे त्यांनी नानासाहेबास बोलाविले व त्यास मानाजीच्या मदतीसाठी रवाना करुन चिमाजी आप्पा १०/०४/१७४० पुण्यास परत आला.[८] पुण्यात आल्यानंतर त्यांनी काशीबाई, जर्नाधन यांना महादजी

अंबाजी यांच्या सोबत बाजीरावाकडे रावेरखडेला रवाना केले[९] यावेळी चिमाजी आप्पाचा तिन दिवस पुण्यात मुक्काम होता. त्यानंतर मातोश्रीचे दर्शन व आज्ञा घेऊन चिमाजी आप्पा कुलाब्याकडे निघाले. ९ एप्रिल १७४० रोजी आप्पा पाली येथे पोहचला. त्यांनतर नानासाहेब व चिमाजी आप्पा दोघेही चैत्र पोर्णीमे पासुन वैशाखा पर्यंत अलीबागेतच होते.[१०]

नानासहेबांनी मानाजीचे पत्र मिळताच वसुदेव जोशी, विठ्ठल शिवदेव अंताजी यांना ताबडतोब मानाजीच्या मदतीस पाठविले होते. यावेळी मानाजी व संभाजीच्या सैन्यात संघर्ष सुरु होता. दोन्ही बांजूनी तोफेचा मारा सुरु झाला. त्यात पाच माणसे मारली गेली. तेव्हा स्वत: संभाजी अलीबागेत येवून बसला.[११] तेव्हां मानाजी व संभाजी यांच्यात चकमक होऊन मानाजीचे दहा-विस माणसे ठार झाली असता मानाजीने माघार घेतली. परंतू याचवेळी इंग्रजांची मदत मानाजीस आल्यामुळे कुलाबा किल्यात पाण्याची सोय झाली.[१२] याच दरम्यान चिमाजी आप्पा कुलाब्यास येवून पोहचले होते. एप्रिलच्या मध्यात चिमाजीचे सैन्याने हिराकोट नजीक संभाजीची चौकी हस्तगत केली, पंचविस-तीस माणसे कापून काढलीत. त्यावेळी संभाजीचा भाऊ तुकाजी हा जखमी झाला. यावेळी मराठयांना अलीबागेतुन संभाजीला हुसकावण्यासाठी इंग्रजांची मदत घ्यावी लागली. इंग्रजांने आरमारी मदत केल्यामुळे संभाजीकडे जाणारी पाल व मिरगडे ही ठाणी चिमाजी आप्पाने काबीज केली.[१३] यावेळी संभाजीने आपले बरेचसे सैन्य सुवर्णदुर्ग कडे पाठवून दिले. मात्र तो मागे राहुन खाडीजवळ दबा धरुन बसला होता.[१४] त्याची वळवळती शेपुट निश्चल करणे आप्पास कठीण नव्हते. परंतू याच दरम्यान बाजीराव पेशवा मृत्यू पावल्यांची वार्ता समजताच आकाशाची कुऱ्हाडच नाना व आप्पावर कोसळ्ली.[१५] परिणामी आप्पा व नानासाहेबाना कुलाबा मोहीम आटोपती घ्यावी लागली.

## ८.२ पेशवा बाजीरावाचा मृत्यू (२८ एप्रिल १७४०)

बाजीराव व चिमाजी आप्पाची शेवटची भेट नासीरजंग विरुध्दच्या स्वारीच्या वेळी झाली होती. त्यावेळी बाजीरावाची तब्येती विषयीचे पत्र स्वत: चिमाजी आप्पाने मातोश्री राधाबाईस पाठविल होते. त्यात आप्पा लिहीतात, 'रायासही च्यार गोष्टी नम्रतेने बोलणे तैस्या बोललो. सांप्रत पहिल्यापेक्षा बोलून चालुन भोजन करुन सुखरुप आहोत. देवाची दया तर दिवसे दिवस संतोषीच

होत जाईल."[१६] ज्यावळी बाजीराव पेशवा खानदेश मध्ये होता तेव्हा पासुनच मस्तानीच्या विरहाने दु:खी होता. त्यानंतर हताश होऊन बाजीराव पेशवा उत्तरेस निघाला. याचवेळी चिमाजी आप्पाला बाजीरावाच्या मानसिकतेची कल्पना आली होती. त्यामुळे औरंगाबादेहुन परत पुण्यांस आल्यावर चिमाजी आप्पांनी मातोश्री राधाबाईपुढे मस्तानीस बाजीरावाकडे पाठविण्यांचा विचार व्यक्त केला. परंतू मातोश्री पुढे त्यांचा इलाज चालला नाही. यादरम्यान २६ मार्च १७३० रोजी सौ. काशीबाई, बाजीरावाचा पुत्र जनार्दन यांना महादजी अंबाजी सोबत रावेरखेडी कडे रवाना केले.[१७] याकाळात बाजीराव मस्तानीची वाट पाहत होता. परंतू दिवसा मागून दिवस गेले पण मस्तानी येण्यांचे कोणतेही चिन्ह दिसत नव्हते. त्यामुळे त्यांचा आधीरपणा वाढतच गेला. याकाळात त्यांचे एकनिष्ठ सेवक मल्हाराव होळकर, पिलाजी जाधव, राणोजी शिंदे त्यांच्या सोबत छावणीत होते. परंतू हे सारे असूनही कोणी आपल्याजवळ नसल्याचाच भास पेशवा बाजीरावास होत होता. वाट फक्त मस्तानीची होती.[१८] यावेळी पुण्यात काय चालले आहे याची पेशवा बाजीरावास कल्पना नव्हती. बाजीराव फक्त चिमाजी आप्पांच्या वचनावर विश्वास ठेऊन मस्तानीची वाट पाहत होता. आजपर्यंत चिमाजी आप्पाने वचन दिले आणि ते मोडले असे कधी झाले नाही. पण जे आजपर्यंत झाले नाही ते यावेळी झाले होते.[१९]

सौ. काशीबाई, जनार्दन हे रावरखेडी पोहचण्यापुर्वीच राऊची तब्येत बिघडली होती. नशीब बल्लवत्तर म्हणून दोन दिवस आधी काशीबाई व जनार्धन रावेर येथे पोहचले. याकाळात बाजीराव पेशवा यांच्यावर वैद्यकिय उपचार सुरु होता. शिवाय राऊची तब्येत ठिक व्हावी यासाठी विविध उपाय करण्यांत आले. २३ एप्रिल १७४० रोजी २५ धर्मदाय व ३ उदकुंभ केले. अनेक ब्राम्हणांच्या साहाय्याने हा जप सुरु केला. यावेळी भरपुर प्रमाणात ब्राम्हणांना दानधर्म करण्यांत आला.[२०] काशीबाई रावेरला पोहचल्यानंतर त्यांनी राजेश्वराच्या मंदीरात ब्राम्हणांना मृत्यूंजय जप कराण्यासाठी बसविण्यास सांगीतले. यावेळी अहोरात्र मृत्यूंजय जप सुरु होता.[२१] मात्र नर्मदेच्या काठी रावेरखेड्यात बाजीरावाला शेवटीचे दिवस अतिशय मनस्तापात काढावे लागले. याच स्थितीत त्याला ताप आला. यावेळी बाजीराव जवळ पत्नी काशीबाई व पुत्र जनार्दन होता. सर्व त्याची काळजी घेत होते. अशा तापातच बाजीरावने नर्मदा नदीत स्नान करण्याचा आग्रह धरला. सर्वांनी त्यास मनाई केली परंतु

तापाने अंग फणफणत असतांनाही बाजीरावाने नर्मदा नदीत अंघोळ करुन मृत्यू ओढवून घेतला. २८ एप्रिल १७४० रोजी पेशवा बाजीरावाचा नमर्दा नदीच्या दक्षिण तीरावर रावेर येथे मृत्यू झाला.[२२]

बाजीरावाच्या मृत्यूविषयी कौस्तूभ कस्तूरे म्हणता, "अवघ्या चाळीस वर्षाच्या आयुष्यात बेचाळीस लढाया लढून कायमच अजिंक्य राहीलेला हा 'इश्वरदत्त सेनानी' शेवटच्या काळात मात्र आयुष्याची लढाई हरला होता. अखिल हिंदूस्थानात  मराठयांना स्थान मिळवून देऊन दबदबा निर्माण करणारा शिवछत्रपतींच्या स्वपनातल्या 'स्वराज्याला' 'साम्राज्य' बनवणारा हा धीरोदत्त पेशवा हा पुन्हा न परतण्याकरता स्वर्गाच्या मोहीमेवर गेला होता"[२३]

बाजीराव पेशवा यांच्या मृत्यूचे वर्णन व त्यामुळे पेशवा परिवाराची परिस्थीती काय झाली यांचे वर्णन शाहीर त्रिंबक साळी करतात.

" एका खडी बोला कशि गत झाली बाजीला।। धृ।।

कक काशीबाई गहिवरे। खख खबर गेली पुणियारे।।

गग गाय जशि हंबरे । घरोघरी झाला  कहर ।। देव कोपला ।। काशिणा ।। १

नाना पुस्ततसे आपला । चिमाजी गहिंवरे दाटला ।। छ छ  छत्र होते आम्हाला ।

जज जनम थोडा जाहाला ।। पहाड पडला ०।।"[२४]

बाजीरावा मृत्यू पावला त्यावेळी चिमाजी आप्पा व नानासाहेब कुलाब्यास मानाजी व संभाजी आंग्रे यांच्यातील वारसा संबंधीत समस्या सोडविण्यासाठी वाटाघाटी करित होते. बाजीरावाच्या मृत्यूची वार्ता समजताच त्यांनी वाटाघाटी सोडून दिल्या. तेथेच श्राध्द व इतर धार्मीक विधी पार पाडून ते पुण्यास परत त्यायास निघाले.[२५] २६ मे १७४० रोजी नानासाहेब व चिमाजी पुण्यास पोहचले.[२६]

### ८.३ बाळाजी ऊर्फे नानासाहेबास पेशवाई.

रावरखेडी येथे पहिला बाजीराव पेशवा मृत्यू पावला. चिमाजी आप्पा व नानासाहेब बाजीरावाच्या मृत्यूसमयी हे कुलाब्यास मनाजी आंगरे यांच्या मदतीस गेले होते. तेथे त्यांना बाजीराव पेशवा यांच्या मृत्यूची बातमी मे महिन्यांच्या आरंभी मिळाली.[२७] तेथेच काही धार्मिक क्रिया वैग्ररे पार

पाडलीत तसेच आंग्र्यांचे प्रकरण मिटविले.[२८] त्यानंतर २६ मे १७४० रोजी चिमाजी व नानासाहेब हे महादोबा पुरंदरे यांच्यासह पुण्यास पोहले. जेव्हा त्यांनी शनिवार वाडयात प्रवेश केला त्यावेळी संपूर्ण पुण्यात स्मशान शांतता पसरली होती. मातोश्री देवघरात बसलेल्या होत्या. त्यांच्यापुढे जाण्यांची हिंमत दोघानाही होत नव्हती. शेवटी चिमाजी आप्पाने नानाच्या खांदयायावर हात देवून आत गेले. त्याप्रसंगी गळामिठी घालून सर्वांनी आकांत केला.[२९] त्यानंतर दोन दिवसानी २८ मे १७४० रोजी पुण्याला दरबार भरवून बाजीरावाच्या निधनाबद्दल शोक व्यक्त करण्यांत आला.[२९] याचवेळी साताऱ्याहुन पुण्याला निमंत्रण घेवून नारोराम मंत्री व जिवाजी खंडेराव हे दोघे नानासाहेबास नेण्यांकरिता मुद्दाम पुण्यास आले.[३०] छत्रपतीने चिमाजी व नानासाहेब याना साताऱ्यास बोलाविले होते. मात्र काशिबाई व जनार्धन अद्यापही पुण्याला आले नव्हते. त्यामुळे साताऱ्या जाण्यास विलंब झाला. ३ जुन १७४० रोजी सैनिकांच्या संरक्षणाखाली विदर्भ मार्गे काशीबाई पुण्यास आल्या. त्यांनतर १३ जुन रोजी चिमाजी आप्पा व नानासाहेब पुण्याहुन साताऱ्यासाठी निघाले. २५ जुन १७४० रोजी भुईंज येथे नानासाहेब याना पेशवाईची वस्त्रे देण्यांत आली [३१] वस्त्राची किंमत रुपये २३०, चिमाजी आप्पास दिलेल्यांची रुपये २०० व याशिवाय प्रत्येकास मोत्यांचा तुरा एक (किमत २००रु.) व निमचा आणि कटयार इतके जिनस होते. विरुबाई यांनी नानासाहेब व चिमाजी आप्पास निराळी वस्त्रे दिली. त्यांची किंमत नानास रु.११० व चिमाजी आप्पास रुपये १०० अशी होती.[३२] नानासाहेब यांना पेशवे पदाची सुत्रे देताना महाराज शाहू यांनी ३० गावाचे मोकाशे नानासाहेबास दिले. [३३] यावेळी चिमाजी आप्पांना १ मंदिल, १ जमा, १ शाल, १ पटका, १सुरवार व १ मोत्याचा तुरा देण्यात आला.[३४] नानासाहेब यांना पेशवे पदाची सुत्रे मिळाल्याची वार्ता दुसरेच दिवशी मातोश्री राधाबाईस समजली. तेव्हा पुण्यात नौबत सुरु होऊन तोफांचे आवाज झाले. हलकारा आला त्यास चांदीचे कडे व बक्षिस दिले.[३५]

### ८.४ पेशवा नानासाहेब व राजे संभाजी यांच्यातील समझोता.

नानासाहेबास पेशवाई मिळाली त्या सुमारास कोल्हापुरचे राजे संभाजी शाहु महाराजांच्या भेटीस साताऱ्यास आले होते. त्यावेळी २ जुन १७४० रोजी नानासाहेब व संभाजी यांच्यात एक गुप्त

करार झाला. सातारा व कोल्हापूर छत्रपतीच्या दुहीमुळे राज्याचे नुकसान होते हे नानासाहेब व जवळच्या विचारी माणसात कळून चुकले होते. पेशवा बाजीरावांच्या हयाती मध्ये ते शल्य काढून टाकण्यांची संधी आली नाही. मात्र चिमाजी आप्पा व नानासाहेब यांनी मनावर घेऊन पुढील योजना ठरविली.[३६] त्यानुसार शाहुच्या पश्चात संभाजीस साताराची गादी देऊन घरची मजबुती करावी अशी कल्पना निघाली. त्याप्रमाणे वाटाघाटी होऊन बाळाजी व चिमाजी आप्पानी संभाजी यांना लिहुन दिले की, "साताराचे राज्य स्वामीचे आणि एक छत्री शिक्का महाराजांचा (संभाजीचा) चालावा. शाहु महाराजाचा जीवात्मा आहे, तो बाहयत्कारी आम्ही त्यांचे सेवक परंतू अंतर्यामी स्वामीचे, शाहु महाराज यांनी कैलासवास केल्यावर दोन्ही राज्ये स्वामीची आणि आम्ही सेवक स्वामीचे. स्वामीच्या आज्ञेप्रमाणे वर्तणूक करु, अशी शपथ."[३७] अर्थात दोन्ही छत्रपतीना एकत्र आणण्यांचे प्रयत्न आप्पांनी केलेला दिसतो.

## ८.५ चिमाजीचा आप्पाचा शेवट.

बाळाजी विश्वनाथ यास दोन पुत्रे होती थोरला बाजीराव तर धाकटा चिमाजी आप्पा. बाजीराव हा धडधाकट, बलदंड असा होता तर चिमाजी आप्पा हा सदा दमेकरी असायचा त्याचे नातेवाईक चिमाजी आप्पाची नेहमी काळजी घेत असत. बाजीराव पेशवा यांच्या शरीर यष्टीच्या तुलनेत चिमाजी आप्पाची तब्येत केवळ तोळा मासा होती.[३८] चिमाजी आप्पा जरी शरिराने धडधाकट व बलदंड नव्हता तरी तो कर्तव्य दक्ष व आत्मशक्तीच्या जोरावर लढाई जिंकत असे. या वेडया कर्तबगारीमुळे आपली प्रकृती खचत चालली आहे याची चिमाजी आप्पाला अजिबात कल्पना आली नाही.[३९]

सिदी सातच्या विरुध्दची मोहीम फत्ते करुन जेव्हां चिमाजी आप्पा पुण्यास आला तेव्हांच मातोश्री राधाबाई तिर्थयात्रेहुन पुण्याल्या परत आल्या. यावेळी ब्राम्हणांना दानधर्म केला गेला. त्यानंतरच्या काळात आप्पाचा आजार वाढत गेला. तेव्हांही ब्राम्हणांना दानधर्म केला. शिवाय आप्पाची प्रकृती ठिक व्हावी यासाठी जपतप अनुष्ठाने केल्या गेलीत. चिमाजी आप्पा मुळातच अशक्त आणी नाजुक प्रकृतीचा होता त्यातच त्याला दमा व खोकल्याचा त्रास होता.[४०] इ.स. १७३९

च्या सप्टेंबर महिन्यापासुन आप्पाची प्रकृती बिघडत गेली. वसईच्या वेढयाच्या वेळी अतिश्रमामुळे त्यांना खोकल्याने बेजार केले होते. त्यानंतर चिमाजी आप्पाला सतत ताप येत होता.[४१] चिमाजी आप्पा जेव्हा वसईची मोहीम फत्ते करुन पुण्यास आला त्यानंतर आप्पा आजारी पडला. छत्रपती शाहुनी त्यास साताऱ्याला बोलाविले. परंतू चिमाजी आप्पा आजारी असल्यामुळे साताऱ्याला जाऊ शकला नाही. तेव्हा क्षमायाचना करीत करुणाजनक पत्र आप्पांनी छत्रपतीनां लिहीले, 'महाराजांचे पत्र आले ते मस्तकी वदंन सनाथ झालो. पत्रदर्शनी स्वार होऊन येणे म्हणून आज्ञा त्यास महाराजांचे आज्ञेविरहीत सेवकास अधिकोत्तर काय आहे! स्वारीतुन आल्यावर महाराजांचे पाय पहावे हाच निजध्यास आहे. तेथे महाराजांच्या आज्ञेची अथवा पत्राची वाट पहावे ऐसा अर्थ नाही. तथापी महारांजाचे पत्र शथ घालुन असतं. सेवकांनी उजुर करावा ऐसे काय होते. परंतू काय करावे, व्यथेने बहुत श्रमी केले. घरांबाहेर जाऊ द्यावयची ताकद शरीरात राहु दिली नाही. महाराजाचे पत्र म्हणजे कोहिहुकुम सेवकास आहेत. तुर्त यावयास काही आड अथवा बहाणा नाही. केवळ शरीर असक्त पडले आहे. घराबाहेर निघुन पालखीत बसायची ताकद नाही. वैध आणून उपाय चालता केला आहे. शरीर सावकांश वाटोच सेवेशी येतो. साताऱ्यास वैध प्रामाणिक कर्नाटकी आहेत, येथेही व्यथेस उपाय होईल म्हणून आज्ञा, त्यास हे शरीर महाराजांच्या अन्नाचे वाढले. महाराज मायबाप आहेत. सेवकाची चिंता महाराजा खेरीज दुसरा कोण करणार. प्रस्तुत येथे उपाय चालता केला आहे. प्रस्तुत येथे उपाय चालता केला आहे. महाराजांचे कृपेवरुनच आरोग्य होईल'[४२] अर्थात आप्पांची शाहू महाराजानां भेटण्यांची ईच्छा असूनही आप्पा भेटीला जावू शकले नाहीत.

चिमाजी आप्पाची दगदग व मोहीमा आजारी असतानांही संपत नव्हत्या. वसईहुन परत आल्यानंतर नासीरजंगाचे प्रकरण उदभवले. त्यामुळे त्यांच्या बंदोबस्तासाठी चिमाजी यांना बाजीरावाच्या आग्रहाखातर उत्तरेस जावे लागले. नासीरजंग यांची भेट होऊन आप्पा परत येत असतानाच मानाजी आंग्रे यांचे मदतीसाठीचे पत्र मिळाले. पुढे जवळपास एक महिना आप्पास सतत धावपळ करावी लागली. या शेवटच्या दिवसांत चिमाजी आप्पाचा आराम झाला तो पुण्याचा तिन दिवसाचा.[४३] तीन दिदवसाच्या पुण्यातील मुक्कामानंतर आप्पा कुलाबा मोहीमेवर गेले. तेथे मानाजी

आंग्रे यांना सहकार्य करुण संभाजी आंग्रेचा बंदोबस्त केला. दरम्यान बाजीराव पेशवा रावेरखेडी मृत्यू पावल्याची वार्ता चिमाजी आप्पास कुलाब्यास समजली.[४४]

बाजीराव यांच्या मृत्यूनंतरही चिमाजी यांना आराम मिळाला नाही. कारण छत्रपती यांच्या कडून पेशवे पदाची सुत्रे स्विकारल्यानंतर नानासाहेबाने उत्तरेस मोहीम काढण्याचे ठरविले. नादीरशहाच्या आक्रमणामुळे उत्तरेत निर्माण झालेली स्थिती पाहणे आणि दुसरे म्हणजे माळवा प्रांताची सुभेदारी मिळविणे. कारण निजामाने सुभेदारी मिळवून देण्यांचे बाजीरावास दिले होते.[४५] त्यामुळे बाळाजी बाजीराव यांनी उत्तरेस मोहीम काठण्यांचे ठरविले. याशिवाय पेशवाईची सुत्रे देताना छत्रपती शाहुने नानासाहेबांकडून काही अपेक्षा ठेवल्या होत्या.

पेशवाईची वस्त्रे देतांना शाहु महाराजा खालील प्रमाणे उदगार काढले होते. "बाजीरावाने प्रमाणिकपणे राज्याची सेवा केली. आपल्या वडिलांनी ठरवून दिलेल्या मराठयांच्या साम्राज्य विस्ताराच्या मार्गावर आपल्या पराक्रमांच्या अनेक घटना घडवून आणल्या. जेव्हा नादिरशहाने दिल्लीवर हल्ला केला तेव्हा बाजीरावास सम्राटास पुन्हा सत्ता मिळवून देण्यासाठी पाठविण्यांत आले होते. परंतू मध्येच त्यांची जीवन यात्रा संपली. आपण त्यांचे सुयोग्य वरदार आहात. त्याचे अर्धवट राहीलेले कार्य पुर्ण करावे. आपण अटकेपार झेंडा फडकावू शकता."[४६] तत्पुर्वीच आप्पांने उत्तरेकडील आपला वकील महादेव भट हिंगणे यास पत्र रवाना केले होते. अपार बंधु प्रेम व कणखर कर्तव्यनिष्ठा व्यक्त करणाऱ्या त्या पत्रातील भाग पुढीलप्रमाणे. बाजीराव्याच्या आकांक्षा पुर्ण करण्याचा चिमाजीचा केवढा निर्धार होता ते या पत्रावरुन सिध्द होते. ''रायांनी बराणपुराहुन कूच करुन नेमाड, खरगोण प्रांते आले. काकेरकर मवास मुफझद होता. त्याचे पारपात्य करुन बंदोबस्त केला. उतेत्त कूच करुन रेवा उतरुन जाताना शरीर पीडा वायोची होऊन वैशाख शुध्द त्रयोदशीस रायांनी देहवसान केले. ईश्वरे मोठी अनुचित गोश्ट केली. इष्वरी तंत्रास उपाये नाही. जे जे काली ज्या ज्या गोष्टी घडून येधार तितक्याच घडतात. मानाचे हाती, तिळमात्र नाही. परंतू विचारी दीर्घदर्शी लोक आहेत ते मनसुबियाचा पेश आदेशाचा विचार चित्तात व सवाई प्रमुख थोरथोर आहेत. त्यांचेही चित्तात येणे ते आलेच असेल. या गोष्टीचा विचार कैसा म्हणाल तर तीर्थस्रुप कैलासवासी नाना याची रयत पाळावी. अशेषजनाची दुवा घ्यावी. हेच त्याच्या चित्तात कायावाड्मनसा होते. तदनरुप

अरण्यवत् मुलुख जहाला होता त्यास कौल देवून कंटकांचा उछेद करुन रयेत नोंदविली, रयेतीचा आर्शीवाद घेतला. मन्मुळे नानांची कींती लोकोत्तर प्रकाशमा जाहाली. नांनाचा काळ जहाला. तिर्थरुप राव प्रधान पदास आठई जाहाले. राजश्री स्वामीनी कृपा करुन गौरव केले. नानांच्या पदरी रयतेची दुवा व देव ब्राम्हणांची सथापना केली, त्याचा आर्शीवाद विपुल, ते पुण्य नानांनी रायाचे पदरी बांधिले व रायांचीही बुध रयेत परिपाळणास पुर्ण, देवा ब्राम्हाणांची स्थापना करु काश्यदिक महास्थळी विश्वेश्वराचा जार्णोध्दार केला. पुढे उत्तर प्रांती कीर्तीलता प्रुफुलीत केली. विषेश्वरांची सथपना करावी हे आर्त होतीच. नानांनी कीर्ती संपादिती. त्यापेक्षा दशगुणित कीर्ती रायांची जगत्याग प्रकाशमय जाहाली. राव पुर्ण प्रतापी प्रतिष्टित कर्ते होते. सर्वा हिंद महदाश्रये रावच होते रायासारखी सामानपुर सर्व गोष्टीने संपुर्ण दक्षणेस या हिंदूस्थानात दुसरा कोणी नव्हता."[४८]

चिमाजी आप्पा व नानासाहेब डिसेंबरच्या सुरवातीला पुण्याहून सोबत निघाले. चिमाजी आप्पा व नानासाहेब उत्तरेकडील मोहीमेसाठी रवाना झाले जाताना आप्पाची तब्येत अचानक बिघडली. त्यामुळे चिमाजीस पूण्यास परत आण्याण्यात आले.[४९] यावेळीच्या अप्पाच्या आजाराविषयी राधाबाईनी स्वामी ब्रम्हेद्र यास लिहीले, "बृहस्वतिवारी सप्तमीस दहा घटका रात्रीस वेथा बहूत जाहली. उपरांत सावध जाहल्यावर प्रात:काली दोन घटका रात्रीस पालखीत घालून घरात आणिले. नालगुताची वेथा जाहली म्हणून उपाय करीत आहो व वैद्यही पांच सात आहेत. तेही उपाय करितात. स्वामीनी ईश्वरापाशी संकट घालून चिरंजीवास आरोग्य होय तो उपाय करणार स्वामी समर्थ आहे."[५०] बाजीरावास अप्पाची प्रकृती ही एक सततची काळजी होती. वसई प्रसंगी बाजीरावाने मातोश्रीस खानदेशातून पत्र लिहुन पाठविले. 'आप्पाची काळजी घ्यावी, त्यासे उन्हा-तानहात श्रमसामस करु देऊ नयेत, वाटल्यास संग्राम सरदारांकडे सोपवून अल्पकाळ त्याने विश्रांती घ्यावी."[५१]

चिमाजी आप्पाच्या अरोग्यांची सर्वाना काळजी होती. त्याचे दाखले तत्कालीन अनेक पत्रावरुन स्पष्ट होते. मानाजी आंगे यांनी चिमाजीस पत्र पाठवून "आरोग्यतेचे वर्तमान येता सर्व चिंतेचा परिहार होऊन कोटयावधीचा आनंद जाहाला.[५२] ३१ ऑक्टो रोजी आप्पाची प्रकृती एकदम अत्यवस्थ झाली. त्यानंतर दिवसेंदिवस चिमाजी आप्पाची प्रकृती खालावत गेली.[५३] १७४० च्या

अखेरीस चिमाजी आप्पाची प्रकृती अधिकच बिघडली. त्यातच १७ डिसेंबर १७४० रोजी चिमाजी आप्पाचा मृत्यू झाला.[५४] पुण्यात ओंकारेश्वराच्या मंदीराच्या आवारात चिमाजी आप्पाची समाधी आहे. चार हात उंचीच्या अष्टकोणी समाधीच्या मध्यावर चार हात उंचीचे घडीव दगडी वेलपत्तीचे काम केलेले वृंदावन आहे.[५५]

बाजीराव पेशवा यांचा मृत्यूनंतर आठ महिन्याच्या आतच चिमाजी अप्पाचा मृत्यू झाला.[५६] चिमाजी आप्पाच्या मृत्यू नंतर अन्नपुर्णबाई सती गेली. चिमाजी आप्पाची उत्तर क्रिया व अन्नपुर्णबाईचे सहगमन याचा खर्च फक्त ११७५ रुपये आला.[५७] चिमाजी आप्पची शरिरयष्टी ही साधारणच होती. चिमाजीचे शरीर आजन्म कष्ट शोषून झिजलेले होते. कदाचित चिमाजी आप्पास क्षय रोग असावा. पेशवे घराण्यात अनेक व्यक्तीचे अल्पायुष पाहता भट कुटूंबात क्षयाची व्यथा असावी.[५८] चिमाजी आप्पाच्या मृत्यूसमयी सदाशिव केवळ अकरा वर्षाचे होते.[५९] आप्पच्या मृत्यूनंतर केवळ तिन महिन्यापूर्विच आप्पास कन्यारत्न प्राप्त झाले होते. त्या कन्येचे नाव बयाबाई. आई व वडिल दोघाच्या मृत्यूनंतर तिचा सांभाळ गोपिकाबाई व काशिबाईने केला.[६] चिमाजी आप्पाच्या मृत्यू नंतर बयाबाईचे लग्न गंगाधर नाईक ओंकार यांच्याबरोबर १४ एप्रिल १७४५ रोजी झाला. त्यावेळी तिचे वय साडेचार वर्षाचे होते. ती १८ एप्रिल १७५९ रोजी मृत्यू पावली.[६१]

पेशवा बाजीराव यांच्या मृत्यनंतर अल्पवधीत चिमाजी आप्पा मृत्यू पावला. त्यामुळे पेशवे कुटूंबावर केवढे मोठे दु:ख कोसळले होते याची कल्पना नानासाहेबांनी ब्रम्हेद्रस्वामीस लिहलेल्या एका पत्रावरुन येथे. 'तिर्थरुप राऊ यांणी कैलासवास केल्यास आठ महिने न जहाले तो श्री ने हा प्रंसग घडविला. एकाएकीच श्रीने दु:खार्ण पडिले.'[६२] चिमाजी आप्पाच्या मृत्यूने पेशवे परिवारावर दु:खाचे डोंगरच कोसळले होते. थोडक्यात पेशवे घरांत एवघा सात आठ महिन्यांत महत्वाच्या दोन महायोध्द्यावर मृत्यू आला होता. अर्थातच त्यामुळे पेशवे परिवारावर दु:खाचे डोंगर कोसळले. तेव्हा नानासाहेबाचे सात्वन करणारे पत्र आले.

'श्रीमंत राजश्री पतप्धान स्वामीचे सेवेशी राजश्री चिमाजी आप्पा यांशी देवज्ञा जाली म्हणून वर्तमान यैकिले त्यावरुन चितास परमखेद जाला तो लिहिता पुरवत नाही. फार वाईट जाले. स्वामीस तो अतिशयेसी दु:खाच्या रासी जाल्या, परंतू हे गोष्टीस उपाय नाही. ईश्वरी सत्ता प्रमाण. स्वामी सुज्ञ

*आहेत. खेद न करावा. विवेक करुन खेद खेद परिमार्जन केला पाहीजे.*"[६३] *चिमाजी आप्पांच्या मृत्यू झाल्यमूळे मराठा सत्तेची मोठी हानी झाली. सरदेसाई त्यावर भाष्य करताना सरदेसाई म्हणतात, "चिमाजी आप्पाचा मृत्यू ही राष्ट्रीय हानी होती. कारण बाजीरवाने जे काही महत्वाचे विजय मिळविले त्यात चिमाजी आप्पाचे सहकार्य तसेच त्यांच्या निस्वार्थ प्रयत्नानी मिळाले. त्यांची तब्बेत चांगली नव्हती परंतू तरीही त्याने आपले जीवन देशाला अर्पण केले."*[६४]

### संदर्भ :


०१. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ.१४१

०२. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.८९

०३. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ.१४३

०४. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.८९

०५. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ.२०४

०६. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.८९

०७. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.८९

०८. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ.१४२

०९. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ.१४३

१०. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.८९

११. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.८८

१२. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पुर्वोक्त, पृ.८९

१३. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.१४७

१४. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पूर्वोक्त, पृ.८८

१५. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.१४८

१६. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ.१४३

१७. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पुर्वोक्त, पृ.४३३

१८. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पुर्वोक्त, पृ.४३४

१९. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पुर्वोक्त, पृ.४७

२०. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पूर्वोक्त, पृ.९०

२१. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ.१४४

२२. सरदेसाई गो. स., मराठों का नविन इतिहास, खंड २, पूर्वोक्त, पृ. १८६

२३. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ.१४४

२४. केळकर य. न. (संपा.), ऐतिहासिक पोवाडे, पूर्वोक्त, पृ.२१९ पूर्वोक्त, पृ.१११

२५. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पूर्वोक्त, पृ.२१९

२६. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.१४७

२७. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ४, पुर्वोक्त, पृ.१५

२८. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ४, पुर्वोक्त, पृ.१५

२९. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.१४८

२९अ. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पूर्वोक्त, पृ.२१९

३०. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ४, पुर्वोक्त, पृ.१५

३१. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पूर्वोक्त, पृ.२१९

३२. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ४, पुर्वोक्त, पृ.२२

३३. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ.१४८

३४. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ.१४८

३५. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ४, पुर्वोक्त, पृ.१५

३६. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ४, पुर्वोक्त, पृ.१७

३७. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ४, पुर्वोक्त, पृ.१८

३८. प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पुर्वोक्त, पृ.४३

३९. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.१५०

४०. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पूर्वोक्त, पृ.६७

४१. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ.१४७

४२. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड १७, ले.९८

४३. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, [उत्तरार्ध], पुर्वोक्त, पृ.४३१

४४. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.१४७

४५. सरदेसाई गो. स., मराठों का नविन इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ.१९५-१९६

४६. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पुर्वोक्त, पृ.२११

४७. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.१४८

४८. प्रा. पुराणिक श.श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ.४६३-४६४

४९. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ.१४८

५०. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पूर्वोक्त, पृ.९३

५१. दीक्षित म.श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.१७३

५२. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड ३३, ले.३०१ पृ. २६३

५३. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ४, पुर्वोक्त, पृ.३२

५४. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पुर्वोक्त, पृ.१८४

५५. सप्रे विद्या, मस्तानी कंचनी नव्हे! कुलकामिनी !, पुर्वोक्त, पृ.१४२

५६. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड २३, ले.४० पृ. २५

५७. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५८७

५८. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५८६

५९. पूरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्लाळ उर्फ चिमाजी अप्पा, पूर्वोक्त, पृ.८९

६०. कस्तुरे कौस्तुभ, पेशवाई, पुर्वोक्त, पृ.१४९

६१. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५८५

६२. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.१५०

६३. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड२५ , ले.४० पृ.२०

६४. सरदेसाई गो. स., मराठों का नविन इतिहास, खंड २, पुर्वोक्त, पृ. १९६

# संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती

संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती   सामाजिक शास्त्रे विद्याशाखेतील इतिहास विषयात 'आचार्य' (पीएच.डी.) पदवीसाठी सादर केलेला

शोध-प्रबंध

-: संशोधन विषय :-



## 'चिमाजी आप्पा : व्यक्ती आणि कार्य'

(इ.स.१७०३ ते इ.स. १७४०)




-: संशोधक :-

प्रा. साहेबराव सुकाराम पवार

इतिहास विभाग प्रमुख,
यशवंतराव चव्हाण कला व विज्ञान महाविद्यालय,
मंगरुळपीर जि.वाशिम

-: मार्गदर्शक :-

प्रा.डॉ. विपिन एम. राठोड

इतिहास विभाग प्रमुख
आर. ए. आर्ट्स, श्री. एम.के. कॉमर्स,
आणि श्री. एस. आर. राठी विज्ञान महाविद्यालय, वाशिम

ऑक्टोबर २०१६

## प्रकरण : ९ चिमाजी आप्पांच्या कार्याचे मुल्यमापन.(उपसंहार)

*शाहु महाराजांनी मराठा सत्तेची सुत्रे १७०८ मध्ये आपल्या हाती घेतली. तेव्हापासून मराठा राज्याचा छत्रपती हे नामधारी सत्ताधिश बनण्यांच्या प्रक्रियेला सुरुवात झाली. त्यानंतरच्या काळात मराठाशाहीत पेशवाई सूरु झाली. त्यामुळे हळूहळू राज्याची सर्व राजकीय सूत्रे पेशव्याच्या हाती केन्द्रीत झाली. या पेशवाईच्या कालखंडात अनेक नामवंत सरदारांनी महत्वाची कामगीरी पार पाडली. खंडेराव दाभाडे, मल्हारराव होळकर, उदाजी पवार, राणोजी शिंदे, भोसले, व पटवर्धन इत्यादी व्यक्तीने मराठा सत्तेची एक निष्ठेने सेवा करून मराठयांच्या इतिहासात आपले नांव 'सूवर्ण' अक्षरात लिहुन घेतले. याविषयी गो. स. सरदेसाई म्हणतात, "इ.स. १७०७ ते १७४० हा काळ मराठा सत्तेचा दैदिप्यमान युग मानला जातो. ज्यात मराठा राज्याचा विस्तारात राजकीय नेत्याने आपली सर्वश्रेष्ठ योग्यता सिध्द केली."[०१] अशा राजकीय नेत्यांपैकी एक यौध्दा म्हणजे 'चिमाजी आप्पा' होय.*

### ९.१ चिमाजी आप्पांचे व्यक्तीमत्व :

*चिमाजी आप्पाचा जन्म कधी व कोठे झाला ते स्पष्ट नाही. आप्पाचा जन्म इ. स. १७०३ झाला असावा. चिमाजी आप्पास लहानपणी अंताजी, अनंत, चिमण म्हणत असत. पुढे मात्र ते 'चिमाजी आप्पा' म्हणून प्रसिध्द झाले. आप्पाला गृहस्थी जीवन फार कमी लाभले. चिमाजी आप्पाचा पहीला विवाह इ. स. १७१६ मध्ये त्रिंबकराव पेठे यांची बहीण रूख्माबाईशी झाला. या रूख्माबाईला एक पुत्र झाला. त्यांचे नाव सदाशिवराव. पुत्राच्या जन्मानंतर थोडयाच दिवसात रूख्माबाईचा मृत्यू झाला. त्यानंतर आप्पाचा दूसरा विवाह इ. स. १७३१ मध्ये नारो भिकाजी थत्ते यांची कन्या अन्नपूर्णाबाईशी झाला. चिमाजी आप्पांच्या मृत्यूनंतर अन्नपूर्णाबाई सती गेली. पेशवे परीवारात सती जाण्याचा पहीला मान अन्नपूर्णाबाईला जातो. अन्नपूर्णाबाईला एक कन्या झाली तिचे नाव बयाबाई.*

*चिमाजी आप्पा यांचे व्यक्तीमत्व हे अतिशय प्रामाणिक होते. उंच, सडपातळ व सदासर्वकाळ दम्याचा रोगी असा आप्पा होता. चिमाजी आप्पाला बाजीरावा इतका आपल्या वडीलाचा सहवास*

मिळाला नाही. या संदर्भात बेहरे ना. के. म्हणतात, "वास्तविक पाहता चिमाजी आप्पा हा बाजीरावापेक्षा सात-आठ वर्षानी लहान होता. बाजीरावाला पित्याच्या शिक्षणाचा, सहवासाचा व उदाहरणाचा जेवढा फायदा मिळाला तितका चिमाजीस मिळाला नाही. कारण बाजीरावास जेव्हा पेशवाई मिळाली तेव्हा चिमाजी आप्पा सातार्‍यासच घरी राहुन शाहु महाराजांकडे पडेल ती सेवा बजावीत असे. मात्र पुरंदरे, चिटणीस व भानू या त्रिकुटाच्या शिकवणुकीने चिमाजी लवकरच राजकारणात वाकबदार झाला."[८२] त्याचा फायदा पुढे मराठा सत्तेच्या प्रसारासाठी झाला.

चिमाजी आप्पा हा धार्मीक वृत्ती बाळगणारा व नैतीक आचरण करणारा होता. त्यामुळे आप्पाचे परीवरात नैतिक वजन होते. विशेष: बाजीराव पेशवा यांच्यावरही आप्पांचे नैतिक वजन होते. पेशवा बाजीराव यांच्यापेक्षा मातोश्री राधाबाई चिमाजी आप्पांसोबत घरातील समस्या सोडविण्याविषयी सल्लामसलत करीत असे. तर चिमाजी आप्पा आपल्या मातोश्रीचा मानसन्मान करीत असे. एवढेच नव्हे तर मातोश्रीच्या आदेशाचे पालन करीत असे. प्रा. बिरादार यासंदर्भात म्हणतात, 'चिमाजी आप्पावर राधाबाईचा विश्वास होता आणि चिमाजी आप्पाने आपल्या कामगीरीने ते सार्थक ठरविला.'[८३]

चिमाजी आप्पाच्या जीवनावर प्रकाश टाकताना एक गोष्ट प्रकर्षाने जाणवते ती म्हणजे बाजीराव-मस्तानी प्रकरणात चिमाजी आप्पा आपल्या मातोश्रीच्या निर्णयाची अंमलबजावनी करीत असे. वास्तविक चिमाजी आप्पाने बाजीरावाची नासिरजंग मोहीमे दरम्यान भेट घेतली असता मस्तानीला बाजीरावाकडे पाठविण्यांचे वचन दिले होते. शिवाय बाजीरावाची मनस्थिती पाहुन मस्तानीला बाजीरावाकडे पाठविण्याची मानसिकता बनविली होती. परंतू पुण्यास आल्यानंतर आप्पानी मातोश्री समोर आपले विचार व्यक्त केले. परंतू मातोश्रीने नकार देताच मातृभक्त आप्पाने राधाबाईचा निर्णय मान्य केला.

चिमाजी आप्पा आईचा किती आदर करावयाचा याचा दाखला म्हणजे आप्पांची मातोश्री तिर्थयात्रेला जाताना आप्पांनी मातोश्रीला पाठविलेले पत्र होय. राधाबाईनी यात्रेस निघताना सदाशिव भाऊस सोबत नेण्याची इच्छा व्यक्त केली तेव्हा चिमाजी आप्पाने आपल्या मातोश्रीला जे पत्र लिहीले ते मातृभक्तीने ओथंबलेले आप्पाचे पत्र होते. ते आपल्या मातोश्रीला लिहीतात, "तुमच्या

आसीर्वादेवरुन सुखरप असो विशेष. चिरंजीव सदाशिवास पाठवावयाचा विचार आपल्याशी बोलुन आलो होतो. त्यास विचार पाहता. चिरंजीवास सवाई जयसींगाच्या घरी बहुमान होईल हा येक अर्थ., वरकड चिरंजीवाचे यात्रेचे दिवस हे आहेत यैसे नाही. बहुमानाची गोष्ट म्हणावी तर तुमच्या अर्सीवादे आम्हांस काय न्युन केले आहे? दोन पर्याय तर या प्रकारचे आहेत. परंतू तिसरा पर्याय तुमची आज्ञा क्षेपनिक्षेप पाठवावे येसीच असली तर लक्षप्रकारे पाठवून देऊ. तुमच्या समाधनापेक्षा आम्हास दैवत दुरे नाही. तुम्ही यात्रा करावयास जाता. देवधर्म करावयास चिरंजीवाचा पायागोवार (अडचन)होईल यैसे आहे. तुमचा निरोप घेताला ते समयी पायउतारा होऊन तुमचे पालखी समागमे घटकाभर येऊन आले नाही. त्यामुळे चित्तात अलीकडे आलियावर हळहळ वाटली. आपले समाधान पुर्वक असीर्वाद पत्र आले म्हणजे चित्तातील हळहळ दूर होईल हे विनंती."[०४]

चिमाजी आप्पा व बाजीराव दोघेही बंधू अलौकिक मातृभक्त होते. मातोश्री राधाबाई घरातील सुख दूखाच्या गोष्टी प्रारंभी आप्पानां कळवित असे. काशिबाईला पुत्र झाला असताना पत्र पाठवून राधाबाईनी आप्पाला कळविल होते. याशिवाय कुटूंबातील व बाहेरच्या मंडळीचे बरे वाईट व्यवहार चिमाजी आप्पाच उलगडीत असत. जरुरी तेव्हाच पेशवा बाजीरावाचा सल्ला घेत. परीवारातील लग्नकार्य, वादविवाद, नातेवाईकांशी विचार विनिमय, ब्राम्हणांचा आदर सत्कार, दानधर्म इत्यादी गृहकार्याचे प्रकार चिमाजी आप्पा पार पाडीत असत.

परीवारातील लहान मुलांची देखरेख आप्पांच करीत. बाजीराव पेशव्याची मुले तरी बहूधा चिमाजी आप्पांजवळच राहत असे. नानासाहेब हा तर चिमाजी आप्पासोबत राहत असे. त्यांच्या शिक्षणाकडे चिमाजी आप्पाने विशेष लक्ष दिले. तसेच चिमाजी आप्पा कधीकधी नानासाहेबांना स्वारांवर सोबत नेत असत. त्यामुळे चिमाजी आप्पांचा विचासरणीचा नानासाहेबावर प्रभाव पडला होता. नानासाहेबात पुढे दिसुन आलेले राज्यकारभाराचे धडे त्याने चिमाजी कडून घेतले.[०५] नानासाहेब याला संस्कारीत करण्यांचे कार्य आप्पानीच केले. बाजीरावाच्या मृत्यूनंतरही आप्पाने नानासाहेब यांचे मार्गदर्शक म्हणून काम केले. प्रतापी बाजीराव या ग्रंथाचा लेखक म. श्री. दिक्षित म्हणतात, "बाजीराव पेशवाच्या हयातीत आणि त्यांच्या माघारी चिमाजी आप्पाने नानासाहेबाची जी सेवा केली ती विसरता येत नाही.'[०६]

### ९.२ चिमाजी आप्पा : एकनिष्ठ सेवक

चिमाजी आप्पाचा जन्म पेशवे कुटूंबातील भट घराण्यांतला. मात्र संस्कार पेशवे परिवारासोबत साताऱ्यांच्या छत्रपतीचेही झाले होते. चिमाजी आप्पा लहान पणापासुनच साताऱ्यास छत्रपती जवळ राहत असे. त्यामुळे शाहु महाराज व चिमाजी आप्पाचा सहवास अनेक वर्षाचा. त्यातही चिमाजी आप्पा पेशव्याचा भाऊ असल्यामुळे शाहु महाराजांची विशेष मर्जी चिमाजी आप्पावर होती. म्हणून शाहु महाराजांनी बाजीरावाला पेशवा पदाची सुत्रे दिली त्याचवेळी चिमाजी आप्पा यास मुतालीक नेमले. तेव्हांपासून चिमाजी आप्पा आपल्या स्वामीची सेवा इमानदारीने करित होते.

चिमाजी आप्पा शाहू महाराजांचे सेवक असले तरी शाहू महाराज आप्पाचा मान ठेवित असे. या संदर्भात गो. स. सरदेसाई म्हणतात, "शाहू महाराजांचे मन चिमाजी आप्पाने आपल्या अंकित केले होते. रघुनाथरावाचे मुंज व सदाशिव भाऊचे लग्न यासाठी छ. शाहू पुण्यास चिमाजी आप्पाच्या आग्रहास्तव आला होता."[८७] चिमाजी आप्पा महान सेनापती होते. त्यांनी अनेक विजय मिळविले. मात्र त्याचा त्यांना अहंकार आहेला दिसत नाही. चिमाजी आप्पास जेव्हा यूध्द मोहीमेत विजय मिळत असे तेव्हा चिमाजी आप्पा छत्रपती शाहु महाराजानां पत्र पाठवित. त्या पत्रांमध्ये चिमाजी आप्पा आर्वजून उल्लेख करित असे की, 'केवळ स्वामीच्या कृपेने व आर्शिवादाने यश संपादिले आहे.' म्हणजेच ईश्वराच्या खालोखाल आप्पाची स्वामीवर दृढ श्रध्दा होती.

चिमाजी आप्पा वसई मोहीमे फत्ते करुन पुण्यांस परत आले तेव्हा छत्रपती शाहुनी चिमाजी आप्पांकडूनच वसई विजयाचे वर्णन ऐकावेत म्हणून आप्पास सातारा बोलाविले. परंतू चिमाजी आजारी असल्यामुळे सातारा जाऊ शकले नाही. क्षमा याचना करीत चिमाजी आप्पांने करुणाजनक पत्र शाहु महाराजास पाठविले. या पत्रामधिल वर्णना वरून आप्पाची स्वामीनिष्ठा स्पष्ट होते. आप्पा लिहीतात, " महाराजाचे पत्र आले ते मस्तकी वंदून सनाथ झालो. पत्रदर्शन स्वर होऊन येणे म्हणून आज्ञा, त्यास महारांचे आज्ञेविरहीत सेवकास अधिकोत्तर काय आहे! स्वारीतून आल्यवर महाराजांचे पाय पहावे हाच निजध्यास आहे. तेही महारांजाच्या आज्ञेची अथवा पत्राची वाट पहावे ऐसा अर्थ नाही. तथापि महारांचे पत्र शपथ घालुन असतां सेवकांनी उजूर करावा ऐसे काय होते. परंतू काय करावे, व्य्थेने बहुत श्रमी केले. घरांबाहेर जाऊ द्यावयाची ताकत शरीरांत राहु दिली नाही. महाराजांचे

पत्र म्हणजे कोटी हुकुम सेवकास आहेत. तुर्त यावयास काही आउ अथवा बहाणा नाही. केवळ शरीर सावकास वाटताच सेवेशी येतो. सातार्‍यास वैद्य प्रामाणिक कर्नाटकी आहेत. येथेही व्यथेस उपाय होईल म्हणून आजा त्यास हे शरीर महाराजांच्या अननाने वाढले महाराज मायबाप आहेत. सेवकांची चिंता महाराजांखेरीज दुसरा कोण करणार. प्रस्तुत उपाय येथे चालता केला आहे. महाराजांचे कृपेवरुनच आरोग्य होईल."[०८]

अशा आप्पाच्या स्वामिनिष्ठे विषयी भाष्य करताना डॉ. राजा दीक्षीत लिहीतात, "चिमाजी आप्पा हा छत्रपतीचा निष्ठावान संपर्क होता तसेच आज्ञाधारक ही होता."[०८अ]

## ९.३ चिमाजी आप्पा : एक उत्तम यौध्दा व सेनापती

बाळाजी विश्वनाथ पेशवा यांचा मृत्यूनंतर चिमाजी आप्पा यांचा थोरला बंधू बाजीराव पहिला पेशवा बनला. त्यावेळी बाजीरावाचे वय अवघे २० वर्षे होते. तरुण वयात पेशवा बनलेल्या बाजीराव पहिल्याने आक्रमक धोरणाचा अवलंब केला. त्यावेळी चिमाजी १३, १४ वर्षाचे होते. मात्र पेशवा बाजीराव पहिला यांच्या कारकिर्दीत चिमाजी आप्पा मराठा राज्याचा आधार स्तंभ होता. वास्तविक आप्पा व पेशवा बाजीराव यांच्या प्रकतीत खुप अंतर होता. बाजीराव तंदृस्त होते तर आप्पा दम्याचा रोगी होता. मात्र त्यांच्या आजाराचा त्यांच्या कामगीरीवर परीणाम झालेला दिसत नाही. उलट आजारी असुनही आप्पानी बाजीरावाच्या बरोबरीत पराक्रम केल्याचे दिसून येते.

मराठा काळात उदयास आलेल्या पेशवाईत अनेक महान व्यक्तीने मराठा सामाज्य वाविण्यासाठी अथक प्रयत्न केले. मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, उदाजी पवार, खंडेराव दाभाडे, पिलाजी गायकवाड, इत्यादी. अशा पराक्रमी रत्नात चिमाजी आप्पाचा सामावेश होता. चिमाजी आप्पा हे फक्त पराक्रम यौध्दा होते असे नव्हे तर उच्च दर्जाचे, अप्रतिम सेनापती होते. सरदार, सैनीक व सेनापती म्हणून चिमाजी आप्पाने जे कार्य केले ते बहूमूल्य होते. बाजीरावाला सुध्दा चिमाजी आप्पाचा हेवा वाटावा असे कार्य आप्पानी केले. माळवा असो अथवा गुजरात, सिद्दी असो अथवा पोर्तुगीज अशा सर्व मोहीमांमध्ये चिमाजी आप्पाने केलेले कार्य पाहता तो बाजीरावापेक्षा सरस होता अथवा नाही हे ठरविणे अवघड असले तरी त्यांच्या तोडीचा मात्र नक्कीच होता. डॉ. राजा

दिक्षीत म्हणतात, "बाळाजी विश्वनाथ यांनी घातलेल्या पायावरुन कर्तुत्वाचे भले मोठे उड्डाण बाजीरावाने घेतले आणि या उड्डाणत त्याच्यासह झेपावलेला उपग्रह म्हणजे चिमाजी आप्पा !"[०९]

आप्पाचे कार्य हे चार भागात विभागले जाते. प्रारंभी शाहू महाराज यांच्या दरबारी राहून इ.स. १७२० ते १७२७ या काळात मूलकी कार्य केले. त्यानंतर पेशवा बाजीराव व निजाम- उल-मूल्क यांच्यात झालेल्या पालखेडच्या यूध्दात आप्पानी महत्वाची भूमिका बजाविली. तर इ.स. १७२८ ते १७३२ या कालखंडात माळवा-गुजरात प्रांतात स्वनेतृत्वात मोहीमा काढून त्या यशस्वी पारही पाडल्यात. तिस-या टप्प्यात आप्पाने सिद्दी विरुध्द स्वारी करुन रेवासच्या युध्दात सिदीसातचा वध केला. चिमाजी आप्पाचा जीवनातील सर्वात यशस्वी व गौरवशाली मोहीम म्हणजे वसई मोहीम होय. ही मोहीम आप्पाच्या पराक्रमाचा कळस मानल्या जातो.

चिमाजी आप्पाने महान पराक्रमी योध्दा प्रति नेपोलीयन ज्याला म्हटला जाते त्या बाजीराव पेशवाच्या कारकीर्दीत मराठा साम्राज्य वाढविण्यात मदत केली. आप्पाचे दुर्देव हे की तो धाकटा असल्यामूळे आपल्या मनाने मोहीमा काढता येत नसे. मराठा सत्तेचा छत्रपति शाहू किंवा वडील बंधू बाजीराव यांच्या आदेशाचे पालन करण्यासाठी मोहीमेवर जावे लागे. त्यामुळे चिमाजी आप्पाने अफाट मेहनत करुन मिळविलेल्या विजयाचे श्रेयही थोरला बंधू बाजीरावाला दिला जात असे.

चिमाजी आप्पाच्या पराक्रमाचा प्रारंभ माळवा मोहीमेत झाला. माळवा प्रांताचा मोगल सुभेदार, गिरीधर बहादूर जो पराक्रमी होता, मात्तबर व नामवंत होता. अशा बलदंड गिरीधर बहादूरचा चिमाजी आप्पाने अमझेरा संघर्षात बिमोड केला. यावेळी चिमाजीच्या अंगी असलेले युध्दकौशल्या बरोबर गनीमी पध्दतीच्या योग्य वापर करणारा सेनानी दिसला. अतिशय जलद गतीने सैन्याची हालचाल करणे हे या तंत्राचे वैशिष्टे होते. लढाईच्या वेळी वेगवान हालचाली करुन शत्रुंना कोंडीत पकडण्याचे धोरण चिमाजी आप्पाने अमझेरा संघर्षावेळी अवलंबिले होते. याविषयी प्रा. टी. के. बिरादार म्हणतात, "बाजीराव प्रत्येक मोहीमेच्या यशासाठी घोडदळाचा अत्यंत परीणामकारक पध्दतीचे वापर करुन शत्रुंचे युध्द अगोदरच मनोधैर्य खच्ची करण्याचे तंत्र अंमलात आणलेले दिसुन येते. याच तंत्राचा उपयोग करुन त्याचा भाऊ चिमाजी आप्पा यांनी आमझेऱ्याच्या लढाईत ( २९ नोव्हेंबर १७२८) मोगल सैन्याविरुध्द मिळविलेला विजय हा गनिमी युध्द पध्दतीचे एक अप्रतिमच

उदाहारण होते."[४०] थोडक्यात माळवा प्रदेशात मराठयांचे प्रभुत्व प्रस्थापित करण्याचे कार्य चिमाजी आप्पाने केले. आमझेरा संघर्षात आप्पाच्या अंगी असलेले अनेक गुण दिसून आले. उत्कृष्ट संघटक तसेच यशस्वी सैन्य नेतृत्व करणारा सेनापती (आप्पा) दिसला.

बाजीराव पेशवा यांनी आप्पाला गुजरात मध्ये स्वारीस पाठविले होते. त्यावेळी आप्पांनी पेटलाद पर्यत मोहीम काडुन सरबुलंदखान यांच्याशी तह करुन चौथाई कायम करुन घेतले. मात्र त्यानंतरच्या काळात आप्पांच्या मोकाशा वरुन बाजीराव व दाभाडे यांच्यात मतभेद निर्माण होवून दाभाडे यांनी पेशवा व बाजीराव यांच्याविरुध्द कारस्थान केले. त्यामधून डभईचा संघर्ष झाला. त्या माहीमेला जातना आप्पा व बाजीराव सोबत होते. परंतू डभई युध्दात आप्पाचा सहभागाविषयी व रणांगणातील उपस्थिती माहीती स्पष्ट होत नाही. मात्र त्या संघर्षात आप्पाचा सहभाग होता. आप्पा या मोमहीमेत निजामावर लक्ष देवून होता. तसेच अभयसिंग यांच्यांशी आप्पांनी भेट घेवून काही रुपये मिळविले. तेंव्हा पासून बाजीराव व चिमाजी आप्पा सोबतच होते. बुंदेलखडाच्या प्रकरणात आप्पांनी युध्द केले असे नाही. परंतू बाजीराव पेशवा यांना जी राजा छत्रसालापासून जी जहागिरी मिळाली होती. त्यावर यशस्वी तोडगा काढण्यांचा प्रयत्न आप्पांनी केलेला दिसतो.

बाजीराव पेशवा यांनी आपल्या जीवनात उत्तरेत यशस्वी मोहीमा केल्या. मात्र दक्षिणेकडील मोहीमेचा यशस्वी सेनानी चिमाजी आप्पाच होता. दक्षिणेतील परकिय सत्ता सिद्दी व पोर्तुगीज या सारखा अद्यावत शस्त्रांनी सज्ज असलेल्या सत्ताना छत्रपती संभाजी, स्वत: पेशवा बाजीराव आवरु शकले नाही. मात्र त्यांना लगाम घालण्याचा पराक्रम चिमाजी आप्पानी केला. मराठयांचा हाडवैरी परकीय सत्ताधिश म्हणजे सिदी होय. पेशवा बाजीरावाने सिद्दी विरुध्दची मोहीम पुर्ण केली नाही. त्यानंतरच्या काळात सिदीसाताचे अत्याचार वाढतच गेले. त्यातच सावनूरच्या नबाबाच्या हत्ती प्रकरातून सिदीसात यांनी स्वामीचे परशूराम मंदीराचा विध्वंस केला. तेव्हा स्वामीने शाहू महाराज व पेशवा यांच्याकडे सिदीसातचा बंदोबस्त करण्यांचा आग्रह धरिला. तेव्हा सिदिसाताच्या बंदोबस्तासाठी बाजीराव व छ. शाहुने चिमाजी आप्पाची नेमणूक केली. चिमाजी आप्पाने रेवासच्या

लढाईत सिदिसाताला ठार करुन सिद्दी विरुध्दची मोहीम यशस्वी पार पाडली. हा विजय अतिशय महत्वाचा मानल्या जातो.

प्रा. बिरादार यांनी चिमाजी आप्पाच्या रेवास विजयाबद्दल खालील मत व्यक्त केले आहे. 'रेवासच्या विजयामुळे एक कुशल व पराक्रमी सेनापती म्हणून ओळखला गेला. हिंदूधर्म स्थळांचा विध्वंश करणारा व हिंदू प्रजेचा धार्मीक छळ करण्याऱ्या सिदिसात यांचा नि:पात केल्यामुळे संपुर्ण महाराष्ट्रातील जनतेला अतिशय आनंद झाल्यामुळे चिमाजी आप्पाबद्दल आदर निर्माण झाला. राजकीय क्षेत्रात त्यांची प्रतिष्ठा वाढली."[१२] ब्रंहमेद्रस्वामीला ही वार्ता समजताच त्यांनी आनंद साजरा केला. त्यांच्या परमप्रिय चिपळूणच्या भगवान परशुरामांच मंदीर विटाळून, उध्वस्त करणाऱ्या अत्याचारी सीद्दीसातलाला आज बाजीरावांच्या 'लक्ष्मणांने' आप्पानी मारले होते. चिमाजी आप्पाच्या सिदीसातवरील विजयामुळे सर्वत्र आनंद झाला. यासंदर्भात सदाशिव दिक्षीत पटवर्धन चिमाजी आप्पास लिहतो. "भारती युध्दासमान युध्द होऊन महान शत्रु मारिला असे. पुर्वी जाले नसेल अशी युक्ती ईस्वरे तुम्हास अनुकूल केली. याउपरी उत्तरोत्तर आपले कल्याण आहे. आपल्या युध्याचे वर्तमान सर्वानी आईकल्या उपरी जो आनंद उत्साह जाला आहे, तो दिवसेदिवस अधिकोत्तर होतो."[१३]

चिमाजी आप्पाच्या जीवनातील सर्वात यशस्वी मोहीम म्हणजे वसई मोहीम. या माहीमेत चिमाजी आप्पाच्या अंगी असलेले यूध्द कौशल्य, चिकाटी, सैन्य नेतृत्व, इत्यादी गुण दिसून आले. वसई प्रांतावर पोर्तूगिजांची सत्ता होती. ते हिंदू जनतेवर अन्याय-अत्याचार करीत असत. अश्या अत्याचारी परकीयांवर आप्पाने स्वारी करुन वसई हस्तगत केली. ही मोहीम आप्पाच्या नेतत्वात पार पडली. विशेष या माहीमेची सर्व सुत्रे आप्पांकडेच होती. म्हणजेच वसईचा इत्थभूत कारभार आप्पांकडेच होता. या विजयात आप्पाचे सैन्य नेतृत्व, चिकाटी, शैर्य, आणी वेळप्रसंगी सैन्याला चेतविन्याची कला इत्यादी गुण दिसून आले. चिमाजी आप्पा व त्यांच्या नेतृत्वाखाली वसई जिंकण्यासाठी मराठयांनी जो पराक्रम केला, त्या संदर्भात ना. के. बेहरे लिहीतात, "या लढाईत चिमाजीच्या आधिपत्याखाली मराठयांनी दाखविलेली चिकाटी प्रशंसनीय आहे. समोरासमोर उभे ठाकून, शत्रुच्या तोफांच्या अचूक चालणाऱ्या गोलंदाजीची व तेणेकरुन येणाऱ्या मृत्यूची पर्वा न

करता निधडया छातीने खंदक ओलांडून कोटावर चढणे सामान्य धैर्याचें काम नव्हते. शत्रु न दिसतां व शत्रुवर उलटवार करण्यांची एकदा देखील संधी न सापडतां, मार खात खात व माणसांचे बळी देत देत देत नेटानें पुढें सरकणें, ही लश्करी शिस्त या प्रसंगी मराठ्यांनी उत्तम प्रकारे दाखविली. विजय प्राप्त झाल्यावर, तोपर्यंत खालेल्या माराचें उट्टें सहज शत्रुवर काढता येतें. पण त्यापुर्वी शांतपणे घाव छातीवर घऊन पुढें सरकण्यांत बहादुरी लागते."[१३अ] या मोहीमेत आप्पांच्या अंगी असलेला एक विशेष गुण दिसून आला आणि तो म्हणजे परस्त्रिचा सन्मान. वसई विजयानंतर आप्पांच्या सैन्यानी अतिशय सुंदर पोतुगिज किल्लेदाराच्या पत्नीस पकडून आणिले असता त्यास साडी चोळी नेसवून सन्मानानी परत पाठविले. यावरुन आप्पां हे परस्त्रिांचे सन्मान कर्ते होते हे स्पष्ट होते. त्यांच्या त्या वर्तनाची भारतीय प्रमाणेच परकीयांनी ही स्तूती केलेली आहे.

चिमाजी आप्पांच्या वसई मोहीमेच्या विजयात अनेक सरदारांनी महत्वाची भूमिका बजाविली. त्यात गणेश नाईक अणजूरकर, शंकराजी केशव, चिमणाजी भीमराव, कृष्णदेव महादेव इत्यादी. आप्पानी पोर्तृगिज यांना पराभूत करुन त्यांच्या वर्चस्वाखालील १२५ की.मी. लांबीचा प्रदेश मिळविला. सोबतच ३४० गांव, आठ नगरे, दोन तटबंदीची डोंगरे, यावेळी मराठयांच्या ताब्यात आली. याशिवाय लहाण-मोठया ५९३ तोफा, २५ लाखंचा दारुगोळाव काही जहाजे हस्तगत झाली. अशाप्रकारे अनेक वर्ष अस्तित्वात असलेली पोर्तृगिजांची सत्ता आप्पानी जवळ-जवळ नष्ट केली. त्यामुळे आप्पा लोकमानसात प्रसिध्द झाले. डॉ. राजा दिक्षित म्हणतात, "वसईच्या लढाईत विजय प्राप्त करुन २३ मे १७३९ पोर्तुगिजांचे त्या परिसरातील वर्चस्व नष्ट करावयाच्या महा पराक्रमामुळेच चिमाजीचे नांव लोकमानसात रुजले आहे."[१४]

चिमाजी आप्पा हे कर्तृत्ववान, मुत्सद्दी, महान पराक्रमी यौध्दा, आदर्श सेवक होते. बाजीराव पेशवा यांच्याप्रमाणे उत्कृष्ट सेनापती होते. मराठा राज्यविस्तारात त्यांचा वाटा मोलाचा होता. असे असले तरी चिमाजी आप्पाच्या कडून काही चूकाही झाल्यात. आप्पांनी वसईची लढाई जिंकली मात्र पोर्तूगिंजांचा कायमचा बंदोबस्त आप्पा विजयी होवूनही करु शकले नाही. वसई विजयानंतर पोर्तूगिजांशी वाटाघाटीत आप्पांनी हिंदूच्या धर्मस्वातंत्र्याचा समावेश करावयास हवा होता मात्र पोर्तुगिजांनी त्याचा तहात अंतर्भाव करु नका अशी भुमिका घेतली आणी चिमाजी आप्पाने

पोर्तूगिजाचा तो हट्ट पुर्ण केला. त्यावरुन आप्पा हे शत्रूंशी सुध्दा उदार धोरण अंगिकारत असल्याचे दिसून येते.

### ९.४ चिमाजी आप्पा : बाजीरावाचा पाठीराखा

बाजीराव व चिमाजी आप्पा यांचे शौर्य, धैर्य, मुत्सद्दीपणा, पराक्रम आणि मुख्य म्हणजे गाढ बंधुप्रेम पाहुन ब्रहमेन्दस्वामी त्यांना राम-लक्ष्मणाची जोडी असं गौरवानं म्हणत असे. शाहु महाराजांच्या दरबारातीत कार्य असो, उत्तरेतील राजकीय स्वा-या असो अथवा दक्षिणेतील धोरण असो या सर्व बाबतीत चिमाजी आप्पाने बाजीरावाच्या धोरणाचा पाठपुरावा केलेला दिसतो. चिमाजी आप्पा हे बाजीराव पेशवा बनल्यानंतर प्रारंभी शाहु महारालांकडे राहु लागले. त्यावेळी शाहु महाराजांच्या दरबारात दोन गट पडलेले होते. एक पेशवाचा तर दुसरा श्रीपतराव प्रतिनिधी यांचा. बाजीराव स्वारीवर गेल्यानंतर प्रतिनिधी, अमात्य इत्यादी मंडळी शाहुच्या दरबारी पेशवा बाजीरावाविरुध्द नेहमी कारस्थाने करीत असत. अशावेळी चिमाजी आप्पा आपल्या बंधुच्या गैरहजरीत त्यांचे समर्थन करीत व प्रत्येक प्रश्नाला दोन बाजु असतात हे अत्यंत नम्रपणे छ. शाहुच्या नजरेत आणण्याचे कार्य करीत. चिमाजी आप्पा नम्र स्वभावाचे व मृदूवाणीचे असल्यामुळे शाहु महाराजांवर चिमाजी आप्पाची चांगली छाप पडली होती. त्यामुळे शाहु महाराजांच्या दरबारात बाजीरावाविरुध्द होणारे कारस्थान चिमाजी आप्पा यशस्वी होवू देत नव्हते. सरदेसाई म्हणतात, "बाजीरावाच्या दोषांवर पांघरुन घालून चिमाजी आप्पाने मोठया प्रेमाणे व आस्थेने पाठपुरावा केला. त्याने कधीच आपला हेका चालविण्याचा प्रयत्न केला नाही."[१५] हे अगदी खरे होते.

चिमाजी आप्पानी बाजीरावाच्या काळात मुलकी व सैनिकी कार्य करुन मराठा साम्राज्य विस्तारासाठी मोठा हातभार लावला. आप्पाच्या व बाजीरावाच्या कामगिरीची तुलना करताना गो. स. सरदेसाई म्हणतात, "शिपाईगिरी व राजकारण या दोनही बाबतीत बाजीराव पूर्ण तरबेज असून त्यांच्या जोडीस बंधू चिमाजी आप्पा किंबहूना अनेक बाबतीत कांकणभर जास्त असल्यामुळे उभयंताकडून अल्पावकाशात अपूर्व कामगिरी झाली. या बंधूच्या सामर्थ्याने एकदम मोठी मजल गाठली होती."[१६]

आप्पा अनेकदा स्वत:च्या खांदयावर जबाबदारी घेऊन ती यशस्वी पार पाडलेली दिसते. पेशवा बाजीराव यांच्या माळवा प्रांत, गुजरात, बंदेलखंड व उत्तरेतील स्वाऱ्या मध्ये चिमाजी आप्पाचा प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष सहभाग होता. माळवा, पेटलाद, चंपानेर, कोकण इत्यादी मोहीमेचे नेतृत्व चिमाजी आप्पाने स्वत: करुन पेशवा बाजीराव यांचे साम्राज्य विस्ताराचे धोरण यशस्वी करण्यासाठी त्यास हात भार लावला. हिंदूधर्म रक्षण व साम्राज्य विस्तार करण्यासाठी दक्षिणेस ज्याकाही मोहीमा पेशवा बाजीराव यांनी केल्या त्यात बाजीराव पेशवा यांना जेवढे यश मिळविता आले नाही त्यापेक्षा जास्त प्रभावीपणे चिमाजी आप्पाने दक्षिणेत मोहीम राबवुन पेशवा बाजीरावांच्या धोरणाचा पाठपुरावा केला. त्यामूळेच कोकण, माळवा आणि गुजरात येथील देदीप्यमान विजय आणि मराठी सत्तेचा उत्तरेकडे विस्तार होवू लागला.

मराठा राज्यविस्तारांमध्ये चिमाजी आप्पांनी बाजीरावाची पाठराखण केली. त्याबरोबरच मस्तानी प्रकरणातही बाजीरावाची बाजू राधाबाईकडे खंबीरपणे मांडण्याचा प्रयत्न आप्पांनी केला. वास्तविक पाहता चिमाजी आप्पा कट्टर धर्मपारायण करणारा होता. त्यामुळे  मस्तानी सारख्या मुस्लीम नर्तीकेशी पेशवा बाजीरावाने सलगी करावी  नव्हेतर शनिवार वाडयात आणून ठेवावी हे वर्तन चिमाजी आप्पानां आवडले नाही. त्यांच्या या वर्तनामुळे त्यांने मस्तानीस नजरकैदेत ठेवीले व कालांतराने मस्तानीस  कैदेत ही टाकले. परंतू जेव्हा ब्ऱ्हाणपुर जवळ  पेशवा बाजीराव व चिमाजी आप्पाची भेट झाली. त्यावेळी पेशवा बाजीरावाची मनस्थिती पाहुन पुण्याला येवून मातोश्रीस मस्तानीला बाजीरावांकडे पाठविण्यासाठी आग्रह केला. थोडक्यात पेशवा बाजीराव यांचा पाठीराखा चिमाजी आप्पा होते. मात्र आप्पानी मस्तानीवर अन्यायच केले असे दिसते.

विशेष म्हणजे आप्पा बाजीरावापेक्षा लहान असला तरी बाजीरावावर आप्पाचे नैतीक वजन होते. त्यामुळे बाजीराव बराच मर्यादेत राहीला. आप्पांनी मस्तानीला अटक केली असली तरी आपल्या ज्येष्ठ बंधूचा कधीच सार्वजनीक ठिकाणी अपमान केला नाही. यावरुन चिमाजी आप्पाला कधी आणी काय बोलायचे याचे भान होते. चिमाजी आप्पा व बाजीराव यांच्यात मस्तानी प्रकरणातून काहीकाळ दूरावा निर्माण झाला होता. असे असले तरी चिमाजी आप्पाने बाजीरावाला कधी उघडपणे विरोध केला नाही.

पेशवा बाजीरावाने ज्या आक्रमक धोरणांचा अवलंब केला ते यशस्वी करण्यात चिमाजी आप्पाचा मोठा वाटा होता. बाजीरावाच्या युध्द मोहीमेत चिमाजी आप्पाचे मोलाचे सहकार्य लाभले. किंबहुना बाजीरावाने मिळविलेल्या यशामध्ये सावली प्रमाणे त्याची साथ देणाऱ्या चिमाजी आप्पाचा सहभाग होता. बाजीराव व चिमाजी आप्पा यांच्यात एकमेका विषयी खुप प्रेम होते. राजकीय जीवनात त्यांना जे यश मिळाले त्यामागे त्यानी एकमेकांना केलेले सहकार्य होय.

मात्र आप्पाच्या कार्याला न्याय मिळालेले दिसत नाही. डॉ. राजा दिक्षित लिहीतात, "थोरले बंधू बाजीराव पेशवे ( पेशवे काल १७२०-४०) यांच्या कारकीर्दीत चिमाजी आपांनी सदैव त्यांना सावली सारखी साथ दिली. या जोडीचा नामनिर्देश त्याकाही 'राम-लक्ष्मण' असा केला जातो. यातच काय ते आले. अर्थात लक्ष्मण हा गुणी व कर्तृत्ववान असला तरी रामाच्या कर्तव्यामुळे त्याचे कर्तुत्व काहीसे झाकोळून जाते, तसेच चिमाजी आप्पाचे घडले आहे."[१८] दीक्षीत म. श्री. यांनी आप्पाच्यां कार्याचे मुल्यमापन करताना, "वडील भावाच्या तेजोवल्यात त्याची कीर्ती पुसट व्हावी हे दुर्देव म्हटले पाहीजे. आप्पासारख्या धवलकिर्ती, निस्वार्थी पराक्रमी पुरुष पेशवे वंशात अन्य नाही."[१९] मात्र असे असले तरी आप्पांनी आपल्या भावाच्या काळात त्यास पुर्ण सहकार्य केले हे स्पष्ट होते.

### ९.५ चिमाजी आप्पा : खंबीरवृत्ती

चिमाजी आप्पा नम्र स्वभावाचे असले तरी कधी कधी आप्पा कठोर झाल्याचे दिसून येते. या आप्पाच्या स्वभावाविषयी गो. स. सरदेसाई लिहीतात, "चिमाजी आप्पाचा स्वभाव मनमिळाऊ, विचारी व धोरणी होता. दुसऱ्याचे मन न दुखविता युक्तीने व निश्चयाने काम करुन घेण्याची हातोडी त्यास होती."[२०] पेशवा बाजीराव व चिमाजी आप्पा दोघेही बंधू असले तरी त्यांच्या स्वभावात खुप तफावत होती. कित्येकदा पेशवा बाजीराव व इतर सरदार यांच्यात वाद निर्माण होत असे. चिमाजी आप्पाला ते सोडवावे लागत. छ. शाहु यांच्या काळात पेशवा बाजीरावाचे वर्चस्व वाढल्यामुळे जून्या सरदारास धाकांत ठेवणे सहज सोपे नव्हते. छत्रपती व पेशवा यांचे वर्चस्व काही सरदार मान्य करत नसत. तेव्हा कधीकधी पेशवा व चिमाजी आप्पा यांना कठोर भुमीका घ्यावी लागे. गुजरातचा मराठा

सेनापती त्रिंबकराव दाभाडे जेव्हा शाहू महाराजांना न जुमानता विरुध्द वागू लागला तेव्हा चिमाजी आप्पांनी आपली भुमिका स्पष्ट केली, "दाभाडयानी कज्जा केला तर तो आम्ही सांभाळतो त्याची फिकीर बिलकूल नाही पण ते जर निजामास जाऊन भेटले तर त्यांचा हुद्दा परिच्छिद दुर करावा."[२१] गुजरात मध्ये त्र्यंबकराव दाभाडे यांनी शाहू महाराजां विरुध्द भूमिका घेतली असता त्यांचे पद काढून घ्यावे अशी भूमिका आप्पानी घेतली होती. या वरुन चिमाजी आप्पा नम्र स्वभावाचे व मृदूवाणीचे असले तरी वेळ प्रसंगी कठोर भुमिका घेत असत.

त्रिंबकराव यांच्या मृत्युनंतर आप्पाच्या स्वभावात कठोरता आल्याचे दिसुन येते. कारण चिमाजी आप्पा विरुध्द अशा प्रकारची एक तक्रार मानाजी जाधवा यांने शाहु महाराजांकडे केलेली नमुनेदार आहे. ती पुढीलप्रमाने, "चिमाजी पंतानी आम्हास दबावाच्या गोष्टी सांगीतल्या, आम्हांस भेटीस घेवून गेले त्यांची आमची भेट जहाली. त्यास तेथे जे आम्हांस बोलो नये ते बोलला की, तुम्ही महाराजांची पाठ करुन राहतां तर एक दिवस मारुन तरसज करीन. त्रिंबकराव दाभाडा मारला महाराजांनी आमचे काय केले ? तुम्ही वीट (वाईट) करुन किती दिवस राहाल! ऐसा आम्हांसी आकस लाविला आहे, की तमाम सरदार आमचे चाकर आहेत. तुम्हीही एकभावाने चाकरी करावी."[२२] अर्थात यामुळे आप्पा फार कठोर होते असे नव्हे. परंतू राजकारणात वेळप्रसंगी कठोर व्हावेच लागते. त्यास आप्पाही अपवाद नव्हते.

## ९.६ चिमाजी आप्पाची प्रभावळ

महान व्यक्ती आपल्या भोवती चांगले सहकारी निर्माण करित असतात. कारण त्यामुळे व्यक्तीचा कार्याला गतीशीलता प्राप्त होते. चिमाजी आप्पा हे अतिशय प्रामाणिक, पुण्यवान व्यक्ती असल्यामुळे त्यांनी सहकारी वर्गच तयार केला होता. चिमाजी आप्पाच्या यशात त्यांच्या सहका-यानी मोलाची कामगीरी पार पाडली. माळवा मोहीम असो वा बुंदेलखंड, गुजरात असो वा कोकण अशा मोहीमांमध्ये त्यांच्या सहकारी वर्गानी त्यानां बहूमुल्य मदत केली. मल्हाराव होळकर, बाजी भिवराव, महादेव भट्ट हिंगणे, शंकराजी केशव, गोविदंपंत बुंदेले, कृष्णराव महादेव जोशी, गणपत भट मेंहंदळे इत्यादींच्या सहकार्यामुळे चिमाजी आप्पाना एवढे मोठे यश मिळाले. विशेष म्हणजे वसई मोहीमेत

गणेश नाईक, शंकराजी केशव, बाजी भीवरांव, मल्हारराव होळकर, शिंदे इत्यादीनी अतिशय महत्वाची भूमिका बजाविली.

### ९.७ चिमाजी आप्पा : धर्म

चित्पावन कोणस्थ ब्राम्हण घराण्यांत जन्माला आलेला चिमाजी अप्पा हा कर्मठ सनातनी वृत्तीचा होता. ते पुण्यवंत व प्रतापवंत म्हणूनही ओळखले जाते. त्यांचे व्यक्तीमत्व हे सात्विक व संस्कारीत होते. चिमाजी आप्पा यांच्यावर हिंदूधर्माचा जबर पगडा होता. त्यांची ही वृत्ती अनेक कृतीतून दिसुन येते. तसे पाहता आप्पा हे नेहमी मोहीमेवर असे अथवा घरातील कार्य करण्यात मग्न राहत. पण त्यातुनही वेळ काढून धार्मिक कार्य पार पाडीत असत. ते गणपतीचे फक्त होते. आप्पा यांनी आपल्या जीवनात अनेक जपतप व अनुष्ठाने करविली. भिमाशंकर येथील शिवालयाला त्यांने एक अष्टधातूचा घंटा अर्पण केला. त्यांच्या धार्मीक वृत्तीचे दर्शन त्यांच्या जीवनावर प्रकाश टाकताना स्पष्ट होते. पोर्तुगिजांच्या विरुध्द अतिशय कडवी झूंज देताना सुध्दा वसई किल्लातील देवीचे दर्शन घेतल्या शिवाय आपण माघारी जाणार नाही अशी शपथ आप्पा घेतो. हे त्यांची संकटकाळातील देवांवरील दृष्टी दर्शविते. मात्र जेव्हा वसईच्या तहाच्या वाटाघाटी सुरु झाल्या त्यात मात्र आप्पांनी पोर्तुगिजांच्या आग्रहाखातर हिंदूच्या धर्मस्वातंत्र्याचा अंतर्भाव असू नये अशी भूमिका घेतली. आणी आप्पांने ते मान्य केले. यावरुन आप्पा हे हिंदू रखणासाठी मोहीमा काढत होते असे म्हणता येत नाही.

चिमाजी आप्पा कितीही सनातनी असले तरी इतर धर्मांचा मात्र आदरही करीत होता. मांडवगडाच्या निलकंठेश्वरा शहाबादला चिमाजी आप्पाने भेट दिली ते मंदीर अतिशय भव्य रमणीय होते. तेथील फारसी लेख वाचला. त्यावेळी त्यांच्या सोबत असलेल्या मंडळीनी ती वास्तू पाडावी असा आग्रह धरला. मात्र चिमाजी आप्पाने वास्तु न पाडता त्या मोगली इमारतीच्या मधल्या खाण्यात संगमवरी शिवपिंडाची पुन्हा स्थापना केली. त्यामुळे हिंदूच्या धर्माचे जतन झाले. त्याबरोबर मुस्लीमाच्या वास्तुचा आदर केला. थोडक्यात आप्पा हे धामिर्मक असले तरी धर्मवेडे नव्हते. असे असले तरी चिमाजी सदा सर्व काळ ईश्वराचे चिंतन करित असे. आपल्याला मिळत असले यश हे

सारे ईश्वरामुळेच मिळतात अशी त्यांची गाढ श्रध्दा होती. त्यांच्या धार्मीक वृत्तीविषयी बेहरे लिहीतात, "धार्मीक वृत्तीमुळेच तो त्याकाळी पूण्यवंत व म्हणून प्रतापवंत ठरतात्."[२३]

### ९.८ चिमाजी आप्पा : स्त्रियांचा सन्मानकर्ता

चिमाजी आप्पाच्या मनावर धार्मीक पगडा असल्यामुळे चिमाजी आप्पा हा अतिशय प्रामाणिक, नैतीकतेने जीवन जगत असे. छत्रपती शिवाजी महाराजानंतर मराठा इतिहास स्त्रीयांचा आदर कराणारा दुसरा महान व्यक्ति म्हणजे चिमाजी आप्पाच होय. चिमाजी आप्पा मातृभक्त होता. आपल्या मातोश्रीचा आप्पा मान-सन्मान ठेवीत असत.विशेषत: चिमाजी आप्पाचे चारिञ्य निष्कलंक होते. ते एकपत्नीव्रती राहीले. त्यांनी आपल्या आयूष्यात रक्षा अथवा पटराण्यां ठेविल्या नाहीत. अर्थ्यात आप्पाचे जीवन हे शुध्द चारीञ्य होते. चिमाजी आप्पा हे स्त्रीयांचा सन्मान करणार आदर्श पुरूष होता. मातोश्री प्रमाणेच आप्पा आपल्या वहीनीचाही (काशीबाई) मान-सन्मान करीत असत. काशीबाईलाही चिमाजी आप्पावर विश्वास होता. आप्पा सोबत काशीबाई आपल्या भावना व्यक्त करीत असे. घरातील कार्य करताना आप्पाची मदत घेत. काही समस्या निर्माण झाल्यास त्याविषयी चिमाजी आप्पाचा सल्ला घेत असत. आप्पानी युध्दात विजय मिळविल्यास काशीबाई आप्पाचे कौतूक करीत.

आपल्या परीवारातील स्त्रियांप्रमाणेच आप्पा परस्त्रियांचाही सन्मान करीत असे. वसईच्या युध्दानंतर पोर्तुगीज गव्हरर्नरच्या पत्निला जेव्हा चिमाजी आप्पाच्या सैनिकांनी पकडून आणले होते. तेव्हा तिला चिमाजी आप्पांनी सन्मानाने परत पाठविले. गर्व्हनरच्या पत्निच्या मनावर चिमाजी आप्पाचा एवढा प्रभाव पडला की, तीने आपल्या पतिला चिमाजी आप्पाच्या वर्तनाचा दाखला दिला. "तुम्ही कशासाठी भांडता चिमाजी आप्पा पूण्यवान आहे. मी तेथे गेले असता मला वाकडे दृष्टीने पाहीले देखील नाही."[२४] या वरून आप्पा हे परीवारातील स्त्रियांबरोबर परस्त्रियांचाही आदर करीत असे.

एकंदरीत आप्पा हे एक महान योध्दा, आदर्श पुत्र, एकनिष्ठ सेवक, स्त्रियांचा सन्मान कर्ता, आणि बाजीरावाचा पाठीराखा होता.

*संदर्भ :*

*०१. सरदेसाई गो. स., मराठों का नवीन इतिहास, खंड-२, पूर्वोक्त, पृ. ११६*

*०२. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पूर्वोक्त, पृ. २३८*

*०३. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पूर्वोक्त, पृ. ३०८*

*०४. सरदेसाई गो. स. (संपा.), ऐतिहासिक पत्रबोध, पुर्वोक्त, पृ. ३०*

*०५. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५८६*

*०६. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.१७४*

*०७. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५८६*

*०८. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड १७, ले.९८*

*०९. डॉ. राजा दीक्षीत, पेशावाईतील चिमाजी आप्पांचे योगदान, दैनिक लोकसता, लोकरंग, दि. २ ऑक्टोबर २०१६, पृ.५*

*१०. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पूर्वोक्त, पृ. ३११*

*१२. प्रा. बिरादार टी. के., पेशवाईचा कालखंड, ( पूर्वार्ध ), खंड-२, पूर्वोक्त, पृ. १८८*

*१३. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-३३, ले.३९८, पृ. ३३६*

*१३अ.बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पूर्वोक्त, पृ. २५४-२५५*

*१४. डॉ. राजा दीक्षीत, पेशावाईतील चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.०५*

*१५. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५८६*

*१६. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ६०१*

*१७.प्रा. पुराणिक श. श्री., पेशवा पहिला बाजीराव, (उतरार्ध), पुर्वोक्त, पृ.४६३-४६४*

*१८. डॉ. राजा दीक्षीत, पेशावाईतील चिमाजी आप्पांचे योगदान, पुर्वोक्त, पृ.०५*

*१९. दीक्षित म. श्री., प्रतापी बाजीराव, पुर्वोक्त, पृ.१७४*

*२०. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ.५८६*

*२१. गर्गे स. मा. (संपा.), मराठी रियासत, खंड ३, पुर्वोक्त, पृ. ५८०-३८१*

*२२. सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दफ्तर, खंड-१७, ले. ८०*

*२३. बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, पूर्वोक्त, पृ. २४५*

*२४. हेरवाडकर र.वि. (संपा.), (१९७५), पेशव्यांची बखर, पुर्वोक्त, पृ. २९*